स र्व सं ग्र ह

# मोरोपंतकृत.

## द्रोणपर्व

# आर्या.

---

रा॰रा॰ परशुराम बल्लाळ गोडबोले

यांच्यासहायानें

शुद्ध करून

माधवचंद्रोबा

यांनीं

लोककल्याणार्थ

आपल्या छापखान्यांत छापिल्या.




---

मुंबई.

लोहारचाळ.

शके १७८४

# मोरोपंतकृतद्रोणपर्वाच्याआर्या.



[1]योध-वर-तात-पतनें अनुदिन धृतराष्ट्र होय कृशी, तें
किति वर्णावें! विजनीं[2] अंध रडे, हारवूनि यष्टीतें[3] १
योगीश्वरसा[4] साक्षात्‌ — जो पाहे सर्व संजय-ज्ञानी,
तो ये पुरासि चिंतित — जें गावें पाद-कंजे[5] यज्ञानीं. २
"शिबिराहुनि आलों मी. — संजय, — नमितों" — असें वदे; त्यातें
नृप वृत्त पुसे; सांगे गावल्गणि[6] कर्ण-चित्त देत्यातें. ३
"भीष्म पडतांचि, गेले सर्वांचेही, पळांत, आवांके[7]. —
असतां धुरंधर[8] वृषभ[9], बाळ वृष भरें[10], करूनि ओं[11], वांके. ४
"कुरुकटका आठवला कर्ण महासंकटीं — गजा[12] हरिसा.
देउनि दर्शन, वदला तो जें; तें सर्व सांगतों, परिसा. ५
'देवव्रतेंचि[13] केली सत्य असाधारणा प्रतिज्ञा ती. —
आहे क्षम भाराच्या कोण असा धारणा[14]-प्रति ज्ञाती? ६
'रविरोचें[15], तीमागें, संपादे स्वल्प काज वातीस.
विसरविल काय, तेज प्रकट करुनि, अल्प कांजवा तीस? ७
'भीष्माच्या पतनाची चित्तांत धरूं नको व्यथा, राया;
कुरुगुरुपुढें समर्थ न सुरगुरु[16], तोही न कांव्य[17], थारोंया[18]. ८

---

१ योधश्रेष्ठभीष्मपतनानें, - २ एकांतीं, - ३ काठीस, - ४ व्यासासारिखा, - ५ चरणकमल, - ६ संजय, - ७ धैर्यें, - ८ रथाची धूरवाहणारा, - ९ बैल, - १० भारानें, - ११ तोंडवासून, - १२ गजेंद्रास, - १३ भीष्में च, - १४ धरावयास, - १५ सूर्यप्रभेचीं किंवा किरणांचें; - १६ बृहस्पति, - १७ शुक्र, - १८ स्थिर व्हायास, - * ग्रत्यहीं, - ** सेनातलभूमि.

'आर्यांनि अभिषेकाचा; देइल वर, होय [1]कल्पतरुचि! राज्या
वरितिल देवी–जाणति सर्व कला विविध [2]स्मररुचिरा ज्या." ९
"कुरुराज म्हणे,'गुरुजी! सेनापति, [3]शत्रुबलविरामा! व्हा.
तुमची [4]ओंव्हा पळऊं [5]अहितेभमदा, जेविं पळवि [6]रामोव्हा.' १०
"द्रोण म्हणे,'सेनापति होतों, म्हणतोसि जरि; परि स्पष्ट–
धृष्टद्युम्नासि न मी वधिन; करीन त्वदर्थ बहु कष्ट. ११
'मी [7]समर पांडवांसीं करिन, हरिन [8]अरिनराधिपति कटकें.–
[9]भट केविं टिकेल इतर!– गरुड निरखिजेल काय, गा, [10]चटकें? १२
'मज गुरुसीं गुरुवत्सल पांडव रण न करितील उत्साहें.
येईलचि तच्चित्तीं कीं, होइल सज्जनांत [11]कुत्सा हे.' १३
"ऐसें वदोनि, कुरु-गुरु विधिनें अभिषेक करुनि घे, राया:–
त्यासि न शकले पांडव- भट कोटिहि, धैर्य धरुनि, घेराया! १४
"गुरु-रथ-वेग असह्यचि झाला त्या [12]विष्णु-पत्ररथ-वेगा!
केला पांच दिवस बहु युद्ध-चमत्कार, तो न कथवे, गा! १५
"धृष्टद्युम्नें वधिला अन्यायें, सकळ सैन्य हळहळतें.
गुरु-मरण तसें देतें,–जैसें दे मोह, दैन्य, [13]हळहळ तें." १६
धृतराष्ट्र विलाप करी बहु.–आपणा आपणासि निंदुनि घे.
स्मृति हरपे, करपेचि! न तन्नयनांतूनि अश्रु बिंदु निघे! १७

१ कल्पतरुच,–२ स्मरतरम्या,– ३ हे शत्रुसैन्यनाशका–४ नाम,–५ अहितभद– शत्रुच्या गर्वास;– ६ रामनाम,– ७ युद्ध,– ८ अरि-नराधिपति-कटकें–शत्रुराज्यांचीं प्रकोष्ठा भरणें,– ९ योद्धा,– १० चिमण्यानें,–११ अपकीर्ति,– १२ विष्णु-पत्ररथ-वेग–विष्णूचा पक्षी गरुड त्याच्या वेगा,– १३ विष

"सूता![1] जो वादविला- स्वपराक्रमसांच- विप्र मत्तातें,[2]
धृष्टद्युम्नें वधिला, - हें वाटे साच विप्रमेत्तातें[3]. १८

"भीष्म, द्रोण- रवि, शशी[4] - गिळिलें पांचाळ-काळ-राहूनीं!
निर्विघ्न होते कीं ते जननयनां सर्वकाळ राहूनीं! १९

"मरण नये, उर न उले, जरि हें बहु शोकपर्व तापवितें;-
विधि न धरी भेदाया कां या धृतराष्ट्र-पर्वता पवितें[5]? २०

"कविवृंद[6] सदुपदेशें तुज शिणवुनि, देवि वाणि! तळमळलें!
हा कोळसा; कराया शुद्ध, धुतां व्यर्थ पाणि-तळ मळलें! २१

"बहु जन बुडवुनि शोकीं, दुष्टा दुर्योधना! बुडालास!-
अकूपालय[7] लंघाया, मत्ता मशका[8]! कसा उडालास? २२

"गज गोष्पदीं[9] बुडाला!- हा! दैवा! सिंधु शोषिला मशकें!
न शकें सोसाया हें.- वधिला तो केसरी[10] कसा शशकें[11]? २३

"आली मूर्च्छा, सूता! उत्तम होईल जरि न वांचेन!-
कां चेन आधि-पाशीं;-कूल-शोकाचे गुण कपाक यांचे न. २४

"हा! भार्गवास्त्रसर्व- [12]स्वकपात्रा! त्वद्बळें हरिपनि मी
न वचकलों[13].-नव्हतों जैय[14]- कण कल्पित अर्जुनीं- हरिप्रतिमीं[15]. २५

"हा द्रोणा! हा द्रोणा! हा द्रोणा! मृत्यु तुज कसा घडला?"
ऐसें रडोनि,-धडडड- धरणीवरि तो धरापती[16] पडला. २६

---

१ संजया.-२ मत्-तात्-माझ्यापिता भीष्मजोसा गे,-३ उन्मत्तास,-४ चंद्र,-५ वज्रानें,-.
६ कविसमुदाय,-७ समुद्र, ८ घुंगुरट्या,-९ गाईच्या खुराने झालेल्या जागीच्या पाण्यांत,-
१० सिंह,-११ ससानें,-१२ भार्गव- अस्त्र- सर्व- स्व-क-पात्र-परशुरामाच्याअस्त्ररूपीसर्वध
नाच्याउत्तमपात्रा, १३ भ्यालों,-१४ जयलेश,-१५ हरिसदृशीं,-१६ धृतराष्ट्र.

यापरि कुरुगुरुच्या बहु- शोक-भरें होय कांय कारा ज्या,
उठविति, वारा घालुनि, शिंपुनि शीतांबु, बायका राज्या. २७
देवें, आप्तोपायें, कश्मल-जलधीस तो नरपति तरे.
करुनि बहु विलाप म्हणे, "निंदिल धर्मासि, तो नर पतित, रे! २८
"रे, संजया! महात्मा, राजर्षि अजातशत्रु कोपविला.—
पुण्य-श्लोक, तपोनिधि,— भस्म कटाक्षें करील तो पविला! २९
"एकेंचि गदा घातें पोदिल भीम-प्रभाव भीम नगा.—
शरभास जसें हरिचें, माझें, ऐकोनि त्यास, भी मन, गा. ३०
"अर्जुन नर; नारायण कृष्ण-प्रभु;—परम-पूत-नामा! या,
बाळपणींहि, न शकली माराया, करुनि पूतना माया. ३१
"वधिला वत्स, अय, तृणा- वर्त, कपटि, खलेवतंस बक, राहो.
कालिय-केशि-दमन हरि;—हरि! हरि! हरि! होय कंस बकरा, हो! ३२
"न सरेल, वानिलें जरि दिव्य सहस्राब्द, आठ-यामेंहि, म्यां!
लाजोनि, अनंताच्या ज्ञानें दिधलीच पाठ या महिम्या! ३३
"जात्यंधासहि मजला देवें निज दिव्य रूप दाखविलें!
दाउनि दयोदधीनें दीना-संगदास-अमृत चाखविलें! ३४
"केला नाहींच नरक निज नामानें, तसाचि चक्रानें.

---

१ वंदिशाळा,—२ शीत-अंबु=शीतोदक,—३ कश्मल-जलधि-मूर्छासागरास,—४ पडलेला, नीच,—५ भयंकरपराक्रमज्याचा,—६ पर्वतास,—७ पुराणांतरींवर्णिलेला आठपायांचा मृगविशेष, जो सिंहास मारितो,—८ सिंहाचें,—९ परमपवित्रनावाचा,—१० कपट,—११ खलनायक,—१२ सहस्र-अब्द-हजार वर्षें,—१३ अष्टोप्रहरही,—१४ शोभाच्या,—१५ दया-उदधि-दयासागरानें,—१६ रोग्यास,—१७ नरकराक्षस आणि दुर्गति,—* धर्मराज. ** वपु.

बल, पारिजात हरितां, दाखविलें यासि काय शक्रानें ? . ३५
"दुर्वासा भगवान् बहु वर देता जाहला सदारा ज्या,
जो जगदीश्वर जपती– निज निधिला कृपणसा–सदा राज्या. ३६
"मरतील जरि कथंचित् सतनय पांडव समस्तहि, तथापी,
न भलें, कीं, राज्यपदीं ईश्वरचि, करुनि समस्त हित, थापी. ३७
"तो ईश्वर-कृष्ण-करें कवळिल कदना कराल करवाल,
सांगा तुम्ही, कवि कुशळ! काय, कसें मग कराल, करवाल? ३८
"कौरव मारुनि, देइल निष्कंटक सर्व राज्य आतेला.–
जाणुनि हित, अहित घे तो खल; करितो, वसुनि आज्य, आ तेला! ३९
"मी-माझें,-हें घातक! लागो या आजि आग मोहाला!
मनांत अहंममता- धिका लोकांचिया गमो हाला! ४०
"सांग रणकथा; काढिल, नसतां मनिं मोह, काय बाप रडें?
वांकेल ताजव्याचें भारावांचूनि काय, बा, परडें?" ४१
संजय म्हणे, "नृपा! मन लाऊनि अनीश्वरीं करवीं, न रडें.
हो सावध, काळानें जों नाहीं घातलें मुखीं नरडें! ४२
"पुत्रास-राज्य-मोहें होय जरि तुज व्यथा, परि सराया
मोह श्रोत्यांचा, मी कथिन गुरुवरें कथा; परिस, राया. ४३
"स्वीकारुनि अभिषेक, द्रोण म्हणे, 'मज अभीष्ट वर मागें:-
लोपविलाचि नतजना- ऽसकृत्तदर्क गुरुप्रसाद-चरमागें. ४४

१अत्रिपुत्र,-२स्वकीयद्रव्यास,-३स्थापी,-४हस्तानें,-५युद्धास, किंवा, मारायास,-६भयंकर,-७तलवार,-८घृत,-९अहंममतेहून अधिक,-१०मद्य,-११अविनाशी,-१२इच्छित,-१३नत-जन-असकृत्-तत्-अर्क- शरणागतानें शत्रुरूप सूर्य,-१४गुरु-प्रसाद-चरम-अग- गुरुप्रसादरूप अस्ताचलानें,

''दुर्योधन नमुनि म्हणे, 'धर्म धरुनि मज समीप आणावा.-
गुरुजी, मज कोटि-वर- स्थानीं हा वर अभीष्ट जाणावा.' ४५
''द्रोण म्हणे, 'कुरु राया! या भरतकुळांत धन्य पांडव, गा;-
तरिच सुर म्हणति,'नट हो! धर्माचे गुण, करुनि तांडव, गा.' ४६
'पुण्यश्लोक, युधिष्ठिर, अजातरिपु, धर्मराज,- ज्या नांवें,
वानावें भगवत्सम कविनीं, मानव असें न मानावें. ४७
'बहुधा त्याचा द्वेष्टा कोण्ही नाहींच, आजि हें कळलें:-
मळलें न द्वेषें मन, तरिच प्रेमें रसें असें वळलें. ४८
'प्रथम रणीं जिंकावें, मग द्यावें काय राज-पद भावा?
आणा धरूनि, न वधा –म्हणसी, याच्या स्वयेंचि वद भावो. ४९
''त्वत्पुत्र म्हणे,'गुरुजी! अर्जुन भीमहि न आवरायाचा;
पाहुनि तुम्हांसि सन्मुख, समरीं, जाईल आंव गयाचा ५०
'कीं, जरि हि तेजस्वी, तो साधु मृदु शशी; तुम्ही तपनसे, हो.-
कुतुकें धराल. त्याच्या पदरांत तुम्हां असें तप नसे, हो. ५१
'कथितों, द्यूतीं पहिल्या- परि जिंकायास, पांडव धराया.
कां अन्यथा न म्हणतों, –बा! हाण उरांत कांडें, वध राया! ५२
'वधिल्या धर्म नसे जय. भीमार्जुन, परम उग्र अंतकसे,
कोपें खवळुनि आम्हां सकळांचा न करितील अंत कसे? ५३

---

१ नृत्य,-२ ज्वाला,-३ अभिप्रायास,-४ धैर्य,-५ सूर्यासारखे,-६ कौतुकानें,-
७ शर,-८ यमासारखे,-+ मजकडे,-* इच्छित,-‡ चंद्र.

'म्हणउनि दवडावा हा*, द्यूतीं जिंकुनि, वनास दायाद.—
जाणें स्वहितद्यूता मच्चित्त—जसें येना सदा याद' ५४
'हृदई बहु हांसोनि, द्रोण म्हणे, 'युक्ति बहु भली सुचली!
राज-मना जी कांहीं रुचली, तीच प्रजा-मना रुचली. ५५
'परि, जरि हरिसारथि मज, धर्माला गांठितां, न लक्षील,
तरि करिन कार्य हें मी:—भीमादि न अन्य शूर रक्षील. ५६
'याकरितां, सर्व तुम्ही तो कुरुसंताननलिनरवि रोधा.
विजयासुटें जय कवण पावेल करूनि बलि-नर विरोधा? ५७
'जरि त्या प्रथम पढविला,—बाळपणीं, पुत्रसाच खेळविला,
[illegible] तदधिक! कीं तेणें परमेशास्त्र-प्रसाद मेळविला. ५८
'वृद्ध ब्राम्हण मी, तो तरुण क्षत्रिय;—मला न भारेल.—
भार्गव-नदीज-समर स्मरतां, मद्वचन सत्य वाटेल. ५९
'त्या उपायें अर्जुन दूर, तरि धरिन रणांत धर्मातें.'—
"या सांतर वरदानें पावे बालिश-समूह शर्मातें. ६०
"परहित म्हणुनि, गुरु करी मंत्रीचा स्व कटकांत बोभाट.
होय, श्रुत-प्रतिज्ञा- स्थैर्यार्थ, नृप स्वयेंच तो भाट ६१

---

१ शत्रु,-२ उदका,-३ जलचर,-४ हरि आहे सारथी ज्याचा असा अर्जुन,-५ कुरु-संतान-नलिन रवि- कौरवकुलरूपकमलाचा सूर्य,-६ पाशुपतास्त्रप्रसाद,-७ परशुराम भीष्मयुद्ध,-८ अर्जुनाचें दूर करणें हें अंतर आहे ज्यांत,-९ मूर्खसमुदाय,-१० सुखवास,-११ गुप्तगोष्टीचा

*"म्हणउनि दवडावा या द्यूतीं जिंकुनि वनास दायाद." असाही एक पाठ आहे. परंतु एथें या शब्दाचा उपयोग बराबर होत नाहीं. तो द्यूताचा दर्शक केला तर द्यूतविशेष दाखविलेलें नाहीं. जर दायादशब्दाचा दर्शक आहे तर दायाद प्रथमांत असून त्याचा दर्शक द्वितीयांत होतो. असें होऊं शकत नाहीं. "या द्यूतीं" म्हणजे या पुढें द्यूतीं असा संशय च नको.

“हें दूतमुखें परिस्फाने” धर्म म्हणे, ‘अर्जुना महाबाहो!
बा! हो भ्राता! कोणा, व्यसनीं घेऊनि नाम, हो बोहो? ६२
‘गुरुनें स्फयोधनाला– देतां मज धरुनि–हा दिला वर, हो.
न घडो हें! समरीं मी मेल्यावरि, तो स्फरवें इला[4]-वर हो. ६३
‘अंतर वरांत आहे, वत्सा! तें कळवितों, बरें परिस.
‘धर्म धरिन जरि विजय न रक्षिल, गुरुवर वदे असें अरिस[5]. ६४
‘यास्तव समीपचि रहा समरीं, होऊनि अनलस[6] मदवना[7];–
‘आश्रयगुणें लघुहि गुरु होय जनाऽलंघ्य–अनल[8] समंद[*]-वना’. ६५
“विजय म्हणे, ‘त्या गुरुचा वध, या गुरुचाहि उचित न त्याग.–
जरि करिन भवदुपेक्षा[10], तरि मग त्याहूनि कोण अत्यांग[11]? ६६
‘सोडीन प्राण; परि न गुरुवरि, मरणार्थ, बाण सोडीन.–
मोडीन न प्रतिज्ञा; बोलुनि अनृत[12] न अकीर्ति जोडीन. ६७
‘क्षितिवरि खचोनि, सहसा, सग्रह नक्षत्र-मंडल पडेल,
पृथिवी चिरेल, परि हे दुष्टाची कार्य सिद्धि न घडेल. ६८
‘प्रभुजी! हा मी सेवक जीवंत असें;–तसें कसें होतें?
पुण्य-प्रताप तुमचा सिंह! सकळ शत्रु-बल सैंसें, हो, तें! ६९
‘जरि ससुरासुर[13], साक्षात् स्मरहर[14] होइल सहाय पापा[15], हो[16].

---

१ संकटीं, –२ मी धर्मजो हा, –३ हाकमारो- बोलावो, –४ पृथ्वीपति, –५ शत्रूस, –६ आलस्यरहित, –७ मत्- अवन- मद्रक्षणार्थ, – ८ अग्नि, –*महान, –९ अरण्य, – १० भवत्-उपेक्षा–तुमचीउपेक्षा, –११ अति-आग- महापराध, अति पाप; –१२ असत्य, – १३ देव दैत्यसहित, – १४ शिव, – १५ पाप्या दुर्योधनास, – १६ होवो, ± नवग्रहासहित, – ※ ससा.

समरीं अदृष्टपूर्व स्वपरिभया तो महातपा पाहो
'असतां समर्थ सारथि, अरिची आम्हासि काय परवा, हो?—
शोणित-पूरीं गृध्र- श्येन कृत ग्रास काय पैर वाहो. ७१
'दुर्लभ अहिंचा बाळ, होय स्पर्शीच कालसाचि, मणी;
होईल काय हंसी, गतिटाकूनीहि, आळसा चिमणी? ७२
'त्याला वर कुरुगुरुनीं, अभयवर दिला तुम्हास गुरुगुरुनीं;-
सिंह शरणाश्रितांचें करितील अनिष्ट काय गुरुगुरुनी?'
"अर्जुन-वाग्-अवसानीं बहुधा ते वीर गर्जले हरिसे.—
अरि सेना भी, जाणों— ती सिंह-रवासि गज-घटा परिसे. ७४
"आम्ही, ते, करिते झालों, स्वजयार्थ, आहवारंभा.
भट म्हणती वीररसें, शृंगाररसांत वाहवा रंभा. ७५
आम्हा अर्जुन-पालित- धर्मनृप-बलाकडे पहावेना;
त्यां पांडवांहि कुरुगुरु- रक्षित-कटक-प्रभा सहावेना. ७६
"राया! दोन्हीहि चमू स्तिमित[11] क्षणमात्र राहिल्या होत्या;
चित्रीं जेंवि लिहाव्या, सर्वांहीं तेंवि पाहिल्या, हो, त्या. ७७
"व्यूहांतुनि रुक्मरथ द्रोण-चमू-पति निघे-महातेजा:—
घनै-पटल-निर्गत, तरुण तरणि-म्हणति पिशुणही पहाते ज्या ७८
"इतर भट किती? पाहों न शकेचि श्वेतवाह वीरा या!

१ पूर्वींपाहिला नाहीं ऐसा, - २ रक्तपूरांत, ३ गृध्र-श्येन-कृत-ग्रास-काय-गीध ससाण्यानीं केला आहे ग्रास शरीराचा ज्याच्या ४ शत्रू ५ सर्पांचा ६ आळसी ७ श्रीकृष्णानें ८ अर्जुन-वाक्-अवसान-अर्जुनाच्या भाषणांतीं ९ समुदाय १० आहव-आरंभ-युद्धारं-भास ११ स्थिर १२ अभ्रपटलांतून निघालेला बालसूर्य

सोमक,पांचाळ वधुनि, रक्तांचा सिंधु वाहवी, राया! ७९
“भट गांठिती भटांतें— अहि अहितें—जेविं पतंग पतगांतें.—
कीं,हरि हरितें.—अत्य- द्भुत होय द्वंद्व-युद्ध-शत, गा,तें! ८०
“सौभद्र पौरवाचें अत्युग्र द्वंद्व-युद्ध परिसा, हो,
तुमचें-निजोपकर्षा, धर्मोत्कर्षास चित्त, परि, साहो. ८१
“करितां सारथिमस्तक- कोदंड-छेद पौरवें अहितें,
आर्जुनि, असिचर्म धरुनि, गांठी अरितें—जसा गरुड अहितें. ८२
“खंडुनि सूतशिरें-ध्वज, वामकरें केशभार दृढ धरिला;—
पाडुनि रथाखालें, यावीं जों त्या कबंधता-अरिला, ८३
“तों खड्ग-चर्म घेउनि, सिंधुप, टाकुनि उडी रथा-वरुनी,—
गर्जुनि—हरिपरि, अरिवरि धांवे, तद्वध-मनोरथा वरुनी. ८४
“त्या पौरवासि सोडुनि, सौभद्र जयद्रथावरि उगारे;
हांसुनि म्हणे,‘हरिपुढें ढक-शश-कार्यो न थांवरि; उगा, रे.’ ८५
“सैंधव-सैनिक-शस्त्रें, खड्गें, खंडुनि सरोज-नाभाच्या
मोही— वीरजना हर- सा,—स्मरसा अप्सरोजना,-भाच्या. ८६
“असि भंगतां प्रहारें लोकांत, न थापटुनि भुजा-माता,
ज्या मातापी,-नें करि:— कीं जाय तुझा पळोनि जामाता! ८७
“कटकीं जयद्रथाच्या कदन करी, त्यजुनियां दया, दवसा—

१समुद्र,-२ पक्षि,- ३अति- अद्भुत,-४अभिमन्यु,-५ आपलामोड,- ६सारथि मस्तकाचा आणि धनुष्याचा छेद,-७ शत्रूनें,-८ अभिमन्यु,-९ ढालतलवार १० सर्पास, ११ सारथ्याचें शिर आणि ध्वज,-१२शिरहीनता,-१३सिंधुदेशपतिजयद्रथ,-१४ संपादी, १५ कमलनाभकृष्णाचा,-१६रंभादिअप्सरांच्यासमुदायास,-१७ वणव्यापरि.

गमला परां जनेकसा. तो; किंवा, दानवांसि यादवसा. — ८८
"लोक-मुखें 'धन्य' असें जो म्हणुनि, रणांगणांत राहुनि, ये,
सौभद्र-स्कंधांशवरि ग्रासाया मद्रराज-राहु निये. ८९
"वारुनि सूतासि भीम, स्यंदन सोडुनि- महा भुज- गदेतें
घेउनि, शत्रुभटांला दे, भेकोला महाभुजग देतें. ९०
"अवकाश सिंहनादें भरती ते शूरसत्तम नभाचा;
मामासा-नाम्यासि न दे वीररस-प्रमत्त मन, भाचा. ९१
"भीमगदा शल्यातें, शल्यगदा, एकदांचि, भीमातें,
ताडी, मूर्च्छित पाडी;- कांपविती सांगतांहि भी मातें. ९२
"कृतवर्मा शल्यातें स्वरथीं वाहोनि शीघ्रतर पळवी;
होय स्वयेंचि सावध भीम; न तो मोह तयशा मळवी. ९३
"उठतांचि तो गदीश्वर भीम, पळे कुरु-चमू, न गडे तो;
अमराहि जी न सोसे, त्याची सोसेल कसि नरा हेतो? ९४
"कर्णाचा नंदन, वृष- सेन, कुरुबलासि अभय दे, वारी;
तेणें केलें पांडव वीर-गुहें जेंवि सभय देवारी. ९५
"पाहुनियां निजसैन्यें वृषसेन-शर-प्रलय-घनाकुलितें,
जें आश्विनांवनें यश गिरिधर जोडी,- स्वयेंहि नौकुलि तें. ९६
"चाप, ध्वज खंडुनि, बहु शर सोडी कर्णसुत शतानीकीं;-

१ अभिमन्युपिता अर्जुनसा, - २ अभिमन्युरूप अमृतकर चंद्र जो त्याचे वरि, - ३ पंडुकांला, - ४ शूरश्रेष्ठ, - ५ भीति, - ६ गदी-ईश्वर- गदाधारणकरणारांचा ईश्वर, - ७ देवांसही, - ८ शाल्य, - ९ षडानन, - १० देव- अरि- दैत्य, - ११ वृषसेनाचे बाणरूप मेघ पर्जन्यांनी व्याकुळ केलेलीं, - १२ आश्विन- अवन- आश्विनांचें रक्षण, - १३ नकुलपुत्र.

बंधु म्हणति,'हा करा अहि विकल[1] पिपीलिका[2] शतांनीं,कीं! ९७
'ते द्रौपदेय चवघे वृषसेनीं विशिखेंच वर्षले शतदा;
न उरे कुरु-कटक-मनीं युद्ध-जयोत्साह-हर्ष-लेश तदा. ९८
"त्या द्रौपदी-सुतांवरि कर्ण,कृप,द्रौणि,धांवले-हरिसे;
त्यांवरि पार्षत,सात्यकि,भीमहि,उठले जवें-मनासरिसे. ९९
"करिते झाले युद्ध-क्रुद्ध शरभ-सिंह-देव-दानवसे.—
मानवसे गमले न; स्नेह-कणाहि तन्मनीं,तदा,न वसे. १००
"उठली युधिष्ठिर-चमू-जसि महिषासुर-बलावरि भवानी.—
शोभति सुभट-भुज जिचे असकृत्कृतशत्रुबलपरिभवानीं. १
"स्व-बल-क्षय पाहुनि, द्रोण करि क्षत्रियांत-भार्गवसा.
वीरांसि म्हणे,'स्वर्गीं जा;मच्छर दावितील मार्ग,वसा.' २
"रचिला झांकी गगनीं कुरु-गुरु बहु शर-भरीं,तिमिर[10] रविवैरी;
लीलेनें नर-केसरि[12]- लक्ष चिरी, शरभरीति मिरवी रवरी. ३
"धर्माला गांठाया धांवे तो विप्र,कटकें विसकडुन
वाटे तदेकविशिखांहुनि[14] सिंधुज-गरल-घट कविस कटु न. ४
"मदमत्त मतंगज[16],कीं मर्दी जैसा समीर[17] कदलीतें,—
कुरुगुरु तसें करी;तें परिसा कटकें-सकंप-चळलीं तें. ५
"पक्षिपति[18], पक्ष-पवनें उडवुनि जल,सागरीं अहिस धरितो!

---

१ व्याकुल,-२मुंग्यांनीं,-३बाण,-४द्रुपद,-५वेगानें,-६कोपलेला,-७असकृत्-कृत-शत्रु-बल-परिभव-वारंवार केलेजेशत्रुसैन्याचेपराभवत्यांहींकरून,-८क्षत्रिय-अंत-क्षत्रियनाश,-९मत्-शर-माझेबाण,-१०अंधकार,-११पसरी,-१२लक्षनरसिंह,-१३सैन्य,-१४तत्-एक-विशिख-तोद्रोणजोत्याच्याएकाबाणाहून,-१५सागरोत्पन्नविषघट,-१६हत्ती,-१७वायु,-१८गरुड.

करितो तसेंचि कुरुगुरु;- हा! हा! कृतकृत्य होनसे अरि तो! ६
'हा आला! हा आला! कोंडील युधिष्ठिरासि शरपंजरीं!-
शिरला समोरचि जसा- सिंहासि यथावयासि शरभ वनीं.' ७
"आम्ही यदलों,' केलें, जें हृदय निसर्ग-मृदुल, कर्कश तें;
धरिलाचि धर्म गुरुनें;-निश्चय केला असाचि तर्कशतें. ८
"येतां समीप गुरुला पाहुनि आधीं मनांत कर जोडी;
सोडी श्वास शर तया धर्म म्हणुनि धर्म संगरीं झोडी ९
"धर्माच्या चापातें कुरुगुरु एकेंचि मोर्गणें तोडी;
झोडी भीमप्रमुखां बहुतांतें, बहुबळें बळें मोडी. १०
"भग्नार्तस्वभटोच्च- ध्वनि परिसुनि विजय निज यशोदात्या-
सूता! 'हूं, हांक,' म्हणे- ज्या जपत्या देवकी यशोदा त्या. ११
"दुस्तर संकट पडतां मारिति शक्रादि हाक वीरा ज्या,
त्या जगदीशाकरवीं, 'हूं'-म्हणुनि हयांसि हाकवी, राजा. १२
"द्रोणानीकीं केला, शस्त्रवृष्टी करुनि, पोळ वीरानें;
ओळविलीं रथवृंदें बहु,-जेवीं वात लोळवी रानें. १३
"रक्तनदी वाहविली, राया त्या शत्रुसिंह शरभानें
केवल कुरुकरकाचीं हरिळीं, विस्तरुनि अनत शर, भानें. १४
"जे विजय-मुक्त सायक भरिती, झांकुनि रविप्रांत, नभा ते:-

---

१ शरगृहीं,- २ शरें,- ३ सैन्यें,- ४ भग्न-आर्त-स्व-भट-उच्च-ध्वनि-छिन्नयांकु ल अशास्त्रयोध्यांचा मोठा शब्द,- ५ द्रोण-अनीक- द्रोणाच्यासैन्यांत,- ६ शब्दी, ७ बाण,- × स्वभावानें मृदु,- ⁑ कठोर,- ⁎ यथादृष्टान्यास,- ‖ रथसमुदाय,- * पसरुनि,- ‖‖ अर्जुनानें सोडलेले.

सरेतिल, संरेतिल मागें, कधिं-तरि, चारिंहि अपांपति; न भाते. १५
"दाटे बहु निबिड-तिमिर, राया! त्या विजय-रचित शर-भवनीं.-
आम्हा दिग्भ्रम झाला,-जैसा सिंहासि होय शरभ-वनीं. १६
"असुर-चमूचा, बहुधा, धीर नसा नृहरिनें नसे नेला;
त्यां सर्पदष्ट कन्ये- हूनि उणें पाहिलें न सेनेला. १७
"तों रवि गेला जाणों सकल-कटक-कदन राहवायातें:-
करिजेल कां न अद्भुत शक्राद्यजितें नराहवा यातें. १८
"आलों शिबिरा वर्णित विजया गुरु हून, अंगपा हून;
झालों अन्योन्याचें पर्ण-कुसुम-वर्ण अंग पाहून. १९
"परते पार्थ;-गजांच्या शून्य-करुनि जेविं हरि समस्त वना.
अजितत्वगुणें होय स्तोत्यांच्या विषय-हरिसम-स्तवना. २०
"द्रोण म्हणे, 'कुरुराजा! मद्वचन प्रत्ययासि आलें कीं?
विजय-निवारण-शक्ति न माझ्या चापीं, न माझिया लेंकीं. २१
"युद्ध कराया हटकुनि, विजयाला न्याल दूर जरि सारे,
धरिन, न पळतां, धर्मा; कौरव हो, हें यथार्थ परिसा, रे. २२
"तेव्हां म्हणे सुशर्मा, 'जरि न हि भुजांहि सहस्रबाहून
अर्जुन, नेऊं वोदुनि दूर, बळें संगरार्थ बाहून. २३
'आम्हाला तो, किंवा त्याला आम्ही वधूं, प्रतिज्ञानीं;-

---

१ संपतील,-२ हटतील,-३ सागर,-४ अर्जुनरचितबाणगृहीं,-५ दिक्-भ्रम-दिशाविषयींभ्रांति,-६ शरभांच्या वनांत,-७ कर्णाहून,-८ पलाशपुष्पवर्ण,-९ अजिंक्यगुणेंकरून,-१० सहस्रबाहूपेक्षांउणा,-११ बोलावून,-+ अंधकार,-* नरसिंहानें,-* सर्पचावलेल्याकन्येहून.

बहु रक्षिति प्रतिज्ञा- प्रति-जैसें कुलवधूप्रति ज्ञानी २४
“बोलुनि ऐसें स्वमतीं, घे तो सुत-बंधु-वीर-वर्गातें
स्वर्गातें साधाया, सुरवंद्याया रण-मखवांत मार्गातें २५
“सुत-बंधु-वीर-कटका- सह निश्चितचित्त देवदेश-पथ
अवलंबाया, हां, मुनि- विप्रांला वित्त दे! वदे शपथ. २६
“जैसें मरण सुशर्मा,-तैसें तद्भट अशेष-पथ करिती,-
करितां रणीं पलायन, नरक घडावे;-असे शपथ करिती. २७
“ते संसप्तकसंज्ञ, प्रबल, सुभट सिद्ध जाहले युद्धा ;–
क्रुद्धाशीविष गरुडा – कीं जिंकाया अशक्यर्थी शुद्धा! २८

## प्रथमदिनयुद्धसमाप्त



## अध्याय २

## द्वितीयदिनयुद्ध

“दुसरे दिनीं, सुशर्मा जेव्हां रण-मख करावया बाहे,
अर्जुन धर्मासि म्हणे, ‘दे आज्ञा; शत्रु बाहती, बा, हे.’ १
“धर्म म्हणे, ‘मागितला मद्ग्रह-वर कीं सुयोधनें अहितें?
गुरु धरिल मला-धरितो लीलेनें पक्षिपति जसा अहितें! २

१ शिवानें, - २ स्वर्गमार्ग, - ३ प्राप्त करून घ्यावयास, - ४ क्रुद्ध - आशीविष कोप केलेला सर्प, - ५ रणयज्ञ, - ६ मत्-ग्रह-वर- माझा धरण्याचा वर, - ७ शत्रुनें. ८ गरुड, - ९ सर्पास.

“कृष्णे-सखा म्हणे, ‘देवा! होऊं द्यावें न भीत चित्त रणीं.—
होइल गुरु-शर-तिमिरा- प्रति हा पांचाल्य-सत्यजित् तरणी. ३
‘रक्षित आला तुमचा धर्म तुम्हाला, पुढेंहि रक्षील.
गुरु तो करुणाब्धि;-कठिनहि काल न कोपें करून लक्षील! ४
‘जरि सत्यजित्, कदाचित्, समरीं पावेल मरण, न रहा, हो;
स्वस्थमनें आज्ञा द्या; देव संसप्तक-तृणांत नर हा हो.’ ५
‘वत्सा! विजयी हो. ये, संहारुनि शत्रुसैन्य सत्वर तें.’—
“यापरि वदोनि, आज्ञा दिधली सत्व-निरंतास[४] सत्वरतें.
“जे जे, प्रताप शस्त्रा- स्त्रांचे संसप्तकांकडे होते,
पांडव-चंडांशु-पुढें झाले, तत्काळ, कांकडे, हो, ते!
“पार्थाचा प्रलय-घना- ऽधिक-दारुण देवदत्त दर[६] वाजे;
दरवाजेसे-डोळे झांकिति, आइकति भीनिंद-रवा जे. ८
“शर्मा, रथ, धर्मा, धनु, बाहु,-भ्राते-स्रपूर्व-पांच, धिती
ज्यां, त्यांसि-पूतनाशी- विजय-विशिख-वृष्टि पळ न वांचवि ती. ९
“नर-हर-शर-दृक्-पातें पडला-सहसा-खचोनि स्रधनु-रवी;
धैर्य परजैनीं अर्जुन,— षड्वर्गांतिलहि जेविं बुध नुरवी.—१०
“सर्व त्रिगर्त्त-बल तें, भेदूनि भटनायका, द्रवे यश, तें
किति वर्णूं! विपतिपुढें गकावें काय कोंद्रवेयशतें? ११

---

१ अर्जुन, २ अंधकार, –३ चणचा, – ४ सत्व निश्वास, – ५पांडवरूपसूर्यापुढें, – ६ शंख, – ७ भीति देणाऱ्याश ब्दास, – ८ स्रहावर्णपूर्वीज्यांच्या, – ९ प्रसवती, – १० अर्जुनरूपशिवाच्या शररूपदृष्टिपातें, – ११ स्रधनुरूपसूर्य, – १२ शत्रुजनीं, – १३ काम-आदिषड्रिपूंतील, – १४ अर्जुनास, – १५ सर्पशतानीं, – + अर्जुनाचीशरवृष्टि

"'त्याला म्हणे सुशर्मा,' सुरवद न हा वासवाहि लेश पथ्य.—
-परतां; भीतां तरि कां?-दाउनि भावास वाहिले शपथ. १२
"फिरले ते नारायण गोपालहि–बहु जसे घन रविवर.—
विवर न तच्छर देती याना; लोपे पराहि नरविवर. १३
"शरतिमिरीं कृष्ण म्हणे,'मच्चेतोंबुजनवातप! कोसि?—
नित्र, अपक्काहि फल- प्रकरा पाडी, न वात पक्कासि!' १४
"पार्थ म्हणे:'स्वस्थ असें.–होती त्वच्चिंतनेंचि नरक रिते.—
असता आधार तुझा, सज भस्म रणीं कथांच नर करिते. १५
'देवा! निजप्रसादा म्हणसिल तूं होय, दास मी रणगा
[illegible] पळविन! काय न होइन परतोयदा समीरण, गा?' १६
"ऐसें वदोनि, यांजी त्वष्ट्यानें वांपिल्या वशास्त्रातें;
जेविं सुकवि सुमनातें, कुकुकें रचंडावया अशास्त्रातें. १७
"अर्जुनरुसें शतशः, क्षणमात्रें मकर जाहलीं कटकीं;
भुलनें ते संसप्तक; केलीं बहु आपणांत कटकट कीं. १८
"वीर म्हणति,'हा अर्जुन!–हा केशव!–काय पाहतां, हाणा!
आणा मनीं, कुलज हो! ज्या अग्निसमीप वाहिल्या आणा. १९
'वेरां धनंजयाला, आत्मयशें सत्यपांड वेराया;
वेरा करून याव्या गोपाला–सत्य पांडवेरा या. २०

---

१ इंद्राला, -२ मन्-चेतस-अंबुज-नव- आतप- हे माझ्याचित्तरूपकमळाच्यानूतनसूर्य प्रकाशा अर्जुना,-३ क-असि-कोठें आहेस,-४ रणगनपेशा, -५ शत्रुरूपमेघास,-६ वायु,-७ विश्वकर्म्यानें,-८ वश-अस्त्र-वशीकरणास्त्रातें,-९ घेरा,-१० सत्य-प-अंड-सत्यलोकपतिब्रम्हाल्यानें अंड-ब्रम्हांड,-११ पांडय-३ष-पांडवभिया.

"पार्थ म्हणोनि परस्पर हाणुनि शस्त्रांचिया महानिकरें,
पेले बहुत, भुलविले त्या अस्त्रें शत्रु,-धामहानिकरें. २१
"समरीं स्वयेंहि वासवि बहुशत्रूंतें, हरूनि असु, खपवी:—
याचा जेविं शर परा, तेसें देईल काय असुख पवी? २२
"समसप्तकां नर—जसा नरहरि मारी विशृंखळ खळांतें.—
होय असृक्स्रोतःशत; वाहे समराजिरीं खळखळां तें. २३
"अरि-कदन जसें अर्जुन, कुरुगुरुहि तसेंचि वीर-कदन करी.
मिरवी तया पुढें भट— जेविं हरिपुढें बलीहि मदन करी. २४
"धृष्टद्युम्न-वृकोदर- सौभद्रप्रमुख वीर कंपविले
द्रोणें; बहु शूरांचे समर-रसोत्साह सर्व संपविले. २५
"कौंतेयें गांठिला रण- रंगीं, नटउनि महा-भट कबंध;—
जैसा जलद समीरें— तैसा विसकटुनियां कटक-बंध. २६
"धीर धरुनि, धर्मज्ञें, धीरें धर्में धनुष्य चढवीलें;
दाखविलें तें गुरुला, जें होतें आपणासि पढवीलें. २७
'गुरुनें नृप धरिला रे, धरिला!-हाणा हयां कशा! हाका!-
हा! काय पाहतां? द्विज वेडा.'-भट मारिती अशा हाका. २८
"तों धांवे वेचाया धर्मार्थ स्वायुधास्रवित्त रणीं.—
वाटे मुहूर्त तो द्विज- राज, द्विजराज शत्रुजित्तरणी. २९

---

१ तेजोहानिकर,-२ अर्जुन,-३ प्राण,-४ शत्रूस,-५ वज्र,-६ निर्बंध,- ७ रक्तन
द्यांचें शत,-८ रणांगणीं,-९ गज,-१० धर्मराज-११ शिररहितशरीर,-१२ मे
घ,-१३ वायूनें,-१४ चाबूक,-१५ स्वायुधस्वप्राणरूपवित्त,-१६ चंद्र,-
१७ द्रोण,-१८ शत्रु-जित्-तरणी.

"त्या पांचाल्यातें गुरु[१] राज स्वर्गासि पाठवी, राजा.
तेव्हां धर्म पलायन धर्म म्हणे— धर्म पाठ वीरा जा! ३०
"धर्म न भांडे गुरुसीं— जैसा सत्पुत्र पाठि दे बटिलो[३];
त्यासि न म्हणाति नर्भींचे, सोडूनि स्तोत्र-पाठ, देव ढिला. ३१
"समरा[४]जिरासि, राया, सोडुनि जैसा युधिष्ठिर पळाला,
कुरुगुरु तसेंचि पळवी त्याच्या स्व-निवारणोद्यत[५] बळाला. ३२
"भ्याले गुरुसि पर—जसे पंचाक्षर-मंत्र-जप-परा भूत.—
[illegible] भट पळाले—जेविं असुर विष्णु-बल-पराभूत. ३३
"कुरुपति कर्णासि म्हणे 'आचार्यें पळविले, पहा, पर ते.
[illegible] सात्यकि, धृष्टद्युम्न, वृकोदर; न एकही परते. ३४
'गुरु भीष्माहुनि शतगुण अधिक! धनुर्वेद मूर्त[६] हा सत्य!
हास[*] त्यक्तावधि[७] यें.— ज्याच्या मद्रिपुगदास[८] नासत्य[९].' ३५
"राधेय म्हणे; राया! जयहर्षे हासतोसि, परि समज
परम अनर्थ.—परतला भीम; गमे उग्र मृत्यु परिस मज. ३६
'पांडववीर पळाले, गेले, ऐसें तुवां न मानावें.—
याचें बल सत्कविंनीं हरि-हर-बळसें, सदैव, वानावें. ३७
'आतां गुरुवरि धर्म स्वकटक फिरवील; भीम परतेल;
परम प्रदीप्त होइल कीं तो नररूप वन्हिवर तेल! ३८
'रक्षावा द्रोण रणीं यत्नें आम्हीं, तुम्हीं ससंनाहीं,

१ धर्मराज, - २ धर्मशास्त्र, - ३ बटिला, ४ समर-अजिर-रणांगणाला, - ५ स्व निवारण तत्पर, - ६ मूर्तिमान, - ७ अमर्याद, - ८ मम-रिपु-गद-माझ्याशत्रूरूपरोगास, - ९ अश्विनीकुमार. - १० शत्रु, - * हास्य.

म्हणतिल काय अरक्षित-हरि-मथन-यशःस्पृहा शसे नाहीं?

"ऐसें कर्ण वदे तों, मागें सहसा फिरे करटकू, राया.—
प्रलयींचा पाथोनिधि[1] जैसा पृथ्वी, प्रजा,[2] गट कराया. ४०

"द्वंद्व-शतें किति वर्णूं! भीम क्रीडे रणीं समुद्ररसा![3]
त्या युद्धरसा सेवू लच्छुति[4]-सेवी जसी अशक्र[5] रसा. ४१

"भीमासीं युद्ध करी, द्विरदीं[7] बैसोनि, पुत्र[8] नरकाचा.—
टिकला भीमचि; टिकता त्यासीं समरांत काय नर कान्चा?

"मर्दुनि करि-कटकातें, व्याकुळ दुर्योधनासि भीम करी.
तों प्रेरिला तयावरि अंगें, म्लेंछाधिपें, स्व-भीम-करी[10]. ४३

"एकेचि शरें मस्तक भेदुनि, येतांचि नाग लोळविला;
पर-लोकाप्रति अंगें,[11] छेदुनि मूर्धा,[12] पळांत वोळविला. ४४

"ज्या ऐरावत-कुलजा अर्पुनि, पूर्वी महेंद्र[13] सोम करी,
तो प्रेरिला सकोपें भगदत्तें सुप्रतीक-नाम करी. ४५

"भीमावरि, न गणुनि शर-वृष्टीची झड, वैरी करी लगट:—
वाटे जनासि-काळचि तो, त्याला झडकरी करील गट. ४६

"तो क्रोध-मदांऽध, महा-नागाऽयुत-शक्ति-मूळ-पीठ करी
शकटा-पादाऽघातें साश्व-रथातें पळांत पीठ करी. ४७

"भीम गमे मेला, परि त्याच्या पोटातळीं दडाला, हो.—
तो चित्तांत म्हणे, 'बहु मदलाभें[14] ताप या जडाला हो. ४८

१सागर,-२गिळावयास,-३समुद्र हर्षितशिवासारखा,-४लन्-श्रुति-तुझेकर्ण,-५शक्र,-६पृथ्वी,-७हत्तीवर,-८भगदत्त,-९आपला भयंकरगज,-१०गज,-११अंगराजा,-१२मस्तक,-१३सख्य-संधि,-१४मत-अलाभ-माझे अप्राप्तीनें.

“भ्रमत्या कुलाल-चक्रा- सम नाग धरावया लगोल्याला;-
जरि तो प्रवर्तला थित- नाशीं, मदमत्त न श्रेपा त्याला. ४९
“सत्वर निघोनि पळतां, धरुनि करें कंठ, दे उरीं गुडघे.—
चीत्कार करी, जाणो, ‘हा तूं घांटावया’- म्हणे-‘गुड घे.’ ५०
“बंधापासूनि सुटला वेगें भीम, भ्रमोनियां उलटा;-
शुंडा तसि होय, बळें जसि पडली साधुच्या गळां कुलटा. ५१
“पोटांतळीं घुसल्या द्विप-पतिच्या तो रथ्या-सूत लपाला;
वाटे सर्वांसि-म्हणती कवि एक वळी रथ्या सुतलपाला. ५२
“भीम निघे, द्विपपुढें येता निज-गज-घटा, शिरे तींत;
श्रम होय सुप्रतीका-जैसा नटतां नटासि रेतींत. ५३
“जन म्हणति, ‘नवल, साहूनि वज्राघातासि भीम नग झाला!
कीं या भगदत्ताच्या देवगजाचेंहि भी गन गजाला’. ५४
“वेष्टिति भगदत्ताला पांडव, होऊनि एकवट सारे;
तेव्हां सुर म्हणति, ‘अहा! गमतो जलधींत एक वडेसा, रे!’ ५५
“मुनि म्हणति, ‘या वेळीं हा गज, त्या सिंधूंत जेविं मंदर तो!
एवंविधे रण-यज्ञ त्यागुनि, यज्ञांतरांत मंद रतो’. ५६
“बहु भग्न, चूर्ण केलें बल त्या भगदत्त-सिंधुराऽगानें;-
वाटे-जग बुडवितसे प्रलय-समय-मत्त-सिंधु रागानें. ५७
“भीम रथीं बैसूनि ये, त्यावरि, ‘फूं’ करुनि, तो सुंढी उडवी-

---

१ कुंभाराच्या चक्राप्रमाणें,-२ कुब्जा,-३ सोंडेनें,-४ गजरव,-५ जारिणी,-६ गजराजाच्या,-७ सूतनपतीजांबलित्याला,-८ सुप्रतीकनामक गजास,-९ ऐरावताचें,-१० वटवृक्षासारिखा,-११ सैन्यांत,-१२ यामकारचा,-१३ भगदत्ताच्या गजरूप अगानें-पर्वतानें.

बुडवी भयांत बोजीं; पळवी, थांबुनि सहाय बहु तुडवी. ५८
“गज-गर्जितें धनंजय समजे भगदत्त कृत्य चित्तांत;—
होय बहु विकळ, कीं बुध लुब्ध यशीं;–कृपण जेंवि वित्तांत. ५९
“कृष्णानुमतें भंगुनि, भुलवुनि निज विशिख-भव-तमीं पर ते
मोहूनि सुशर्म्यातें सोदर-शोकें शरें, विजय परते. ६०
“कुरु-कटका तप्त करी पार्थ—ग्रीष्मीं जसा पतंग जगा,
तों प्रेरिला तयावरि भगदत्तें काळसा मतंगज, गा. ६१
“देव गजासि म्हणे, ‘रे, गर्व, अय-स्तंभ-सम-रदा! न करा.
हा मत्सरत नर सिंहचि—वज्रधराऽसह्य समर—दानव हा! ६२
“होय पुढेंचि, न मागें पार्थशराहतहि शतमखसख मत्ते.
मुनि म्हणति, ‘अर्जुनीं तव शक्ति, जसी सागरांत खसखस, रे! ६३
“हाणी वज्र-प्रतिम प्राग्ज्यौतिष-धरि-राय तोमर तो;—
भगवत्प्रसाद स्वकवच ज्याला जो साधु, काय तो मरतो?
“प्रकट करूं दे समरीं—श्रीदेवी जेंवि सैरिभीस-कला
तेंवि विजय-चापलता; मग दवडी दूर वैरि-भा सकला. ६५
“विजय विशिखाऽर्त होतां, पूर्वीं दुष्करहि आयकोन, करी
भगदत्ताचें कथिलें—अधनाचें जेंवि बायको—न करी. ६६
“शस्त्रें सरतां, आला पार्थ-विमथनार्थ अंकुश मनाला;

---

१ इयांत, -२ आपल्या बाणरूप भव-अज्ञानांत (अंधकारांत); ३ बंधुशोकानें, -४ सूर्य, -५ लोहस्तंभ सरशा ज्याचे दंत अशा, -६ धरूं नको, -७ इंद्रासहि असह्य युद्ध ज्याचें, -८ मदोदक वाहतें ज्याचें ऐसा ९ भगदत्त, -१० देशविशेष, -११ महिषासुरास, -१२ युद्धकला, -१३ धनुष्यवल्ली, -१४ वैऱ्याची कांती, -* घोरा, -** विशिख-आर्त.

विष्वक्स्त्रें अभिमंत्रुनि, सोडी– हरि जोंवि रंकुशमनाला. ६७
"नभुनें, अनिवार्य म्हणुनि, वक्षःस्थल अंकुशास ओंदविलें;
अत्युग्र वैष्णवाऽस्त्रा फसकनि निजमित्र रत्न सोडविलें. ६८
"होऊनि वैजयंती, अवलंबी अस्त्र विष्णुचें उर तें;
त्या अंकुश-प्रहारें न निमेषहि वक्ष जिष्णुचें उरतें. ६९
"हें नेणुनि पार्थ म्हणे, 'ओंदविलें अंकुशासि कां उर, गा?
स्मर गाती अनृत मला.–गरुड न खंडील कोणत्या उरगा? ७०
'कां भीसी? भय कैंचें मज, असतां त्वत्प्रसाद-पवि-कवच?
'भक्तः प्रणश्यति न मे'–हें कीं वदलासि तूंचि भविक वच? ७१
'समरीं न आवरूं दे हें वत्सलता गुरुप्रतिज्ञा ते;–
काय व्यास-पराशर-मुख म्हणतिल तुज गुरुमति ज्ञाते? ७२
"देव म्हणे, 'भूतें म्यां दिधलें याच्या पित्यास रक्षाया;
तें वैष्णवाऽस्त्र झालें–दायें नसे शास्त्र युद्ध-दक्षा या. ७३
'त्या अस्त्रें अभिमंत्रित भगदत्तांऽकुश तुला न सोसवता,–
अथवा तुझेंचि उर हें; भान, सख्या! त्वन्मनीं नसो सेवता. ७४
'अस्त्र-बल-रहित झाला, जय तुज देतो मरोनि भगदत्त;
होसिल सकल-रिपु-क्षय-कर. तुजहुनि अधिक काय मग दत्त? ७५
'आर्धी पट्ट छेदीं, त्या वृद्धाचीं मिळोन, बा, पोतीं.–
दुर्जय सुरासुरांसहि! तुजही, जों लागलीं न, बापा, तीं! ७६

१ सिंह,-२ भृगना शार्य,-३ उर,-४ पुढें केलें,-५ सपोस,-६ वज्रकवच,-७ कुशल-
वाक्य,-८ रथीस,-९ पितृधनसें,-१० भिन्न,-११ दत्तात्रेय,-१२ पक्ष्में.
* मे भक्तः न प्रणश्यति– माझा भक्त नाशाप्रत पावत नाहीं.

"मारि भगदत्तातें; खंडुनि तत्पक्ष्म बंधन, करीतें;
गुरु-वचन-रत्न डोळस मान्य करी; गान्य अंध न करी तें. ७७
"प्रभुनें-'हूं, वध'-म्हणतां, वधिला पार्थें महेंद्र-सख, चुलता;
जळता शोकें, परि गुरु-बोधें बाधों दिली न आकुलता. ७८
"गांधार-रथ खवळले, पाहुनि त्या पार्थ-शर-विपन्नास;
तेही वधिले विजयें—सिंहें गज जेविं तेविं—पन्नास. ७९
"तेव्हां, तुमचे शालक—वृषक, अचल, फार तापले रागें;—
नागें मूषकसे—ते वधिले एके शरें महाभागें.
"झाले सुयोधना जरि शोकद शर-दलित-काय मातुल ते,
तरि धन्यचि! देवांसीं सुचिरहि वांचोनि काय मा तुकते? ८१
"यत्न करी शकुनि कपट-शर-दहनीं पार्थ-काय होमाया;
त्याच्या चालों देइल भगवत्सख, पार्थ, काय, हो, माया? ८२
"माया-क्षय-भीत शकुनि सूतासि म्हणे,'रथा पिटाळावें.—
जरि रण मरण हित, अहित-मर्दन-कामें तथापि टाळावें.' ८३
"जो नील भूप दावी बळ हरिचें मृग-कुळांत शिरत्याचें,
हटकुनि, तटकरि तोडी भटतिलक द्रोण-पुत्र शिर त्याचें. ८४
"कर्णापुढेंचि वधिले त्याचे भीमानुजें तिघे बंधु;—
सिंधु अगस्त्याचमना न पुरे, पुरतील काय, मग, अंधु? ८५
"दुसरे दिवशीं गुरु-शर-निकरें बहु धर्म-वाहिनी आटे;

---

१ गजास,-२ भगदत्त,-३ कृष्णबोधें,-४ आकुळता,-५ मृतास,-६ बाणानेंविदारिले देह ज्यांचे,-७ कीं काय.-हा मालवणाकडील लोकांच्या भाषणांतील प्रसिद्ध प्रयोग आहे.-८ क्षयाच्या नाशानें भ्यालेला,-९ वीरश्रेष्ठ,-१० कूप,-* सर्पानें.

कुरु-कट कासि किरीटी स्पष्ट कटु-कठोर-पाणिसा-बाटे. ८६
"गुरुनें कर्णादि,जग- द्गुरुनें धर्मादि रक्षिले पार्थ;-
विश्वाच्या यश केलें, कर्पूर-सचूर्ण, अक्षि-लेपार्थ. ८७



## अध्याय ३

### तृतीयदिनयुद्ध

"तिसरे दिवसीं प्रातः- कालीं वंदन करूनियां,राजा
द्रोणासि म्हणे,'गुरुजी! कां आशा-भंग करितसां माजा १
'पार्थ युधिष्ठिर झाला असतां,धरिला तुम्हीं न कां काल?
झांकाल तपन नयनें, तेजें कालासही न थांकाल! २
'आत्मादि उपेक्षावा, नोपेक्षावाच बोल संतांनीं;
झाला भक्तमनोरथ न गुरुजनीं,कीं न फोल संतांनीं? ३
'सगळी तिकडेचि असे तुमची,इकडे नसे कृपा लेश.-
ऐसें नसतें तरि तो कां मरता शक्र-सख,नृपालेश?' ४
"द्रोण म्हणे,'त्यजुनि कुमति, सभ्रातिसीं करुनि संग.रम,राया!
निंदिसि कां,तुजकरितां जरि सजलों,वरुनि संगर,मराया? ५
'त्रिभुवनहि न जिंकिल हरि- सख रक्षित धर्मनंदना सत्य!
हे अजित कृष्ण-साक्षा- त्निजजन-हृद्रोग-कंद नासत्य! ६

---

१परशुरामासारखा,-२कृष्णानें-३कुंतीपुत्र,-४माझा,-५निष्फल,- ६कल्प वृक्षीं,-७भगदत्त,-८युद्ध,-९प्रत्यक्ष स्वजनांच्या हृद्रोगकंदाविषयीं अश्विनीकुमार.

‘जेथें जगदुत्पादक केशव, तन्मित्र विजय सेनानी,
तेथें नर-वीरांच्या साधावा विजय काय सेनांनीं? ७
‘एक त्र्यंबक वर्जुनि, इतर सकल पुरुष जरि बलनेदीप,
तरि दीन हरिपुढें ते;–दारवर्धितिल रविपुढें बल न दीप. ८
‘पाडीन निश्चयें मी कोणा एका महा-रथा आजी;
गातील जिला सत्कवि, ऐसी होईल सर्वथा आजी. ९
‘परि हटकुनि दूर तुम्ही त्या पार्था, वीरसत्तमा, न्या, हो.–
योग कथासी प्रबला ‘ऽरिलय कथा हेहि दत्तमान्या हो.’ १०
“ऐसें वदोनि, चक्र- व्यूह, सुदुर्भेद्य, युक्तिनें रचिला,–
जो धीर-वीर-हीर- प्रवर-प्रकरें करोनियां खचिला. ११
“प्रभुला म्हणे भरार्त भू–ज्यातें करुनि बोध वळवा, जी,
संसप्तक माराया जाय, हटकितांचि, तो धवलवाजी. १२
“चक्रव्यूहामध्यें नृप; पुढें द्रोणगुरु–महातेजा;–
अदभ्र, सदाश्रय, म्हणउनि मेरु असें म्हणति कवि पहाते ज्या.
‘व्यूहातें भेदाया धर्म झटे, करुनि यत्न सानुजनीं;
परि लोपवि प्रतापा गुरु–तपना जेविं रत्नसानु जनीं. १४
“धर्म म्हणे, ‘सौभद्रा, दुर्भेद्य व्यूह, यत्न चालेना;
व्यूहपुरःस्थित अस्मत्- गुरु, कुरु-कटकेश, लेश हालेना. १५
‘गुरुनें सकल पळविले गज, जेविं मृगेश्वरें, समन्यूनें;

१ सेनापती,-२ सैन्यांनीं,-३ बलसागर,-४ संग्राम,-५ धीरवीररूप उत्तमहि त्यांच्या समुदायानें,-६ भारपीडित,-७ अर्जुन,-८ भावांसह,-९ सूर्यास,-१० मेरु पर्वत,-११ हे अभिमन्यी,-१२ सक्रोधें,-१३ बलवान् शत्रूचा नाश करणारा.

पूर्ण गुरुदया नव्हतां, व्हावें कैसें तथासम न्यून? १६.
'तत्काल मातुलें, कीं भेदावा व्यूह हा तुझ्या तातें:-
पांडित्य जें तयांचें, तुज पाठ असेचि, बा, स्वजाता! तें. १७
'म्हणतिल म्हणोत परे, परि म्हणेल मज ससैन्य यदुप हा-'साधु;
म्हणुनि व्यूह विभेदुनि, बा, स्वयशें तूंचि मंदुपहासा धू.' १८
"अभिमन्यु म्हणे,'चिंता करितां हे व्यर्थ काय, हो तात?
या वाक्यें बहु लज्जित कीं हे तुमचेचि पाय होतात? १९
'तातें कथिला आहे दुर्भेद्य-व्यूह-भेदनोपाय;
शिरतों, भय काय मनीं? आहेत सहाय, राय, हे पाय. २०
'व्यूहीं शिरेन शरेसा, मागें परतेन एक पदही न;
युष्मत्पद-प्रसादें होतिल युष्मत्सपत्न मदहीन.' २१
"धर्म म्हणे,'त्वदन्वित- द्वारें आम्ही समस्तही मागें
येतों रक्षाया तुज;-धावें स्वस्थैर्य, धैर्य, हेमागें.' २२
"मारुति म्हणे,'शिरे अहि- रदरचितें, जोविं, तद्विष द्वारें,-
त्वन्निर्मितें शिरेन व्यूहीं; टिकेल न द्विषद्वारें.' २३
"सौभद्र म्हणे,'शिरतों व्यूहीं-डोहीं जसा मतंगज-वो,
हरि-पोत दंति-यूथीं-कीं, दहनीं करुनियां पतंग जवीं. २४
'जें करिन आजि, होइल पितृ-मातुल-सच्चरितानुरूपचि तें;

१ शत्रु, २ मित्रांसहित,-३ कृष्ण,-४ मन्-उपहास,-५ दूरकर,-६ बाणाप्रमाणें,-
७ युष्मत्-सपत्न-तुमचेशत्रु,-८ हेम-अग-मेरुपर्वत,-९ मरुत्पुत्र-भीम,
१० त्वत्-निर्मित्-त्वांकेलेल्या,-११ द्विषत्-वार-शत्रुसमुदायें,-१२ अथवा,-
१३ सिंह-शाव,-१४ गजसमुदायांत,-१५ वेगा.

क्रव्यादांस खाया देइन उधळुनि बळें कुरूपचितें. २५
"ज्येष्ठपित्याला देउनि अभय, म्हणे तो सुवीर सूतातें,
'हूं, हांक रथ;' म्हणावी माय, सुभद्रा, सुवीरसू-तातें. २६
"तो सूत, सुमित्र, म्हणे, 'भो आयुष्मन्! कुमार आपण कीं?
हाकिन हेरि अरिवरि, परि कुरुगुरुशीं गांठि कठिन हा पण कीं?
"हासुनि सौभद्र म्हणे, 'हटकीन हटें रणांत भीमातें!
शक्राऽर्जुन-कृष्णाशीं करितां समर, न शिवेल भी मातें! २८
'द्रोणानीका मानूं जन सागर, मजहि सत्वरा मकर;—
घे काय न्यायपर- स्वच्छाश्म-नदीज-सत्व राम-कर? २९
"तन्निर्बंधें नीटचि चालविला रथ-विमानसा-सूतें;—
देती मम्मुक्तितें श्रित- मति-कुलजा जेविं मान सासूतें. ३०
"भीमादि सबळ सर्वहि ते उठले व्यूह-कोट फोडाया;
इकडुनि कौरव-कटकहि होय पुढें शत्रु-सैन्य मोडाया. ३१
"रथ थडकले, भडकले हय, शस्त्र जवन्हि धडकले वरते;
अन्योन्य, द्व्यंगुलेंही, राहों देती न धड कलेवर ते! ३२
"पावन असतां दोन्ही, करुनि सतुमुलाहवास, वध सेना,
व्यूहीं शिरे गुरु पुढें,-चित्तेंहि जयांत वांसेव धसेना! ३३
"व्यूहीं गमे सुभद्रा- सुत-गज-यूथांत जेविं बाल-हरी.

---

१ मांसभक्षकांस,-२ वीरपुत्रप्रसवणारी,-३ घोडा,-४ महादेवास, भीमास वा,-५ द्रोण-अनीक-द्रोणसैन्याला,-६ त्वरायुक्त,-७ मगर,-८ न्याय निष्ठस्वशिष्यभी ष्मजोत्याचेंसत्व,-९ परशुरामाचाहात,-१० तत्-निर्बंध-त्या च्याअतिआग्रहानें,-११ व्यूहरूपकिल्ला,-१२ दोनअंगुळेंभर,-१३ सतु मुल-आहव-अतितुमुलयुद्धास,-१४ रंई;-१५ सरसाऊनजाईना,-१६ सिंहशावक.

त्यावरि पडल्या सेना–त्या मंथाद्रिवरि जेविं, बा, लहरी. ३४
"बहुनाशीं एकाकी सौभद्र कलह करी समुत्सा; 'हे'–
असकृत् सूतासि म्हणे, 'सत्यशस्कर समर, हो, समुत् साहे.' ३५
"तच्चापलतेसि दुजी–दावील श्रीस काय मद नारी?
वाटे–करितो कौरव–संहार मनुष्य–काय मदनारी! ३६
"मूर्त वसंत गमे तो, गमति रिपु विपन्न ते करीराग!
कुरुकटकीं–पशु–निकरीं श्रीरुद्र तसाचि–तो करी राग. ३७
"समरीं [illegible]सि म्हणे रक्षप; 'गगनींच, करुनि आ, यत्नें.–
किं बहुना–हय, रथ, गज, गिळिले शोणित–नदींत आवर्तें. ३८
"तेव्हां, त्वत्पुत्रांचीं वदनें झालीं रणांत शुष्क रसें;
शोभे विजयोत्साहें अभिमन्यु–मुख प्रफुल्ल–पुष्करसें. ३९
"दुर्योधन स्वयें मग सौभद्र–वधार्थ धांवला कोपें;–
कलभ–मथन हरिसि तसें–त्याला तें कर्म वाटलें सोपें. ४०
"तें, द्रोण म्हणे, 'भट हो! रक्षिति सुर जेविं तारका सुरेसा,
रक्षा; अभिमन्यु न हो गुहेसा, कुरुराज तारकासुरसा. ४१
"भूरिश्रवा, शकुनि, कृप, कृतवर्मा, कर्ण, शल्य, यांसहित
धांवे ससुत गुरु; कसें होऊं देइल सनक्ष तो अहित? ४२
'सोडविला नृप जेव्हां, होय, नृपा, शस्त्र–मय नभ क्षण, हो!

१ लाटा, –२ हर्षयुक्तसा, –३ मानपशरीरी, –४ सदाशिव, ५ पायाळ, –६ करीरवृक्ष. ७ राक्षस, –८ शोवऱ्यानें, ९ विकसित, –१० करिशावक, –११ अमृतातें, –१२ षडाननसा, –१३ दैत्यविशेष, –* समुद्र मंथन करावयास घेतलेल्या मेरुपर्वतावर.

करितेचि त्या स्मरांचें तत्तेजोरुद्र-नयन भक्षण, हो! ४३
"आठवला जो मारुति- पासूनि सुटोनि वांचला तरणी;
बसती कुरुप-शिरीं पर- शर-शनिची तेधवांच लात रणीं. ४४
"मूर्च्छोत्थित हरिसा-तो उघडी, होउनि विमोह, दृशीतें;
स्व-विशिख-निकर-समीरें उडवी बहु शत्रु-शस्त्र-वृष्टीतें. ४५
"नृप न दिसतां म्हणे, 'हा! गेलों खाया, करूनि आ, जवळ,
तों कवळ पळविला कीं;'-पावेलचि आज लाज आजवळ. ४६
"सौभद्र बहु क्षोभे; गर्जे, पाहूनि कवळ हारित्यातें;-
जाणों अपराधी गज हटकी, दापूनि, जवळ हरि त्यातें.
"त्यां सिंह-नाद होय- व्याळां पुच्छीं जसा पद-न्यास;
वेष्टुनि हाणिति सर्वहि, देखवतें ही न तें तदन्यास! ४८
"प्रभुंचा मर्मीं हाणी, सर्वांसहि, तीन तीन शर मोंचा.-
वाटे बहु सिंहांशीं समर करी कुंभिनी-पोत शरभाचा. ४९
"द्रोण-द्रौणि-कृपादि प्रबल बहु भटांसही न तो आटे;
फाटे न दृष्टि पुढें वळे; जळेंदीं मूर्तवातसा वाटे. ५०
"होय पुढें अश्मक-पति, कीं तत्तेजें न वीर करपोत;
खंडी तद्धय, सूत, ध्वज, धनु, भुज, शिर, मंडील नरपोत.
"पडतांचि अश्मकेश्वर कर्ण-द्रोणादि करिति शर-वृष्टी,
फुल्ल-पलाश-श्री तो निववी, भिववी, सेनाधि-पति-दृष्टी. ५२

१मरनाचें,-२सूर्य,-३दुर्योधन,-४आपल्याबाणसमुदायरूपवायूनें,५ग्रास,६आजे
ळ,-७सर्पाला,-८पायठेवणें,-९तत्-इतर-त्या अभिमन्यूवांचूनदुसन्यास,-१०प्रभुचामा
चा अभिमन्यु,-११रागावलेलाबालक,-१२आटोपे,-१३सेना-१४मेघापासूनवायू,१५तद्-हय
त्याचेघोडे,-१६सारथी-१७कोडेनें,-१८अर्जुनपुत्र,-१९हंस.

"भेदुनि शरें उरस्थळ, चळचळ बल-जलधि कर्ण कंपविला;
मूर्च्छित करूनि मद्रप, सौभद्रें तत्प्रताप संपविला. ५३
"एकें क्षुरेण वधिला, बाणें एकेंचि दीर्घ-लोचन, हो;
एकेंचि कुंड भेदी, गमले ते घूक-तो विरोचन, हो! ५४
"मानी वीर पळाले, गुरुनें हि निवारितां तडक, राया.
स्यंदन शीघ्रहि पिटितां, सांगति सूतांसि तांतड कराया. ५५
"झाला पुढें महाबल, शल्यानुज जो, तयासि तो खपवी.-
द्रोण-जसा गिरि पावुनि पर्वत-पातन-जयास तोंरव पवी. ५६
"मर्दी मद्रप-कटका-अक्षरबला जेविं तारकाराती;
शोभेल काय परचमू त्या? तो पूर्णविनार! कारा ती! ५७
"सप्रेम पार्थ-पुत्रा- प्रति पाहुनि, तत्पराक्रमें डोले;
कुरुपति परिसत असतां, द्रोण कृपाशीं कृपाभरें बोले. ५८
"हर्षविती मज पुत्रा- हूनि, नव्हे हा कुमार सामान्य;
धन्या सती सुभद्रा! नंदन जीचा कुमारसा मान्य. ५९
'माराचें सकळहि बल, परि, सुज्ञा! तत्व वद, न कां मारी?
वाटे-धृत-रण-कुतुका ऽच्छादित-बहु-बाहु-वदन कौमारी!' ६०
"कुरुराज म्हणे, 'कर्णा, कुरुगुरु पळवील अंतकालाही.
गरुडापुढें यमोऽयहि काय न पावेल अंत कालाही? ६१
'परि झाला त्या शिष्य- स्नेहानें मूढ हा तपोराशी.

---

१ पुंबळ,-२ सूर्य-३ मारी,-४ हर्ष,-५ वज्र,-६ तारक-असुराति-तारकासुरशत्रु-कार्तिकस्वामी,-७ बंदिशाळा,-८ कार्तिकस्वामी,-९ सत्यवद,-१० शिव,-११ यमासारिखा उग्र,-१२ कालसर्प,-१३ द्रोण.

स्तविता भाट तसा कीं, वाटे जोडील हात पोराशी. ६२
'बाला दिलें बल जसें, द्यावें दहनाचिया लवा वातें;—
हें पाळावें पदरें, दीपहि जेणोंचि माळवावा तें? ६३
'गुरुनें, करूनि उपेक्षा, केला दुःसह, असाध्य-आमयसा—
पसरिल न जग गिळाया रुद्रप्रियभूत कोण आ मयसा? ६४
"दुःशासन बोले जड- काय मदन हा निकाम उग्रोस;—
मद्बाहुराहुच्या शशि- धरसा शिशु हा निकां, मउ ग्रास! ६५
'आहे मच्छरनिकरा अवगत पांडित्य, जें अजेगरातें;
या असुतदपत्यातें गिळिल—ग्रासी जसा अज गरातें. ६६
'मरतिल सकृष्ण पांडव; धीरहि ते सोडितील आभास;
आवास अंतकाचा प्रिय-शोक-हरिस म्हणेल, 'आ वास. ६७
'एक-क्षयें समस्त- क्षय होय-असें, पहा, कसें करितों;
सौभद्र-मस्तकासह, आतां, निज कटक-संकटा हरितों. ६८
"ऐसें बोलुनि धांवे— विधुसि गिळायासि जेवि राहु निघे.
कार्ष्णि म्हणे, 'ये, देतों सच्छलफल; पळे समोर राहुनि घे.
'सर्वंसहे सही बहु देतो खल-काय-भार ताप सदा.—
ताता भीमाचें हें नोहे बल काय, भारतापसदा? ७०
'माझे न पावतिल तव हननें साधूंत ह्रीमति ज्ञाती.—
जरि खल म्हणतिल भया, आम्ही साधूं तरी प्रतिज्ञा ती. ७१

१कुणगीला,-२रोगसा,-३शिवास,-४चंद्रासारखा,-५चांगला,-६मत्-शर-निकर.
७अ-सुत्-अपत्य,-८शिव,-९विवातें,-१०सह अर्जुन,-११धैर्यास,-१२स्थान,-१३चंद्रास.-१४अभिमन्यु.-१५सत्-छल-फल-साधुच्छलाचें फळ,-१६पळभर,-१७पृथ्वी,-१८भारत-अपसद-भारतांतदुष्टा,-१९लज्जेमति.

हननींचि बहुमत झालें पाहिलें तुमच्या न नातवा वानें
वदनें न वोलवे तरि शौर्य शिशूचें मनांत याना तें ११
कार्ष्णि म्हणे ये शोकद. हा तात साधु-गंजन कुशीला
आलें सोतुमर्नीच्या मळवाया वंश अर्जुन कुशीला १२
तूं त्या योग्य सुमित्रा- सुत धरि खळदुर्मिळा सुनामा ज्यां
काकी म्हणत्ये तुच्छा करुत यशो उर्मिला स्नुना माज्या १३
लक्ष्मण हें योग्य गत्ना योग्य तुला मेघनाद हें नाम
रावणासा बाप तुझा या माझा शृत्रियशा जसा राम १४
धिक्. प्रथम मग करूनि रण वधिला लक्ष्मण किरीटितनयानें
हें पुत्रशोकविषफळ दिधलें दुर्योधनासि अनयानें १५
सुत मरतां नृप म्हणे हांडेल अधर्म म्हणुनि न चपापा
सारे मिळोनि मारा शत्रूंच्या एक पळहि नच पापा १६
द्रोण द्रौणि बृहद्बळ कृतवर्मा कर्ण कृप असे सात हे
वळले घनसे त्यांनें कार्ष्णि महावातसा न तो साहे १७
कोंडुनि म्हणत-होते शिशुनें मारूं दिवा जसा गांजे
तो त्यांसि गंजुनि जय- श्रीयोगें श्रीनिवाससा साजे १८
क्राथसुत मथुनि केला विरथ कृपाचार्य वा तुज्या नातें
करूं कीर्तिंद-वृंदारक वधिता स्मरलें न जोंतु न्या नातें १९
वधिनां बृहद्बलानें म्हणती क्रूर सर्व कांपर्वाना कीं

१ स्तुती करवे. २ साधुदलक्का, ३ दुर्योधनाचीच्या, ४ काजळ, ५ पांडवां, ६ लक्ष्मणदावारिपि, ७ खलांलाकृपाप, ८ अर्जुनपुत्रानें, ९ त्या, १० जयद्रथ, ११ कृष्णा मातिरवा, १२ नातवानें, १३ कदापि. + नाहा.

विरथ करूनि पळविला शल्य जगा तारकासुर कुमारें
शत्रुंजयादि-पंच- प्रबळ-रथी मारिले मग कुमारें १०
शकुनि म्हणे कुरुनाथा । हा सर्वांहीं मिळोनि मारावा
झाले यास भट जसे भीती गज शिशु-मृगांस मारावा ११.
मारिले एकेकानें शर गोचर शूर कोण न खपविला
मृदु पूर्व परि न कंपद काय नृहरि-रक्तशोणनख पविंडा १२
द्रोणासि कर्णहि म्हणे गुरुजी मज तो नसेचि आवांका
आवांका युक्ति म्हणे न तुम्हास हि हा करूनि आ वांका १३
गुरुहि म्हणे कर्णा हा नक्षकचि गरळ करूनि-आ वमला
आहे संकाचें परि सांडुनि गेला मघांचि भाव मला १४
मज भंगुनि हि रक्षविता या हा सामान्य काय गा बाळ
उतरुनि सांडावा या- वरुनी सर्वस्व काय गाबाळ १५
याचा धन्य गुरु जसे धन्य प्रद्युम्न गुह कुशल वांचे
न दिसे आज मज रणीं जो सौभद्रापुढें कुशल वांचे १६
स्पष्ट अभेद्य-कवच हा वीरसुकुमार अंगपा त्याला
कीं अग्निवर्णहि याचें त्यावें सुकुमार अंग शल्याला १७
त्यां विजयासि पढविली विजयानें कवचधारणा तनया
भेदुनि कवच करिल स्फोट हि निज-तुल्य व्यथा रणांत न या
जरि इच्छिसि हनें सुत- कुरु- पति-शोक-प्रशम कार्मिच्या पातें

१ कार्तिकस्वामीनें. २ बाळासि इच्छनीस ३ दुर्योधनास भव्य. ४ सकानें भावसेवन. ५ कल्याण ६ धैर्य. ७ मोठा. ८ अभिमन्यु. ९ विष. १० इंद्र. ११ रामपुत्रानें. १२ अर्जुनपुत्र १३ कर्णा. १४ इंद्र. १५ मृत्युपुत्रजे कुरुसैन्याच्या शोकशांति. १६ अभिमन्यूच्या.

तरि आहूं पाद करां आंधीं तोडोनि कार्ष्णिचोपातें १९
कार्मुक गुण हय सारथि खंडुन इतुकें अशक्य बापा हें
तें यांत घडेल तुला तें तरि करि करुनि यत्न वा पाहें २०
अक्षतधनु तोंवरि हें वीरशिरोरत्न नाऽवरायाचें
यास्तव सर्वांहि रसूं आजि करुनि यत्न नाथ रायाचें २१
परशु कुर्वशिरासि जसा खंडी सयदायकास नाकाचा
तैसाचि कर्ण करिता होय नम्र सायकांसना[6] काचा २२
मारी हरीस साह्य कृतवर्मा सारथीस गौतम ही
परि न गडबडे तो पितृ- मातुल-सम शत्रूकीर्ति भ्रांतमही
सौभद्र विरथ होतां धर्मज हि करिति शस्त्रवृष्टीतें
तें निष्कंपत्व पाहुनि झांकिति बहु-सदय-साधु दृष्टीतें २४
म्हणती हाणा मारा पाडा ह्या काय पाहतां तोंडा
कोंडा प्राण त्यरतीं वाळ बुडो कर्दमीं जसा धोंडा २५
तो खड्ग चर्म घेउनि अवलंबी वीरनायक विहाय
संकट पडतां सांडुनि धैर्यासि म्हणेल काय कवि हाय २६
पाहुनि गरुडा गगनीं धैर्य जसें काय कौद्रवेयांचें
तैसेंचि भगवदनुजा-[11] तनुजा कुरुनायका द्रवे यांचें २७
केवळ हृदयीं भ्याले जे जे ह्या पार्थपरीस[14] गाळाला
शिरले रथातळीं मग घेतील शिरीं न काय गा ढाला २८

१ अभिमन्यूच्या धनुनें, २ अ-क्षत-धनु-धनुष्यभंग न होई तों. ३ वीरांचे शिरोरत्न. अभिमन्यु, ४ दुर्योधनाचें. ५ इंद्र. ६ धनुष्यास. ७ कृप. ८ निर्दयत्व. ९ विरथी. १० आश्रयकर्ता. ११ आकाश. १२ सर्पांचें. १३ भगवत्-अनुजा-तनु-ज-सुभद्रापुत्राला. १४ वज्रापेक्षां

कंकेयू धीर मम  हिप दश हे मुख्य मुख्य मीं कथिले ३८
केला चूर्ण सहय-रथ  दुःशासन सूनुचा गदाघातें
साहे न परबलातें  जेंवि हरिनामसमनु गदाघा तें ३९
बाहुप्रतापचरितें  दावी तो पार्थकायज गर्दीशें
यादें वर्णायला यम-  सा यमकापार्थ काय जगदीशें ४०
त्या सौभद्रावरि खल-  सा गरगरगर गदेस फिरवीत
दुःशासनसुत धांवे  निज भुजभुजगप्रताप मिरवीत ४१
युद्धचमत्कार रुचिर  रुचिर प्रकटुनि महागद घातें
अन्योन्यकृताऽघातें  वा मूर्छा पावले अदभ्रा तें ४२
आधीं उठोनि उठतां  सौभद्र-शिरीं प्रभो गदा घाली
विवश करी ती दुर्घार-  हार्या जेंवि प्रभंगदा घाली ४३
पडली जगीं कराया  प्रंसकंसुर विरस मस्तकाऽपरि ती
सूर्वार सौभद्रतनुहि  ओकुनि सरुधिरसमस्तकोप रिती
आधीं श्रम बहु झाला  होता तो त्यांतही असावध हो
केला दौःशासनिनें  धर्म नय त्यजुनियां असा वध हो ४५
प्रेक्षक सुर मुनि सज्जन  बहु हळहळले किरीटिसुतपातें
रडला पाहुनि सत्य-  ब्रह्मज्ञहि नारदादिकृतपा तें ४६
त्यांचा संकल्प प्रिय-  कृतशोकें जिष्णुचे असें स्वपावे
तें नव पुष्पचि झाले  मुदितें इतर अहितेंही असुख पावे ४७

१ मंच, २ संगरूपवान, ३ अभिमन्यु. ४ शेंकडों. ५ बहुत. ६ प्रतिहार करण्यास असमर्थ. ७ शांगदेणारी पानक पंक्ति; ८ पहाणारे जे देव त्यांना हरिरस करण्यासाठीं, ९ शक्ति, १० प्राण, ११ अद्भुतही. + नारदादितापस, * आनंदित.

धर्म वाप्तदांस म्हणे वीनि परमदुर्लभा अगा मरणीं
कां रडुनां सोसाई वत्सें यश जोडिलें अभिराम रणीं ४८
शिबिरींच पळांत म्हणे गतदा बाहेर न वहुवस हाय
राम नाउनि कटकानें धैर्यें शिबिरासि जाय समुदाय ४९
कवच विकळ होउं न दे धर्मासि जसा तुरंगमा तंग
हनशोकाऽवश शिबिरीं जेंवि सिंहा कुरंग मातंग ५०

## अध्याय ४

## चतुर्थदिनयुद्ध

धर्म म्हणे हा हा म्यां मंदें दवडुनि कुमार मागविला
बहुवीरसभूत दिसल्या अधिक सुभद्रा उमा रमा गविल्या १
अर्जुन-कृष्ण-सुभद्रा- कृष्णा-कुंतीस काय सम नावुं
काळ न शंके केंवा तद्दर्शनीं पुत्रकायराग जावुं २
अद्यापि उत्तरेचें मुख पीत असेल वहळ हळदीनें
म्यां जावें लब्धसन्निध- नाशां करिजेल न हळहळ दीनें ३
तुज उत्तर मुक्ति दिल्हा म्यां कापाचास मान विश्वास
कलिकाल काय बुडविल मज बहु-पापागमान विश्वास ४

---

१ असार. २ बहुतां. ३ शिबिरामध्यें पळांत [illegible] ४ देश-गावटी, ५ मृग-हरण, ६ वीरमाता. ७ द्रौपदी. ८ पुत्र अभिमन्यु [illegible] ९ पिंवळें. १० [illegible] ११ जगदात्मा, [illegible] पुरुष.

कथिलें कसें असें मज - धर्मा करवाल काढ कलहानें
मृत्युमुरवीं कुलकर-गुण- शर्मा-कर-बालका दकल ह्मातें ५
धर्माच्या सुतशोका शमवाया ये महातपा व्यास
ज्या जोडिले त्रिभुवनें प्रभुच्या जैसे च हात पाव्योस ६
तो मुनि म्हणे श्रुतिस्मृति- शास्त्रज्ञा पांडवा नकोचि रडूं
शोकभरें प्राकृतसा बा कृतशाकल्य तूं नको चिरडूं ७
गेला उत्तमगतिला पुरुषोत्तम तो जगीं असामान्य
शोच्य नव्हे बा धर्मा पुत्र असावा कुलीं असा मान्य ८
मृत्यु हरितसे सर्वां अमरांसहि कवण मृत्युला चुकवी
ऐसें जाणुनि तत्त्व व्यसनांत न मोह पावती सुकवी ९
धर्म म्हणे हो गुरुजी मजला मृत्युस्वरूप कळवा हो
या तमावरि तुमची सूक्तिसुधा-सिंधु एक पळ वाहो १०
व्यास म्हणे मी कथितों इतिहास पवित्र तुज पवित्रास
बाधों न दे बुधा जो शोक महेंद्रा जसा पवि त्रास ११
होता कृतीं अकंपन नृप तो हरि गांठिजे जसा हरिनीं
तन्नंदन हरिसमबल हरिनामा मारिला रणीं अरिनीं १२
शोकार्त तूं जसा मज पुससि अकंपनहि नारदा नमुनी
मृत्युस्वरूप सांगुनि करि त्यातें मोहपार-दान मुनी १३
जें तूं मज पुससि पुसे तेंचि अकंपनहि नारदा नमुनी
मृत्युस्वरूपकथनें त्यासि करी मोहपार दान मुनी १४

---

१ तरवार, २ मुरली, ३ सु-उक्ति-सुधा-सवचनामृत, ४ वज्र, ५ कृतयुगीं, ६ सिंह;
७ अकंपनाचा पुत्र, ८ इंद्रासारखा बलवान.

पूर्वी बहुभारार्ता ऐसें चतुराननास धरा विनवी
वाटे भय दाटे नच आटे किति म्यां प्रजा धरावि नवी १५
न सुचे युक्ति चतुर्विध- भूतग्रामासि संहरायातें
कोपे ब्रम्हा जाणों त्या भूतांचेंचि अहेराया तें १६
तेव्हां विधिच्या रोम- च्छिद्र-वदन-नयन-कर्ण-नासानीं
वमिला वन्हि अशा या आइकतों कोपवर्णना कानीं १७
वनवन्हि तृणासि तसा भूतग्रामासि वन्हि तो कवळी
रुद्र जगत्क्षयसमर्था धांवुनि ये पद्मयोनिच्या जवळी १८
रुद्र प्रभुला प्रार्थुनि लोकक्षयकारि तेज आवरवी
इतर किती विनवाया तेजस्वीही धरी न आव रवी १९
प्रार्थुनियां आवरवी जेव्हां कोपानलासि मदनारी
प्रकटे रक्ता कृष्णा- पिंगाक्रूरदृष्टिविभ्रमद नारी २०
तो प्रभु सांगे ठेवुनि मृत्यु असें नाम तेंचि काम तिला
त्या उग्रनामकार्य- श्रवणें होइल न खेद कां मतिला २१
मृत्यु म्हणे प्रभुजी हें काम बरें तेंचि कार्य करवा जी
योजावा जन सुपथीं धरि वीरेंहि कार्यकर वाजी २२
ऐसें म्हणुनि रडे कीं गुरुहि रडूीलासि सोडवी पाणी
प्रभु अश्रुबिंदु तीचे न गळोंदे क्षिप्र ओढवी पाणी २३
द्रुहिण म्हणे मृत्यो तूं माझ्या होशील मान्य उक्तीतें
कीं जन्मशीर योजित असतां संहार-हेतुयुक्तीतें २४

१ भारपीडितपृथ्वी, २ पातक, ३ वडवाग्नि, ४ ब्रम्हा, ५ शिव, ६ घोडा, ७ हात, ८ ब्रम्हदेव.

लघु गुरु असें न म्हणतां ओढुनि घे सर्व जीव सरसकट
जैसा गंध गजाचा ओढुनि हरितो अलीस सरस कट २५
माझ्या वरें तुला अघ कोणींहि न लावितील अनेघेनें
ऐसें बहु समजावी परि न तिचें क्रूरकार्य मन घे तें २६
करितें आज्ञा ऐसें स्पष्ट न वदतांहि देवे हर्षविला
तो पूर्वदग्धजीवां- वरि करुणामृतपयोद वर्षविला २७
एकें चरणींच उभी धेनुकनामाऽश्रमीं नृपा होती
तप एकवीस-पद्में तपली गमली खरी कृपा हो ती २८
त्यावरि चवदा वर्षे पुण्याऽरण्यांत ही सती तपली
मग अयुत पद्म मृगसह- चर्या करितां पितामहा जपली २९
जीचें अतिशीतोदक त्या नंदेमाजि जी उभी हर्षे
होती निजनियमातें संरक्षुनियां अशीतिशतवर्षे ३०
तिलुकेंचि कौशिकीच्या तीरांत तसेंचि पंचगंगांत
वेतसकांतहि तपली जों ये केवल कृशत्व अंगांत ३१
तपली तुहिननगीं रुरु- यजनस्थानीं हि खर्व-वत्सर ती
तच्चित्तरति नर्या बहु जशि जननीच्या स्तनींव वत्सरती ३२
गंगातट-मेरु-मलय- पुष्कर-गोकर्ण-नैमिष-वनांत
तपली धरिलें तेजें उग्रत्व हि वाटलें प्रिय मनांत ३३
भेटे प्रसन्न होउनि विधि आचरतां अनंत तप तीस
स्मित करुनि म्हणे मृत्यो कां दुर्धर नियम धरुनि तपतीस ३४

१ गंड, २ निष्पाप, ३ ब्रम्हदेव, ४ दशसहस्त्र, ५ मृगांसहवर्तमानसंचार, ६ आठ हजार, ७ विश्वामित्रनदी, ८ हिमाचलपर्वतीं, ९ देवांचीयज्ञभूमी, १० वर्षे, ११ तिच्याचित्ताचीप्रीति.

मृत्यु म्हणे कांपवितो प्राणिवधाऽधर्म म्हणुनि नप वरिलें
जगदीशा आमय मज द्यावे त्वां सर्व विनतभय हरिलें ३५
द्रुहिण म्हणे न अधर्म · स्पर्शेल मृषा नरेचि विधिवाणी
सांनि सद्गुरूपदेश न बुडवी कोणाहि अमृतनिधिवाणी ३६
मृत्यु म्हणे जरि आग्रह तरि भूतांची अशीच हो हानी
भेदावे प्राणिवपु द्रोहे-र्ष्या-क्रोध-लोभ-मोहानीं ३७
कर्माऽनुरूप दुर्गुण रोग प्राण्यांसि नित्य खातील
तुज काम कोप सोडुनि करितां संहार साधु गातील ३८
तव अश्रुबिंदु धरिले रोगांचा तोचि होय हा निकर
प्राण्याऽसुद्रोहनिकर ग्रीष्मीं रवि जेवि तोयहानिकर ३९
संहारनिमित्त असी मृत्यु विधिकृता अकंपना आहे
रडतोसि पुत्रमरणें कां मृत्युग्रास सर्वही बा हे ४०
करुणानीरद नारद मुनिच्या वर्षोनि उक्ति गारा या
देती अकंपनाला तापापासूनि मुक्ति गा राया ४१
सांगे शोक शमाया ऐसा इतिहास हा शुभ व्यास
याच्या श्रवणें श्रोते निवती पावोनि ओशक भव्यांस ४२
धर्म म्हणे पुनरपि मज निववाया कीर्तिसत्सुधा भरिते
चरितें राजर्षींचीं सांगा मज याचि हृद्गरा वरिते ४३
व्यास म्हणे जरि म्हणसी श्रवणीं राजर्षिचरितरस ओना
तरि एक श्वित्यनृपति - सुत सृंजय पांडुनंदना होता ४४

१ रोग, २ नम्राचें भय, ३ ब्रम्हा. ४ मिथ्या, ५ अमृतनिधीसारिखी, ६ ग्रीष्मऋतुमध्येंजलशोष परवीकरितोनसा, ७ दयामेघनारद, ८ वर्षोपल, ९ तत्काल, १० कल्याण, ११ कीर्तिरूपअमृत १२ कर्पी १३ हेसर्प

सख्येंकरूनि पर्वत नारद आले तया पहायाला
सृंजय पूजी प्रेमें प्रार्थी सर्वस्व ही वहायाला ४५
तों तत्कृता तयाप्रति येउनि वंदुनि पदें उभी राहे
पर्वत म्हणे नृपा रवि- भा कीं श्री कीर्ति कोण हे आहे ४६
भूप म्हणे आली वरें- वर मागायासि पर्वता तनया
हे कन्याकृतिचिंता- ह्रदिनीशांत करिति सर्व तात नया ४७
नारद म्हणे नृपा मज योग्य जरि तुझें म्हणेल मन दे हें
कन्यारत्न न केवळ अर्थिकरीं देति साधु जन देहें ४८
भूप म्हणे योग्य सुता- रत्ना तूं जेविं आनना रदन
कोण सुबुद्धि म्हणेल स्वप्रियकर योग्य अन्य नारद न ४९
स्तव्यांचि पिशाचसखा झाली जाणुनि सुपर्वता वरती
स्तविते न ठेविती जरि मन हरिवरि कीं सुपर्वतावरि ती ५०
पर्वत म्हणे न कोण्हा तूं बहुकाळिहेतु वांकशी वरिली
गति तुज नसो मनें म्यां वरिली जी हे तुवां कशी वरिली ५१
वाग्दानादिविधिविना हृदयें वरिली म्हणोनि कशि भार्या
तुजहि मजविना स्वर्गति न घडो कीं व्यर्थ दूषिरी आर्या ५२
ऐसें परस्परांतें शापुनि सकलारिकाल बा हो ते
सृंजयसदनीं नारद पर्वत मुनि बहुत काल बा होते ५३
ज्या ब्राम्हणांसि पूजित होता पुत्रार्थ भूप तो भावें

---

१ सृंजयाची कन्या, २ रविप्रभा, ३ लक्ष्मी, ४ नामकाय, ५ श्रेष्ठ, ६ कन्यारूपी चिंतानदीचें शांत, ७ याचकाच्या हातीं, ८ शरीरें, ९ दंत, १० अन्य, ११ स्तुतिलायोग्य, १२ शिवाप्रति १३ सकल अरींचे कालरूपी नारद पर्वत; + वाग्निश्चयादिक क्रियेशिवाय.

ते म्हणति नारदा कृत- दीपें सृंजयनिशांत शोभावें ५४
त्यांशीं देवर्षि जसा प्रियपुत्राशीं सुखें वदे तात
तुज हे सुसंतति जशी सुजनांसी जन सुखेंच देतात ५५
बोल जसा तुज व्हावा ऋषिवरवचनें तसाचि कृत पाहें
त्या सृंजयासि वदला होउनि बहुसुप्रसन्न कृतपा हें ५६
भूप म्हणे विख्यात स्वायुधदहनांत अहित होमुनि हो
यन्मलमूत्रादि सकल कनक असा पुत्र मीं हित हो मुनि हो ५७
दिधला तसाचि वर सुत- अद्भुत झाला तयासि तो जनक
ठेवी नाम सुवर्ण- ष्ठीवि असें तो हगे मुते कनक ५८
त्याचें कनकचि सारें मल मूत्र स्वेद लाळ सेंबूड
कां न म्हणेल तशाचें मोहीं ताताशि बाळसें बूड ५९
भाग्यभरें बहु भारी भासे सृंजयपुरी जशी अलका
पर ईतचि धन वाढे म्हणउनि दृष्टांत होय हा हलका ६०
किं-बहुना कोणेया बा अनुपायज्ञ-लुब्ध-घोरांनीं
चोरांनीं हरुनि बळें वधिला कनकार्थ बाळ तो रानीं ६१
नृपति म्हणे हा हा हे होइल मिथ्या शिशो कदा वार्ता
निववील मज कवण तुझ्या कुशलसुधेंकरुनि शोकदावार्ता
नारद त्यासि म्हणे गा तुज उचित नव्हेचि शोक तोकाचा

---

१ गृह, २ संजयाशीं, ३ क्षेमालिंगन, ४ आयुधाग्नींत, ५ शत्रु, ६ ज्याचे मलमूत्रादि, ७ सुवर्णष्ठीविपुत्राचे, ८ बहुत काय सांगावें, ९ उपाय न जाणणारे लोभी क्रूर, १० कधिं, ११ शोकदावानलानें पीडित जो मी मला, १२ बालकाचा, < कुबेरपुरी, ऋ पूज्य, * सुवर्णाकरितां.

तो कांचा[1] स्पर्शमणी[+] त्यागुनि जो काय वेंचितो काचा ६३
पणजाला आजाला न रडसि कृतपोषयत्न[2]-बालोही[3]
श्रेयस्कर ते कीं हा विरहगरद[4] सुगुणरत्न बालाही[5] ६४
कथितो पुण्यतर तुझ्या पुत्राहुनि पुरुष ऐक त्यास रड
कवि म्हणति उगोंच शिरः- कंपसह हि सूक्तऐकत्या[6] सरड ६५
होता यज्वा[7] दाता शक्राहुनि लब्धरस मरुत्त रणी
ज्याची सदुपायनियति इष्ट स्रुगति तेविं न समरुत्तरणी ६६
यज्ञ कराया प्रार्थी स्वर्गी त्या स्वकुलगुरुवरा जीवा
चुंबी शिरें[11] पद-युगा जेविं मुखें तृषितमधुप[12] राजीवा[13] ६७
सुरपतिं सोडुनि जाणें नृपयज्ञा उचित हें नव्हे मातें
ऐसें मनांत आणुनि जीव उपेक्षी तया शुचितमातें ६८
भेटे नारद त्याला फिरतां पायांनि फार खेदास
ऐकुनि वृत्त म्हणे हो लेखावे सर्व सारखे दास ६९
सांगे सुरर्षि आहे गुरुबंधु तदीय-वृत्ति पैशाची[15]
संवर्त नाम त्याचें त्यासि यशाची स्पृहा[16] न पैशाची ७०
वाराणसी-शवीं शिव-[17] धी तो वळखावयासि हे खुण गा
वळखावा बहुयत्नें अतिकृपणाचा नृपा जसा कुणगा ७१
वाराणशीपुरीच्या द्वारीं मांडुनि कुणप[18] उभगावा
पुसतां दहनीं शिरलों म्हण कविनीं स्वस्मताप धुंम गावा ७२

---

१ कच्चा. २ तुझ्या पोषणाचा केला यत्न जाणें, ३ आपालाही, ४ वियोगरूपविष देणारा, ५ बालसर्प, ६ उत्तम भाषणा शिर डोलवीत ऐकणाराला, ७ यज्ञकरणारा, ८ मरुत्तनागा, ९ वायूसहितनौका, १० बृहस्पतीस, ११ शिराने, १२ भ्रमर, १३ कमला, १४ इंद्राला, १५ पिशाचतुल्य, १६ इच्छा, १७ कल्याणबुद्धि, १८ शव, १९ तडाक्याने, + परीस.

छल सोसितां मरुनें गुरुमंत्रबळें विशंकमद नमुनि
होय परम इष्टवरद शिष्टवर दयाप्रसन्नवदन मुनि ७३
भक्ता अभयप्रद जो इतरां लोकांस काय संवर्त
घालील न शरणागत कार्या तो कास काय संवर्त ७४
करितां मरुत्त मख ये शतमख उचलूनि वज्र माराया
कांहीं चालों न दिला संवर्तें तदभिमान वा राया ७५
ज्याच्या मखीं सभासद सुर सर्व मरुत्समूह परिवेष्टा
म्हणति परस्पर पुरुक- द्विज जरि पद न धरि पोट परि वेष्टा ७६
शक्रा धनदा देऊ उधळुनि बहु कनक तो त्रपो दास
म्हणउनि गुरु दे ज्याला कांचनमय तुहिनगोत्रपादास ७७
केली सफला ज्याची संवर्तें सर्वपावनसेवा हा
ज्याच्या राज्यांत म्हणे नस्कर दारिद्र्य दुःख नरांवे हा ७८
राहे पथींच अखिल विप्रजना बहुत दक्षणा दिदवी
त्या सुगुणसागराचा पावेल न अंत रूकविधी-टिदवी ७९
कां रडसि सुताकरितां यज्वा दाता असा मरुत्त मरे
होता बहुप्रकारें त्वत्तनयापरिस परम उत्तम रे ८०
देवर्षि म्हणे संजय- राजा दुसरा सुहोत्रनृप होता
न तसा दुजा प्रतापी अहित-महीपति-महाहुती-होता ८१
त्याच्याराज्यामध्यें वर्षति घन बहुत वारिपरि सोनीं

१ शंकामदराहित, २ प्रलय. ३ यज्ञ, ४ इंद्र, ५ वाढपी, ६ लज्जा, ७ हिमाचलपाद, ८ यजनिकीर्षा, ९ चोर, १० नसावें, ११ कर्याची वुद्धिरूपटिटवी समुद्र तीरींचा पक्षी, १२ शत्रुरूपीराजांचा आहुतीचा हवनकर्ता, १३ रुपयें, + नामविशेष. ॐ यज्ञकर्ता.

चित्तीं मिथ्या न म्हणे हें परमाऽश्चर्यकारि परिसोनी ८२
ज्यां तद्राज्यांत नद्या वापी जे कूप काय कासारें
तत्तोय पंक शेवाल कनकचि तें मनुजनायका सारें ८३
त्यांतील स्वर्णमय प्लव दर्दुर मकर मीन कांसव हो
ऐसा सभाग्य न करिल होऊनि गुरुचरणलीन कां सर्व हो
जें हेमयाद पडलें मेघां-तुनि तोंहि हेमयादा वी
अद्भुत दारवविल्या आति- अद्भुत नृपभाग्य हें मया दावी ८५
यज्ञांत सर्व सोनें दे छत्र विल्या न देववे दानें
त्या यादांचीहि दिलीं यजिले जे उक्त देव वेदानें ८६
जो हयमेध-सहस्त्रें सविधि यजी वीर राजसूयशतें
परवीरसू न जें तिल मिरवि बहु स्फहोत्रराजसू यश तें ८७
मेला असा हि कोणि हि जन न मृतिस करुनि पुण्य नरतो कीं
वद आपणांत अथवा गुण ऐसा कवण पुण्यतर तोकीं ८८
हयमेधसहस्त्रांचे जेणें केले सहस्त्र सत्रांत रे
ऐसाहि अंग मेला कालाला कोण वरुनि जन्म तरे ८९
जो शतसहस्त्र देता- झाला यज्ञांत दक्षिणा कन्या
मग उत्तरोत्तर अधिक वर्णाव्या दानजाति किति अन्या ९०
मखवनट नर्तकसुख तें ऐकुनि हि दिलें नृपा सुख न कानें

१ त्याच्या राज्यांत, २ मोठीविहीर ३ तळीं, ४ शेवाळ, ५ पानकोंबडी ६ यज्ञ, ७ सुवर्णजळजंतु, ८ मयासुरास, ९ वापाला जें न देववे तें दिलें, १० यथाविधि यजन करी, ११ सुहोत्रराजाची माता जें यशामिरविते इतरवीरसून, १२ बाळकाचें गायीं, १३ अश्वमेधसहस्त्रांचे सहस्त्र केले, १४ श्रेष्ठ, अंगनामक.

अंगें मखक्रिया मरु- मार्गी केली कूपखनकानें ११
तुजहुनि चतुर्गुण बरा खसुआपरिस पुण्यतर अंग
तोही मेला राया का रडसी सोड शोककरसंग १२
देवर्षि म्हणे राया श्रवण तुवां तो नसेल शिबि केला
ज्याच्या कीर्तिहुनि उणी म्हणति सुकवि अमृतवर्षि शिबिकेला
युद्ध हता ऽहितनृपहृत- वित्तें विष्णवादि-सर्वदेव यजी
गो-ब्राम्हण-प्रजाऽवन निजधर्मकरीं च सर्व देवयजी १४
श्रीगणपतिजवळ गणक शिद्धांत-रहस्य जो सुधी सिकता
तो त्याबळें न मोजिल कां गंगासिंधुजंतुसह सिकता १५
मोजील वर्षधारा तारागण ही सुमेरु पाषाण
शिबिदत्तधेनु वर्णिल जरि वरदेश्वर म्हणेल वाखाण १६
रथ हयचतुष्टय जसें प्रेरित असतो कवि प्रतोदानें
वपु बोधें प्रेरी बहु रुखवी अरत्तोक विप्र तो दानें १७
बहु अश्वमेध केले बहु गो-कन्यादि-दक्षिणा दिधल्या
कवि म्हणति कंठकर्णीं सन्मुक्तावृंद यशोभिध ल्या १८
ज्या शिव म्हणे शिवेचा धनपत्नें अपर मित्र देवरहो
अक्षय्य धर्मश्रद्धा रुयशा असे बहुन चित्र दे वर हो १९
धर्मा देवर्षि म्हणे गेला मेला असाहि शिबि राजा

१रू-खनक-उत्तमप्रतीचा खणणारा, २शोकप्रदसंग, ३पालकीला, ४ युद्ध-हत-अहित-नृप-हृत-वित्त-युद्धींमारलेल्याशत्रुराजांपासूनहरणकेलेल्याद्रव्यानें, ५ गोब्राम्हणप्रजांचें पालन हा जो स्वधर्मत्याच्या हातींच, ६ शिकणारा, ७ गंगा-सिंधुनदींतीलप्राण्यासहित, ८ वालुका, ९ जलधारा, १० पाषाण, ११ चाबुक, १२ शरीर, १३ अनल्प, १४ उत्तम मौक्तिक घोस, १५ यत्-यशस्-अभिध-ज्याचीकीर्तिनामकमुक्ता, १६ पार्वतीचा, १७ कुबेराप्रमाणे धनपतिआहेम्हणून, १८ दुसरा, १९ दीर. + चंद्रयान.

यारत्तव नको रडों म्हण या सांश्रु[1]-जनांस हि स्वशिबिरा[2] जा १००
देवर्षि म्हणे होता दशरथनृपपुत्र- रामराजा गा
जेणें साधूनि दिला लोकां स्वःसिद्ध[3]-पामरा जागो १०१
वधिला जेणें राक्षस- वर विश्वविनाशकर दशानन गा
आली द्याया यत्पद- यश देवांच्या हि वरदगा न नगा[4] १०२
यच्चरणाच्या घेती मस्तक मळवूनि देव धूलीला
तीर्थाधिक हे गौतम- मुनिची कळवूनि दे वधू[5] लीला १०३
कीं पाहे शापतमीं चिंतुनि चित्तांत जे[7] विपाश शिळा
यत्सदयशें स्वधारस विरस[8] सुरसकासि जोविं भान शिळा १०४
द्रवबुनि अजडा केली यत्पाद[9]रजोलवा डनिलें कुशीला[10]
यज्जननीच्या होउनि दुग्धधिनें लोल वौनिलें[11] कुशीला[12] १०५
यत्तेजें जलनिधिच्या तरले न दगड विशाल-नगे[13]हि वर
ज्याच्या स्वयशें आला स्पष्ट दशमुखासमात्र न गाहिवर १०६
न तुला शतांत पहिल्या मधिल्या अंत्या हि तुरगमेधा त्या
गुरुकुलमुख श्रुतीचें साक्षात् साकेतपुर[14] गमे धोत्या[15] १०७
युववृत्त असो चाविति सर्व पिरांच्या हि न वपु देंकुण गा
रङ्कु प्रेमें पोषी कृपण जसा नित्य नव पुदें कुणगा १०८
करिते झाले ज्याच्या कीर्तिसुखें शांखुरोचि कपि[16] लास्य[17]

---

१ रडणारेलोकांस, २ आपुल्यारांवटींतजा, ३ स्वर्गवास, ४ कल्पवृक्षास, ५ अहिल्या, ६ चरण, ७ प्रभात, ८ अमृतहिअरसिक, ९ ज्याच्यापादरजाच्यालेशावायूनें, १० कुसिताशिळा, ११ स्तविलें, १२ कुसव्याला, १३ पर्वत, १४ अयोध्यानगर, १५ ब्रम्हदेवास, १६ वानर, १७ नृत्य.

यद्दर्शनेंचि सर्व हि तत्वज्ञ न पाहतां हि कपिलाऽस्य १०९
रुद्रसहस्राब्द करुनि रंजन दे शोवटीं सुपद विश्वा
किं बहुना पावविला ज़ेणें यतिप्रतिमता सुपदवि श्वो ११०
गेला ऐसाहि प्रभु वा करिसी शोक काय तो कांचा
सोनें हगे मुतें जो स्वजना दे शोक काय तो काचा १११
भूप भगीरथ होता जो शत्रूंतें हि सुगति दे वधुनी
ज्यासि म्हणे त्वंस्पुत्री मी ऐसें नमुनि सुगति देवधुनी ११२
उगमापासुनि सागर संगमपर्यंत इष्टकामहिता
गंगाचयनें रचिली कनकाच्या करुनि इष्टकां महिता ११३
यज्ञांत दक्षिणा, दे विप्राला भूप भूपरूनकन्या
अन्या न घडायाचें घडलें हें दान त्याचि अतिधन्या ११४
विप्रांसि सहस्रांचें कन्याच्या दे सहस्र तो भूप
आच्छादिलें जयांचें दिव्यांऽबररत्नभूषणें रूप ११५
प्रतिकन्याकनकरथीं जोडियले चार नव चतुर गमनीं
केंची कशा प्रतोदहि साहति हूं होहि न वच तुरग मनीं ११६
एका एका रत्न- ध्वज-भूषित-कन्यका-रथांमागें
शत शत रूमणि-सुवर्ण स्वंबर-धर गज दिले महाभागें ११७
नागानोंगामागें कांचनमाली सहस्र दे वाजी
तें हरिहरां म्हणति कवि तुमचें देणें अनंत देवा जी ११८

१कपिल-आस्य-कपिलऋषीचेंमुख, २अकरा, ३कुत्रा, ४तुझीकन्यामी, ५भागीरथी, ६मनोरथहितकर्त्री, ७चाबूक, ८आरी, ९रू-अंबर-धर-चित्रवस्त्रेंधारण करणारा, १०एकागजामागेंरूवर्णमालायुक्तसहस्रअश्व, ११अश्व, +बिटा.

वाजीवाजीमागं ग्राम सुमवत्सा यथोक्त[1] दे गाई
विप्रसंती म्हणति शिवं ऐसेंचि सदा कथोक्त दे[2] गा[3]ई ११९
गाईगाईमागें जें वर्णू काय कीर्ति अजोधिक तें
हें साधुभाग्य येइल विश्वसृष्ट्या हि त्या अजा[4] विकतें १२०
ऐसाहि भूरिदक्षिण यज्वा राजा भगीरथ न राहे
राहेल कसा त्वरत कवणा न स्पर्शली गति नरा हे १२१
हे वर्षि म्हणे होता सत्पालक विष्णुचा दिलीप गडी
जेणें अप्र[5]णतांच्या न शिरीं शाश्वत उरोंदिली पगडी १२२
यत्सुपदार्सी हरिच्या मैत्री संपादिली पदानें हो
सुरनिलय[6] रत्नसानुहि पावे कंपा दिलीपदानें हो १२३
यज्ञांत दक्षिणा वसु- पर्णा वसुधा दिली पदा नमुनि
ऐसें हें अत्यद्भुत गानी प्रेमें दिलीपदान मुनि १२४
शतमन्यूपें[7] जो प्रभु मान्य जसा व्यजनवायु वायूपें[8]
ज्याच्या लाजविला विधु[9] सुदृगादृतभुज नवा युवा यूपें[10]
असति कनकमय वेदी मंडप यूपहि परंतु हेमाचे
यद्यज्ञ[11]वाटवाटं हि ज्यांत निजुनि नृप हि म्हणति हे माचे १२६
सुर शिवसें देखति ज्या करित्या सुरवद्दृष्टिच्या दिली पातें
दूरुनि विलोकित्यांहि स्वर्गीत यद्दृष्टिच्या दिली पातें १२७

१ यथा-उक्त- जशा सांगितल्या कपिलादि, २ शोव्यामेंढ्याचाकळप, ३ बहुत, ४ उद्दन, ५ पागोटें, ६ देवांचास्थानभूतरत्नशिखरमेरु, ७ इंद्रापेक्षां, ८ महांवायूपेक्षां, ९ सु-दृक्- आदृत- भुज सुलोचनास्त्रि यांहीं आदरिला भुज ज्याचा असा विधु-चंद्र, १० यज्ञस्तंभानें, ११ ज्याच्या यज्ञशालेचीवाट, + मध्ये हे पास.

ज्याचें रथचक्र जळीं न बुडे आत्मजमंन जसें भवनीं
कृपण जसा वित्ताच्या सत्याच्या अति निविष्ट जो अवनीं
कवि वदले नेत्रांहीं कर्णाहीं लोकहो दिलीपा प्यो
पुण्यश्लोकें रामें सद्गति जेणें तसी दिली पाप्या १२९
स्वाध्यायज चापगुणज रवा जेवा प्या असे जसे शब्द
तैसे उदार ज्याच्या सदनीं हे पांच न जिरती शब्द १३०
मेला असाहि ज्याचें आरला लिहिलेंहि दे वपु-त्रास
कां आठवूनि शोचिसि रे सृंजय मनुजदेव पुत्रास १३१
नारद म्हणे वियोगें पुत्राच्या पावलासि कष्ट महा
तरि परिस सांगतों तुज शोक सराया समर्थ अष्टम हा १३२
नृपति युवनाश्व होता गेला मृगयार्थ तो वनीं दूर
तेणें श्रांतें तृषितें ऋषिसत्रींचा विलोकिला धूर १३३
सत्रीं शिरोनि न पुसे देउनि एकाहि हाक विप्राशी
भाविबळें स्वार्थचि मुनि साधितपृषदाज्य हा कवि प्राशी
तत्काळ गर्भवान् नृप होउनियां होय सभय सत्रप हा
पृषदाज्यपानसंकट जाणुनि वदले समस्त सत्रप हो १३५
भेटुनि युवनाश्वाला हांसोनि म्हणे सदेव वासव हो
हें संकट हरितों परि सांगुनि पुत्रासि देववा सवे हो १३६
वैद्याकरवीं तदुदर व्हाया गर्भासि वाट तो चिरवी

१ ऋष्याच्या, २ रक्षणीं, ३ भाशनकरा, ४ वेदघोषापासूनउत्पन्न, ५ धनुष्कोटीपासूनझालेला, ६ शत्रुलामेला हा असें जरिलिहिलें तरिशरीरासत्रासदे, ७ नरपति, ८ दधिमिश्रितआज्य, ९ सलज्ज, १० ऋत्विज, ११ हा,हाकष्ट, १२ यज्ञ.

याकर्में बहु[1]करहीं [2]द्विकरसुतन्यून वाटतोचि रवी १३७
काढुनि उदरांतुनि शिशु मोहांतुनि नृप हि तूर्ण बाहेर
शक्रासि दस्र[3] म्हणती केला आदेश पूर्ण बा हेर. १३८
शक्र म्हणे युवनाश्वा करिताहे उर्वशी[4] हि बा लास्य[5]
ऊठ सख्या नेत्रांहीं प्याया पीयूषपूर[6] बालास्य[7] १३९
अमर म्हणति कं[8]ध्यास्यति तों मांधाता[9] असें म्हणे शक्र
घाली अंगुलि वदनीं तीहि अमृत जेंवि गोपिका तक्र[10] १४०
मांधाता शक्र म्हणे झालें तन्नाम[11] तेंचि गा राजा
तत्कीर्ति सुखा देती पीतां तप्ता जनासि गारा ज्या १४१
झाला श्रुतिशास्त्रनिपुण तरुण रणभट[12] हि भरतां दिवस तीस-
दिवसांतचि हो विजयी जिंकुनि देवासुरादि बसे[13] तीस १४२
विषयीं प्रथम शिरावें जैसें पावोनि यौवना श्वानें[14]
ऐसी जंतुस्थिति[*] परि वरिलें शौचि[15] शील यौवनाश्वानें
गमला मूर्त घटजकर[‡] परनृपबल[16] सिंधुपतित मांधाता
ज्यातें निर्मुनि पावे कीर्ति त्रिजगांत अति[17]तमां धाता[⁂] १४४
यद्राजसूय हय[18]मख शत म्हणति अपूर्व अमरही राजा
भंगावया न शकले परनृपमणि करुनि समर हीरा[19] ज्या १४५
विश्व हि शतदा पावुनि ज्याचें तें यज्ञपुण्य-पर्व तरे

---

१ बहुलकिरण-हस्तज्याचे, २ होणाराजोद्विकरपुत्रत्याहूनन्यूनरवी, ३ खरिन, ४ अश्विनीकुमार, ५ नृत्य, ६ अमृतपूर, ७ पुत्रमुख, ८ कं-ध्यास्यति- कोणालें ध्यानकरितो, ९ मां-धाता- मातें ध्यानकरितो, १० ताक, ११ त्याचें नाम, १२ योद्धा, १३ त्यानें, १४ कुत्र्यानें, १५ शुद्ध, १६ शत्रुसेनासागरामध्यें पडलेला, १७ अतिशयित, १८ अश्वमेध, १९ हिऱ्याला. * प्राणिमात्राचीरीति, ⁂ ब्रह्मा, ‡ अगस्तीचा हात.

घृत-मधु-दुग्ध-नदीशत ज्यांत वहून ते सदैन्नपर्वतरेरे[1] ४६
जो जोंगयादि होता समरीं जिंकी पराक्रमांधा[3] त्या
आलेंचि मरण बापा सृंजयराया अशादि मांधात्या ४७
भाग्यें शौर्यें ज्ञानें जो विश्वाऽधिक असा-हि तो मेला
ऐकसि-कीं कां शिशूच्या शोकें त्वन्मुखशशांक[4] कोमेला ४८
होता असाचि हरिच्या जो सुगणें उतरला ययाति तुकीं
वदले कवि सत्कर्में सुयशें जों तों वशें जया तितुकीं ४९
वज्रधरासहि[6] बहुभय- दायक यत्पाणिवर्ति-कुश नाकीं
तो ज्याचा श्वश्रूर असुर- पति-वृषपर्वा-समेत उशना कीं ५०
ज्याच्या प्रसूर[11] परिसरूनि धन्य म्हणे देवराजसू यश तें
कीं तो यजिता झाला हयमेधशतें सराजसूयशतें ५१
बहुधा घडलें नुरवी निल जें अघ[12] वाजपेयशत गा या
काय असें बहु हरिहर- नामें मघवा[13] जपे यश तगाया ५२
अरि येसमरीं हरिच्या जेविं शिरेः पुंडरीकद[15] शश तरे
दशशत अतिरात्र[16] करी जो विधिनें पुंडरीक दशशत रे ५३
सत्रें चातुर्मास्यें त्यांची संख्या बरी कथावि किती
स्वल्पचि रसिकमत वदति बहुत लिहूनि काय करि कथा विकिती
भूमंडल विप्रकरीं करूनि ब्रम्हस्व[17] वेगळें दे हा
आधीं राज्यश्री मग वरूनि तपस्या म्हणे गळें देहा ५५

---

१उत्तमान्नगिरी, २नामविशेष, ३ पराक्रमबदानेंअंध,४ तुझामुखचंद्र, ५कजनी, ६इंद्रास, ७ज्याश्वशूराच्याहातांतीलदर्भ, ८ स्वर्गीं, ९ शुक्र, १०ऐस, ११देवराजमाना, १२पाप, १३इंद्र, १४ज्याचयानीच्याआयुद्धांत, १५शिरकमळदेणारे, १६ यज्ञविशेष, १७ ब्राम्हणासदिलेलेंधन.

जें हिमें[1]-हेममहीधरिं क्रीडे बैसोनि देव[+]यानीं तें
नृपरत्न क्षण रडवी करुनि विरक्तीस देवयानीतें ५६
ऐसाहि प्रभु मेला बरवा तुजपरिस जो चतुर्गुण गा
गुण गाउनि पुत्राचे काय रडसि ऋद्ध शंभुचे गुण गा ५७
नृप अंबरीष होता यत्पितृसंबंधि नाम नाभाग
जो नित्य म्हणे न विषय- भजनें हरि[3]नेतिविना मना भाग ५८
क्षितिस प्रजा प्रजेस क्षिति हि म्हणे सगुणसद्म-नाभागा
आम्हांकरितां करि[3]तो जो सदय तयाचि पद्म[4]नाभा गा ५९
परिपालिल्या प्रजा बहु जैशा भगिनी सुता सुना भाच्या
जेणें आ[5]शीराशी वरिल्या मर्दूनि खल सनाभाच्या ६०
अरिराजसहस्रांचें जिंकूनि सहस्र जो सदय न वधी
शरणा[6]गताभयव्रत सोडुनि सत्कुलज कशी करिल नव धी ६१
न सुधेशीं ज्याच्या मख- विप्रो[8]च्छिष्टाऽन्न-नव-सुवास वदे
हो[9] एकहि सर्वांतें हयमेधशतीं हि न वसु[10] वासव[11] दे ६२
यज्[*]वे वदान्य[12] राजे सपरिच्छद[13] लक्षसंख्य विप्रकरीं
दिधलें यज्ञांत जसे पशु द्यावे ख्यात हे कवि-प्रकरीं ६३
येथें सर्वहि पहिला संपन्न गणेश-देव दोंदानें
वा अन्नदान एकचि ज्याचें दुसरीं न दे वदों दानें ६४

---

१ हिमालयवमेरुपर्वतस्थावर, २ ईश्वरनमनाशिवाय, ३ करणारा, ४ ब्रम्हदेव, ५ आशीर्वादाच्या राशी, ६ शरण्यास अभय देणारा, ७ उत्तमकुलोत्पन्न, ८ यज्ञांतील ब्राम्हणांच्याउच्छिष्टान्नाचा नूतन सुवास, ९ खेदोद्गार, १० द्रव्य, ११ इंद्र, १२ उदार, १३ चामरयुक्त, + देवाच्या विमानी, * यज्ञ करणारे. १३ मंडपाद्युपकर्ण पर असाही अर्थ नियतो.

मूर्धाभिषिक्तदानें तो दे नैशीं सदानगजदानें
किति सांगों दिधली हय- गोदानें त्यासदानगजदानें ६५

प्रमुदित विप्र पहाय यज्ञचमत्कार अंबरीख रची
इतरीं धन नग्नजनीं निज-अंबर जेविं अंबरीं खरची ६६

हा पुत्रा काय म्हणसि काय रडसि जो असा अरिसं-भारी
मेला तुजपरिस चतु- र्गुण गुणवान् लक्षतापरिस भारी ६७

देवर्षि म्हणे राजा परिसावा नृपजनेंद्र शशबिंदु
यत्पुढें अरिनृप- सिंह नर्यांचा बलाब्धि शश बिंदु ६८

त्या शतसहस्र होत्या सुगुणाऽमृतसिंधु-बायका राज्या
लिहिति रतिस्तुति-पूर्वी मात्रा देऊनि बा यकारा ज्यां[10][11] ६९

पुत्र सहस्र[12]-सहस्र स्वसमगुण दिले स्वदारलक्षातें[13]
जेणें कथिलें देणें हें धर्माचें स्वसार लक्षा तें ७०

सुरुचिर सुशील सुचरित सा[14]ऽ‡शर ते सर्वही अयुत-यजी*
देह प्राणासि नसे जे येतां ब्राम्हणा म्हणति या जी ७१

तितुके हि अश्वमेधीं दिधले देताहि सुत नवे दानीं
कथिला एकहि भावी ऐसा कवि लोकतुंत न वेदांनीं ७२

एकैकसुतामागें शत शत कन्या दिल्या महाभागें

---

१ पट्टाभिषिक्तराजदानें, २ मदोन्मत्तगजदानें, ३ शपथा, ४ वस्त्रवान, ५ शत्रुसमेचाशत्रु, ६ राजशिरोमणी, ७ नामविशेष, ८ शत्रूंचा, ९ ससा, ८ ज्यापुढे शत्रूसिंह ससे आणि त्यांचा बलसमुद्र, थेंबअसाअर्थ ) १० य यावर्णास. ( रतिस्तुतिपूर्वी येलिहिती म्हणजे येरतिस्तुति, तीरतीचीस्तुतियेर "निष्फळ" ) ११ बायका, १२ दहालक्ष, १३ आपल्यालक्षस्त्रियांस, १४ लोकस्तुत्य, + सदा-नगज-द- निरंतरगजदेणारानें, ‡ तपी, * यज्ञकर्ते.

कन्येप्रति शत शत गज बा आइकतां न या महा भोगें ७३
एकैकगजामागें शत शत रथ दे रथारथामागें
शत शत हरि दे हरिला श्रद्धा परिसावया कथा मागें ७४
एकैकाहरिमागें दशशत ज्या भरिति घटें सुधेनु तिथें
ज्यांच्या पयें म्हणावें करुनि अवज्ञाचि ते सुधे नुति घे ७५
एकैकधेनुमागें बहु दे जो दानपति अजावि-हि रे
ज्यासि नसे विषय जसे क्षीरसमुद्रालया-अजा विहिरे ७६
हयमेधांतीं उरले क्रोशोन्नत अन्नराशि तेरा ही
कांचनयूपाद्यऽद्भुत साहित्याचि कथा चि ते राही ७७
ऐसा शशबिंदु न जो करितां अरिकायहोम धामेला
तो ही वृद्धमुनि म्हणति बहु पुसतां काय हो मया मेला ७८
देवर्षि म्हणे भूपा परिस बरें हें सुवर्णन गयाचें
प्रतिहयमेधीं धरि भय अधिकाधिक मणिसुवर्णनग याचें ७९
मेळविलें पुण्ययश त्याया-चरणें अनंतरायें हो
केलें शतवर्षे हुत- शिष्टान्नाऽशन अनंत-रायें हो ८०
गय सुप्रसन्न होतां- अग्नि म्हणे त्यासि पावका मातें
जरि वर देसी पावसि या पुरवायासि पाव कामातें ८१
वरदा वरदानादिक कांहीं जरिं नाऽठवे द्यावेगा
तरि सद्गुरुप्रसादें यमनियमें पाठ वेद यावे गा ८२

---

१उत्सवास, २ शिर्षे, ३सिंह, ४विश्वास, ५ तीनघागरी, ६ स्तवन, ७ क्षीरसिंधुवासी, ८विहीर, ९ कोसभरउंच, १० सुवर्णयज्ञस्तंभादि, ११शत्रुदेहाचाहोम, १२ मेरु, १३ निर्विघ्नपणें, १४अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रम्हचर्य, परिग्रह, अशापांचानित्यकर्मांच्यानियमानें.

मज अक्षय्य[1] मिळावीं धर्में न करूनि अन्यहानि धनें
या सुवरें धन्य जरि न करिशील हा दास धन्य हा निधनें[2] ८३
देतां सर्वस्व सदा श्रद्धा ब्राम्हणपदावरि असावी
शिवमूर्ते[3] नाशाया सर्व स्मरद्रुमंमदा[4] वर असावी ८४
भार्या भल्या सुवर्णा थोडयाचि बहुत नको बहु कुशीला
पुत्रवें साध्वींच्या यावें म्यां द्यावया यश कुशीला[5] ८५
श्रद्धा बहु दे आले असतां अशाना वराक राजे वा
सम विनवावें कीं या सूदा[6]शयना वरा[+] करा जेवा ८६
वा जेविं पिशुनमन[7] पर- मर्मीं धर्मींच मन्मन रमो जी
धर्मरति[8]विना वानर जन्मांतचि कां न जन्म नर मोजी ८७
माझ्या विहिताऽचरणीं[9] दृक्पातं[10] नसो चि अंतरीं[11] याचा
व्हावा या-निजधर्मा- चरणीं तनुसहित अंत रायाचा ८८
अग्नि म्हणे अमतिम- प्रभु सत्तम तूं नृपा इलेवरे[12] हो
जे मागितले ते त्या-[13] रूपें जगदीश्वरें दिले वर हो ८९
नित्य प्रातःकाळीं शतवर्षें जो प्रभु प्रमोदानें
अयुत वर तुरगदानें दे निष्कहि लक्ष लक्ष गोदानें ९०
मणि वालुकाऽन्वित कनक- मय करूनि क्षोणिवलय[14] दे दानें
करि गज हयमेध[15]-यज्ञ- श्चंदनशतनिलय-मलय दे दानें ९१

१ रुचिर; २ मरणें, ३ कल्याणमूर्ते, ४ कल्पवृक्षाच्यागर्वास, ५ भिकारी, ६ स्वयंपाक्यास, ७ चहाडखोराचेंमन, ८ धर्मप्रीतिशिवाय, ९ कर्तव्याचरणांत, १० दृष्टिपात, ११ विप्राचा, १२ पृथ्वीपति, १३ अग्निस्वरूपें, १४ भूमंडल, १५ अश्वमेधयज्ञरूपचंदनतरूंचेंसस्थान भूत मलयागिरी, + घ्या ( स्वयंपाकीघ्या जेवा (निद्राकरा असाभावार्थ.

सार्ध[+]रागांवें जीचीं रुंदी जी लांब तीस-गावें गा
अरि गय-[1]हयमख-वेदी काशीस तरें-च तीस गावें गा १२
ती विप्रजना गयनृप- [2]वाक् हय-मेधक्रि[3]याख्खनि वेदी
मणिकनकमयी जीस तनु साध्वी छाया प्रिया स्रुख निवे[4]दी
द्वि[:::]जदत्तशेष बहु मणि[‡]- कांचनमय-यूप इक्ष[5]से वेची[6]
ज्यास रुचि अर्थि[7]रतिची जेविं मुमुक्षूस भिक्षु[8]सेवेची १४
ने तृप्तिप्रति भूत- ग्रामातें मख हि सिंधुनिलयातें
गय हय मखीं रणीं ही विशिखें[9] मर्मींच विंधुनि लयातें १५
परमपवित्रान्नाचे पृथ्वीपाताळ-तृप्तिला पुरले
सुर-[10]लेखांचें घालें परिषर्वत पंचवीस कीं उरले १६
वाहत होत्या पुष्कळ पूतपयः[11] प्रमुख-सर्व-रसकुल्या
तैशाचि बहुत उरल्या वस्त्रालंकारराशि गिरितुल्या १७
वर्णूं अक्षय्य[12]करेंण वट कीं तें ब्रह्मसर-हि न गयाचें
यश वर्णवे कविशता देणें बहु म्हणति अमर[13]नग याचें १८
या लागलाचि समयीं पुरवावा अंत[14]कोल काम गया
राजा त्वां शोचावें कां हें ऐकोनि बालका मग या १९

---

१ गयाची अश्वमेधभूमी, २ गयराजाचीवाणी, ३ अश्वमेधकर्माचीखाण, ४ देई, ५ उंसासारिखे, ६ खर्ची, ७ द्रव्येच्छूची, ८ भिक्षुकांच्या (सन्यासी) सेवेची, ९ बाणानें, १० देवांचे, ११ पवित्रदुग्धप्रमुखसर्वरसांच्या नद्या, १२ स्थिरकरणारा, १३ कल्पवृक्ष, १४ यमाची इच्छा, + सव्वीसयोजनें, ::: ब्राह्मणासदेवूनराहिलेलें शेष, ‡ रत्न आणि स्रुवर्णांनीं मंडितअसायचस्तंभ.

## अध्याय ६

नारद पुन्हा म्हणे गा सृंजया सोडूनि खंति दे वाची-
मंतु हरिहरस्तोत्रां- परि चरितें नित्य रंतिदेवाचीं[1] १
अभ्यागता- तिथींतें ज्याचे सूद द्विलक्ष ओगेरिते[2]
कीं अन्य रंतिदेवा गमले याहूनि सर्व योग रिते २
ज्याचे स्वयेंचि वरिती स्वर्गार्थ सुसत्रपशु भयजनांचें
न धरिति हें वर्णिति यश शतमख[3]सुरेंवरसत्रप श्रेयजनाचें[4]
पशुचर्मराशिपासुनि झाली चर्मण्वती- नदी नांदे
[5]कृमि यस्योनें[6] स्वर्गीं जी भलत्या अर्थ तीन[7] दीनां हे ४
सा[8]ष्टशतसुवर्णात्मक निष्क-शत-सहस्रदान ओपावें
जेणें द्विजां म्हणावें अंगु[9] वितरण[10]पाणिनें न कोपावें ५
जो एकदिवसमात्र द्विज राहे निष्ककोटि तो लाहे
किति वनंद[11]-धनंद[12]-कीर्ति प्रभुकीर्तिसवेंचि कीर्ति तोला हे ६
देउनि कोटि म्हणे हे वाहिलि जोडूनि हात पाकोळीं[13]
तंतुपटें काय हरिल दिग्गिभाच्या घनहिमा[14]ऽतपा कोळीं[15] ७
अभय न देवू माझ्या तुमचा वदतां मृषा कुला पाणी
आवडतें मज याचें- दर्शन जैसें तृषा[16]ऽकुला पाणी ८
प्राणविरह सुसह पळ हि बहु दुःसहविप्रपाणिविरह मला

---

१ नामविशेष, २ वाढपि, ३ इंद्रप्रमुखयज्ञभुक्, देव, ४ कल्याणदायकहवनाचें. ५ कीटक, ६ ज्यान दींतीलरक्तपानानें, ७ धर्म-अर्थ-काम, असेतीनअर्थ, ८ एकशेंआठ. ९ किंचित् . १० दानशूरहातानें. (हातजोडूनअसाभावार्थ) ११ मेघ, कुबेर, १२ परमेश्वराच्याकीर्तिबरोबर, १३ पाकळी, (फूलफुलाचीपाकळीअशीम्हण) १४ पाऊसथंडीआणिउष्ण, १५ कीटकविशेष, १६ तृषित.

वमला जो विष वांरुकिं ऐसा-तापद नसेल तो गमला ९
मी मीनराचि माझ्या द्विजवृंद घरीं जसोचि आप सेरीं
पाहुनि मेघांशि जरा चातक मी ब्राम्हणांशि आ पसरीं १०
जो रंतिदेव ऐसें बोले विप्रांसि कनक दे हातें
द्विजबहुमानासि जपे साधु जरा वृद्धजनक देहातें ११
कांचनमय-गोशत-युत कांचनमय-वृष सहस्त्रशः पूर्ण
शतवर्षे नित्य दिलें कीं हें जाणार सर्व ही तूर्ण १२
श्रीरंतिदेवसदनीं अतिथि द्विज एकरात्रि जो राहे
तो एकवीससहस्त्र प्रातःकाळीं च धेनुधन लाहे १३
जें अग्निहोत्र हयमखे- सुखयज्ञ-गृहो-पकरण सर्वहि तें
विप्रांसि दिलें भूपें सर्वजनांचीं करूनि सर्व हितें १४
कव्यांस पितर घेती प्रत्यक्ष तसेचि देव हव्यांस
हव्यांस धरुनि करि बहु यज्ञाचा जन सुखावह व्यास १५
श्रीस न आली वेंचुनि बहुमणिकार्तस्वरा जरी ज्याच्या
लाजवि सम्रृद्धिला जो न हरुनि ओंर्तस्व राजराज्याच्या १६
मेला असाहि करितां जो हयमेधादि सर्व सव सुकृती
न रडति अनित्य जाणुनि ज्ञाता सुत दार वपु हि सर्वस्व कृती
नारद म्हणे प्रसवली ज्या कण्वसुता शकुंतला गावा
परिसावा भरत तुज न सुत-शोक-हुताशकुंत लागावा १८

१ द्विजवियोगामारिखातापदेणारा, २ उदक, ३ सरोवरांत, ४ लौकर, ५ अश्वमेधप्रमुखयज्ञगृहांतील, साहित्यें, ६ पितृभाग, ७ देवभाग, ८ विस्तार, ९ रत्नें आणि सुवर्णास, १० दुःखिताचें धन, ११ कुबेरांच्या, १२ पुण्यशील, १३ सद्द्रव्य, १४ सुत, १५ पुत्रशोकाग्निरूप भाला, + वृद्धदशा.

म्हणसी शकुंतलासुत रत्नाचा सुमहिमा वदा तरि तें
पाडी गहन हरुनि हरि- शतमखरमहिमा वदात रिते १९
व्याघ्र वराह महिष गज मद तुरवी मूर्ति सुरुचि राशि शुची
हरिशत दमुनि वनीं जीं बहु जी वर्धिष्णु सुरुचिरा शिरूची २०
रुतपोवनांत लावी हरि हरितोकांस दामनीला जो
तेणें न कण्व हरिसह हरिहरि तो कां सदा मनीं लाजो २१
सिंहादि सर्व सत्वें सोडी तो सर्व वीरवर दमुनी
यास्तव सर्व-दमन हें ठेविति भरतासि नाम वरद मुनी २२
शत यमुनेच्या तीरीं दोनशत सरस्वतीतटीं भरतें
गंगातटीं चतुःशत केले हयमेध धर्मलाभरतें २३
पुनरपि हयमख केले दशशत शत राजसूय साधूनी
स्तविला रिपुनींहि भरत केवळ वाखाणिला न साधूंनी २४
तैसाचि विश्वजित्सव अग्निष्टोमातिरात्रसन्मख गा
इतरां भरतयश गरुड- यश दुर्लभ जेविं नीड जन्म-खगा २५
वा वाजपेय म्हणति ब्राम्हण पुण्यर्थिच्या अगारा ज्या
त्या यज्ञसहस्रांचीं तीन सहस्रें करी अगा राजा २६
हंसतसा आरंभा- रिल मख कर्माब्धिला भरभर तरें
शुचिसचिवशिरीं ठेवी राज्याचा सर्व ही भर भरत रे २७
अर्पुनि शुचि जांबूनद- पद्मसहस्र कर्तृन पद नमुनी

---

१ हिमवत् अवदात् (स्वच्छ) जें शेंकडो सिंहरूप जायीचें फुल. २ तेजःपुंज, ३ बाळ, ४ अर्जी, ५ वाढणारी, ६ सिंहबाल कांस, ७ दाव्याला, ८ इंद्रासह, ९ खेदी द्वार. १० प्राणि, ११ यज्ञविशेष, १२ यतोक्यांतल्यापक्षांस, १३ गृहा, १४ आरंभित यज्ञसागर, १५ सुवर्णकमळें.

जेणें केला कण्वर्षि न सकल ही सुप्रसन्न-वदन-मुनी २८
शंभर बांधे ठोसर कनकाचा यूप शक्रयत्नानें
यज्ञांत घडविला तो होय उभा सोऽमरेंद्र-यत्नानें २९
धन-धान्य-गृह-क्षेत्र- ग्राम-रथ-द्विरद-धेनु-हय-दानें
दिधलीं नकोनको तों त्या भरतानें कुबेर-भयदानें ३०
दासी बहुकोटि दिल्या पात्र करूनि बहु-रुक्मवस्त्र-मणि-कनक
ज्या म्हणती भूषणभर दुर्वह इतुकाचि फार अणिक नको
बहु कोटि दिले भूषित- तनु कार्य-समर्थ-भुज नवे दास
स्वामीस आदरें जे भजणारे जेविं सुजन वेदास ३२
ऐसाहि भरत मेला मग संसारांत कां न इतर मरे
खाणुनि कृतशोक सदा जाणुनि भगवत्पदींच हित रमरे ३
देवर्षि म्हणे बहुधा त्वां आइकला नसेल पृथु कानें
तरिच मरोनि तुझें मन मोहीं केलें निमग्न पृथुकानें ३४
पृथुचा पृथु प्रताप प्रेसुनि झाली भयें इला दुहिता
गाईस गोपसा जो राजा झाला स्वयें इलीं दुहिता ३५
पृथ्वी अकृष्टपच्या सर्वसुखस्पर्श-दर्भ कनकाचे
झाले कोणाला हि ज्याच्या राज्यांत अर्भक न काचे ३६
वत्सें प्यावें धावें गाईंनीं दुग्ध भरुनि घागर गा
कुंकुम-रस-मिश्रिता-मृत- कल्पोऽदक पूरपूर्ण-सागरगा ३७

१ केला, (भरींव यज्ञस्तंभ असा भावार्थ.) २ देव-इंद्र-यांच्या यत्नानें, ३ गज, ४ कुबेरास भय देणाऱ्या भरतानें, ५ अलंकाराचा भार, ६ बालकानें, ७ मोठा, ८ पृथ्वी, ९ मुलगी, १० भूमीला, ११ दोहनकर्ता, १२ कष्टाशिवाय पिकणारी, १३ बालक, १४ नद्या.

वृक्षाच्या वल्लीच्या पुटकीं[1] पुटकीं प्रसूत मधुरस रे
बा ज्यापुढें न अमृतहि[2] म्हणवाया आपणाशि मधुर सरे ३८
जन तुष्ट पुष्ट अकुतो- भय नयमय सर्वही अगदवार्ते[3]
पृथु राज्य करित असतां नव्हते च वनांतही अग दैवार्त[4] ३९
बहुतचि जन रंजविला लावुनि निजगुणरसीं पृथु-कथांनीं
जननींनीं जेविं करुनि तप परम चरमवयीं पृथुक[5] थांनीं ४०
स्तंभितजल[6] होय जलधि देती ज्या प्रभुसि मार्ग पर्वत रे
जन ज्याचें यश गाउनि पाउनि काशींत जेविं पर्व तरे ४१
सर्वदेवनमाचांस[7] न दे विश्वास प्रमोद तो यजनीं
मखमंडपीं न नितुकें दानजल बहु प्रमोद[8] तोय जनीं ४२
क्षितिवरि होते पार्थिव जे जे ते करुनि हेममय सारे
दे दान हयमखीं पृथु परिस गमे अर्थिलोकें[9] अयसा रे ४३
पृथु सांगे गज ओतां पाहुनि हरिचा करी लपो कळ तो[10]
श्रम मज किनि घेत्याचें देत्याचें हित करील[11] पोकळ तो ४४
ओतविले कनकरसें साराष्टसहस्र भव्य दंती हो
विप्रांसि दिल्हे तेव्हां मी होतों हे न कीं[12] वदंती हो ४५
मणिरत्नभूषिता हे कनकाची करुनि दान दे वसुधा
पृथुकीर्तिरत न विसरले रंभा विसरतिल कां न देव सुधा ४६
एवंविध चरित-सुधा- निधि-हि निधनें[13] पावलाचि पृथु कवि रे

१ गुच्छास. २ निर्भय, ३ रोगवार्ता, ४ वृक्ष दवानें पीडित, ५ मुकुंद्वान अस्तान वाय[illegible] ५ स्नाला रपणीं, ६ स्थिरोदक, ७ यज्ञदेवतांस, ८ आनंदाश्रु . ९ स्पर्शकरूनलोहास. १० पोकळहर्ती. ११ हत्ती, १२ गप्पा, १३ मरण.

ज्या कालाच्या वदनीं   मेरु विरे त्यांत कां न पृथुक विरे ४७
देवर्षि म्हणे भार्गव-   रामाची सृंजया कथा परिस
अतुलप्रताप दुःसह-   शर जो विश्वास मन्मथापेंरिस ४८
रणपंडितकोटिपुढें   ज्याचा मागें न परशु कवि सरला
जो आपणा समरपर   जैसा हरिकीर्तिपर शुक विसरला
भीवंवी ज्याची श्रीमत्- दत्ता-म-सहस्र-बाहुता शमना
जे अर्जुन-अर्जुनैंता   दे अरिच्या होय बा हुताश मना
त्यां जलधीस शरकरें   भृगुवंशयटज मह्लातपा प्याला
तप्ता[10]ऽयःपिंड तसा   जो लावूं दे न हात पाप्याला ५१
जो प्रभु म्हणे दिले क्षिति-   वर्ति[11] क्षत्रिय गुरवें कुठारें[12] रव
उठलां कबंध हो यश   राखाया बहु वरें उठां गरवा ५२
राम चतुःषष्टिअयुत   बाहुज[13] मर्दी धरूनि कोदंड
कोण म्हणेल पितृवध[14]-   क्रुद्ध प्रभुला करूं नको दंड ५३
खड्गें सहस्रहैहय[15]   नाडी पाडी सहस्र तो मुसळें
खळ-रक्तासि म्हणे जा   भेटें मित्रा कुजा[16] कुजा[17] उसळें ५५
अत्यंतोऽत्कंठित जो   ओतु[18] तसा मत्त पर-शुकाऽ[19] पाया
लागों दे अयुतातें   पळहि न हरदत्त-परशु कापाया ५५
उडूंधनेंहि[20] वधिले   सबळ ब्रम्हघ्न[21] पाप दशशत रे

१ पंख, २ मदनापेक्षां, ३ युद्धपंडितसमुदायापुढें, ४ यमास, ५ सहस्रार्जुन, ६ तृणता, ७ अग्नि, ८ सहस्रार्जुनास, ९ भृगुकुलोत्पन्नपरशुरामरूपअगस्ति, १० तप्तलोहाच्या पुतळा, ११ पृथ्वीवर राहाणारे, १२ परशूला, १३ क्षत्रिय, १४ तातवधामुळें तापलेला, १५ कार्तवीर्य, १६ मंगळास, १७ कुत्सितरक्ता, १८ मार्जार, १९ शत्रुराज्यास, २० गळफांसानें, २१ ब्रम्ह

क्षत्रिय एकहि न जसा लावुनि मृग[1]भूमिपा पद शशा तरे ५६.
देखिलि रामें केली निःक्षत्रा एकवीसदा महि ज्यां
या गाती जे हरिहर- चरित रसिक ते कवी सदा महिम्या ५७
रक्तें भरी प्रतापी प्रभु तो रक्त-प-चमू-सुख-कर तळीं
स्थापी स्वयश कविमुखीं सर्व-क्षत्रिय-वधू-मुख करतळीं[2]५८
निष्कंटक सद्वीप- क्षितिमंडल सर्व वश्य पाहून
राम म्हणे या दाना- पात्र नसे अन्य कश्यपाहून ५९
संपादुनि सर्व हि सव करुनि सकलरत्नहेममंडित ही
कन्यारत्न नसे दे भूमंडळ गुह्ययज्ञपंडित हो ६०
कश्यप रामासि म्हणे माझ्या राहों नकोचि विषयांत
कीं यश आयुःक्षय कर दत्ते पुनर्ग्रहण-रूप-विष यांत ६१
राम म्हणे बहु उत्तम मागे स्थल तो नदीनदेंगाला
प्रभुनें प्रभुला द्यावें दंडल दीना न दीन दे शाला ६२
उत्तर हि याचकास न जेसें बहु भाग्य मत्तमानव दे
तैसेंचि तोहि जलधी कांहीं त्या वीरसत्तमा न वदे ६३
बहुधा घटजापासुनि पूर्वी जें काय होय तें विसरे
शर सुटतां मागें खल- बल जेविं समुद्रतोय तेविं सरे ६४
त्या इषुपातदशेंत्रीं पाहोनि महेंद्रनाम-नग रमला
राम म्हणे करिन रुचिर रुचिर तप कशास देश नगर मला

१ मृगराजास, २ तळहातीं (शंखवाद्यकरितात असा भावार्थ) ३ देशांत, ४ दिल्हे लें, ५ नदि-नद-ईश-समुद्राला, ६ बाण पडलेत्याभूमीं. ७ नामविशेषपर्वत. (परशुराम म्हणून क्षेत्र आहे तेथें)

गेलाहि राम अंतीं • मरणार यथार्थ जाण सन्मन रे
संसृतिनदींत काळ- वर्तीं पावोनि कोण जन्म तरे ६६
व्यास म्हणे हें षोडश- राजिक आख्यान सर्व सन्माहित
धर्मा याच्या श्रवणें एकीं जन्मींच कोटि-जन्म-हित ६७
हा सोळाराजांचा महिमा पूर्णायु करि लवाऽयूतें
या परि जें मंद-दहन- तेज सबल काय करिल वायू तें ६८
सांगुनि आख्यान असें देवर्षि म्हणे नृपा असे तोकीं
होते गुण सांग खरें गेला नच्छोकपर असे तो कीं ६९
नृप म्हणे वा चातक- चित्ताला सुंदिर हर्ष दे वर्षे
परि अल्पचि तो म्यां तुज सांगावा काय हर्ष देवर्षे ७०
जो अस्मदादिजनन प्राकृत होईल तो कसा मान्य
ज्यासि रडत होतों मीं बहु मानुनि तोहि तोक सामान्य ७१
त्वद्दृष्टिपुढें प्रबळ हि नतमोह ज्ञानिनायका सरतो
देवीसमक्ष उरला त्रिभुवनदुर्जय हि काय कासर तो ७२
देवर्षि म्हणे परिसुनि सूक्ति न घे पशु भला भला मागें
उपदेशासि न वळतां कोणीहि न शुभ लाभला मागें
वंदुनि तो भूप म्हणे जे झालां सुप्रसन्न हाच वर
श्रीकर माथां असतां बहु काय छत्र काय वा चवर ७४
नारद म्हणे कृपेची त्वत्साधुत्वें न आवरे उंकळी

१ संसारनदींत, २ कालचक्रांत, ३ सज्जनांसपूज्य, ४ अल्पायुष्याला, ५ पुत्रांत, ६ मेघ; ७ नम्रांचामोह; ८ गवा, रेडा, ९ सु-उक्ति-उत्तमभाषण, १ हुंदका.

हो पूर्णकाम स्करभी- पोषक जंन तीक काय गा उकळी ७५

भेटो त्वत्सुत तुज जो गेला होउनि परासु नरकास
घालूंत साधु भजनें पावाया गति परा सुनर कास ७६

या यागं ऽवरानीं तो अंकीं च प्रकट होय जनकाच्या
सनकाच्या बंधुपुढें अमृतकथा म्हणाति सुज्ञ जन काच्यां

धरिला पुत्र सुवर्ण- ष्ठीवी हृदईं द्रवोनि मग नमुनी
प्रथम प्राज्यप्रेमें नित्य नवदया ऽ मृताभ्रगमन मुनी ७८

हयमेधादि मखांच्या ठेवी सप्रेम चित्त तो यजनीं
वर्षे सृंजय धारा- धरसा सर्वस्वचित्ततोय जनीं ७९

शिशु अनपत्य अयज्वा रणयज्ञांत हि न पावला मरण
म्हणुनि उठविला मुनिनें करवाया सुगतिकर सदाचरण ८०

अभिमन्युसि धन्य म्हणति गेला करुनि सुकृतें सुगतिला जो
ज्यास स्वर्गति घडली या मर्त्यगतीस ते सुगति लाजो ८१

निधविनरसे जो विरवरुनि सुरवकर करनिकर इंदु नित्य जगा
तोचि अभिमन्यु धर्मा धीरत्या शोकासि निंदुनि त्यज गा ८२

उरले शोच्यं[10] ततीला गेल्याचा शोक कां[11] करावा हो
कर्पूर कुशल वाहो नेत्रीं जड लोक कां करा वाहो ८३

जोडावा स्वर्ग तुम्हीं सोडावा सर्व मोह माजा तों
हा भाव शोक सारा सरला कीं राजसनभा जातों ८४

---

१ कामधेनूपाल, २ बोंवटच्या (मोक्ष) ३ भापणांनीं, ४ दयामृतमेघ, ५. मेघरूप. ६ चित्तरूपजल, ७ निपुत्री, ८ यज्ञनकेलेला, ९ मृत्युलोकांच्यावर्तनास, १० शोकमद. ११ रडा, + किरणसमुदाय.

स्पर्श न मोहाचा हो तुज अंत[1]र्हित-परा शराचा हो
ऐसें बोलुनि झाला रूत अंतर्[2]हित पराशराचा हो ८५
नृप आपणा मनिं म्हणे कोठें तो वत्स उत्सवद[3]-शील
हें पुसतां विजया तूं काय कसें पार्थ[4]-कुशल वदशील ८६



## अध्याय ७

समसप्तक वधुनि विजय सांजे शिबिराशिं यावया परते
प्रभुसि म्हणे कां कंपें मन कांपविले जरि स्वयें पर ते १
कंठ गहिवरें भरला शिरली हृदयांत केशवा धडकी
येतें रडें वृथा कां बा माजी प्रकृति काय गा रडकी २
स्फुरण[5] हि अनिष्ट[6] भिववितें उत्पात हि सांग काय बापा हें
कुशल असे कीं माझा राजा ध्यानांत नीट बा पाहें ३
देव म्हणे कुशल असें प्रभु ऐसें मन्मनास वाटतसे
कीं थोडे जन जगतीवरि धरिते धर्मनीति वाट तसे ४
झालें असेल आणिक कांहीं [9]वर्धक्रिया नव्हे वंध्या
यद्वा[8]-तद्वा:स्तु करीं आधी न गणूनि आंधिला संध्या ५
संध्या करवुनि नेतां सेनेंत मनीं म्हणे पर[10]स्वामी

---

१ अंतःकरणपूर्वक हित करण्याविषयीं नसत अशा तुला, २ अंतरधान, ३ आनंददायक, ४ निंद्य, ५ वामनेत्रादिक स्फुरण, ६ वाईट, ७ तुला होणारीं चिन्हें. ८ कसें तरीच सो. ९ शांकान्त. १० श्रेष्ठार्धाश, परपुरुष.

स्वधना न जपों कैसा काय रथीं वाहतों परस्वा मी ६
अर्जुन अस्वस्थहृदय जाय गनेश्वीक शिविर पाहून
प्रभुसि म्हणे महदप्रिय- सूचक बहु चिन्ह काय याहून ७
मी नायकें सुवाद्यें स्तुति-गीत-रवासि तूंहि नायकसी
मजपाहुनि आप्तअधो- मुख होती गति असेल हाय कसी ८
अतुलप्रताप लोकीं ज्या खलबलजलधिवाडवाभाच्या
तो कृष्णा आज तुझा मज आला कां न आडवा भाचा ९
व्याकुळ होय महाजन भाजेन होऊनि जसा महाऽघातें
लोक तसाहा दिसतो व्हावें विकलत्व हें महाघातें १०
शिबिरीं शिरोनि विजयें धर्मादिक देखिले अधोवदन
तें पुत्ररत्न एकचि न निरखिलें सद्गुणादिचें सदन ११
मृदुलप्रकृति न साहे रुतशोका जेविं न रविला पाला
शिबिरीं करी परोपरि नारायणमित्र नर विलापाला १२
मज आडवा न आला तरि या पांचांत पृथुनय नमावा
कीं नीरंजनाभाच्या भाचा सुगुणाब्धि पृथुनयन सावा
बोले कृष्णसुखींच्या वेणु तसा परम लाडिका वाणी
जो स्पर्शे शिरहि न घें गुरुसन्निध पर मला डिकावाणी १४
जो वहु पर- पृतनासीं गोपींसीं वाळकृष्णगा रमन्या
दावा हो सत्वर तो स्वगुरुवचनगीतकृष्णसार मला १५

१ परद्रव्य, २ हननेज, ३ महत्- अप्रिय- सूचक- मोठें अनिष्टदर्शक. ४ खलसैन्यरूपसमुद्रासबडवानलतेजी, त्याचा, ५ पात्र, ६ महा- अघातें, ७ मोठ्याघातानें, ८ सद्गुण आदिचें ( हरिचें ) स्थान, ९ कोमलप्रकृति- अर्जुन, १० नीतिमान्, ११ पद्मनाभाचा, १२ आकर्णनेत्र, १३ डिकारतारिखा. १४ शत्रुसैन्यासीं, १५ नानाज्ञारूपगीतासजाहरिण- असा.

बालहि जो खड्ग परशु चक्र गदा चाप तोमरा वाहे
संकल्प दुर्जनांचे झाले कीं सफल तो मरावा हे १६
ज्याचा शास्त्रीं शस्त्रीं व्यवहारीं वासुदेववत्समज
काय तुम्ही केला हो आणुनि तो भेटवाचि वत्स मज
बहुधा तुम्हीं धरुनि गुरु- कृत-चक्रव्यूह-भेदकामातें
केलाचि पुढें नाहीं- तरि करिना स्पर्श खेद कां मातें १८
न तुम्हीं न कौरवांहि मी न हातक कां नया शिरोयाचा
कथिला उपाय चपला आधीं म्यां न कथिला निघायाचा
इतुक्यांसि एक बालक संरक्षण कठिन कां नवल यांचें
भुजगोकुमार्य कुचलें अपनयनहि सेवकां न वळयांचें २०
तुमच्या भुजशस्त्रांतें धिक् हा निःसार हो खडांटोप
शिर ज्या न रक्षवे तो कार्याचा काय ओखदा टोप २१
वदला असेल कृष्णा आक्रोशसि बाळनमन कां पावें
अथवा त्यातें ज्याचें समयीं अळुमाळ न मन कांपावें २२
हरहर जाणों चुरिला तो बाळ-करेणुनीं चरणपातें
शिवशिव भरतां कीं हो तो बालक रेणुनीच रणपातें २३
कुंतीस काय सांगूं कृष्णेला दाखवूं कसें वदन
दुष्कर मला सुभद्रा सांत्वन दुर्दर्श उत्तरासदन २४
जावूं दिला मजविना परलोका काय एकला भाचा

१ तो अभिमन्यू. २ वासुदेववत्-समज- कृष्णासारखें ज्ञान. ३ द्रोणरचित चक्रव्यूहाचा भेद करण्याची इच्छा, ४ तत्- घातक -त्याचा घात करणारा ,५ शिरायाचा. ६ मृदुल- (अशा कोमल भुजांतून कडीं कां काढली नाहींत असा भाव ), ७ काढणें, ८ कडयांचे. ९ बाल हस्तीनीं, १० रण-प- योद्ध्यातें.

होता उपाय हातीं रूपशाच्या होहि एक लाभाचा २५
खातांच अद्वितीय सु- दर्शन परबळ पळांत चाटून
परि बुडविल निज यश तें कर्म करिल कवि कशाग दाटून २६
याचें स्वरूप कळतें तरि पळ न विसंबतोंचि बाला हो
शिवशिव म्हणेल मरणा- वधि वैधव्याऽधिमग्न बाला हो २७
समयीं कोठें गेल्या बा तुज सोडुनि गुरुजनवराशी
वाहेल आधिच्या किति ती मृदुलप्रकृति नित्य नव राशी २८
स्वार्थपर अकृप निर्लज्ज आम्ही म्हणउनि मनांत विटेशील
परि उत्तरा सती परं- गतिकामा तुज म्हणेल विटेशील २९
न म्हणे अमृतरस अधिक कीं ज्याच्या बाप लालना कवि तो
काय पितृपरिष्वंगज जें रूप त्या बा पर्जाल नोक वितो ३०
कां माझें उर न उलें कवि पवि कीं म्हणति तोक-शोकाला
लोकां लाजे मन कीं जावें यश हारउनि ओकाला ३१
न तुनें पार्थ कदाचित् कृपणहि वांचेल सोडुनि धनातें
बुकविल न चकोराच्या विधुवांचुनि सर्व सोडु निधनातें
ा वत्सा रक्ताक्षा झाले त्वत्कृगुण आजि घातकसे
ा वाहिले परांचे तुजला हाणावयासि हात कसे ३३
अभिमुख परप्रहारें पडला कीं धर्मराज सांगावें
ासुजी न जें यशस्कर तें स्वगुरुसमक्ष तोक कां गावें ३४

हा, बालक. २ एकटा-अनुपम्य, ३ दर्शनसंतुष्ट. ४ शत्रुनाशनाचा नियम, ५ वैधव्यरूप
याधींत निमग्ना. ६ उत्तरा, ७ गुरुजनांचेवर आणि आशी ( आशीर्वाद ) अथवा गुरुजनव
च्या आशी, ८ निर्लज्ज, ९ कंटाळशील, १० मोक्षाची इच्छा करणाऱ्या, ११ विटस्वभाव, १२ बाल
, १३ पित्याच्या आलिंगनापासून झालेलें, १४ तृणप्राय. १५ स्वर्ग, १६ देतो, १७ वज्र १८ त्यानाला,
१९ उडु, नक्षत्रासह, २० मरणातें, २१ तुझे सद्गुण, २२ त्याच्यासमोर, + मरणपर्यंत.

संरक्षिलें न असतां   शस्त्र नयन बाहुही विपुल याला
निष्फल भार वहातां   को सोडा जों नव्हे रिपु लयाला
भगवान् म्हणे बुडाला   कीं हा मोहांत रक्षे भो-गीतें
जीवांला विषय तसे   संमोहाया न दक्ष भोगी ते ३६
प्रभु पार्थासि म्हणे भो   बुध वीरशिरोमणे सखे दमन
केलें तुझेंहि शोकें   माझें येणेंचि बहु सखेद मन ३७
गलबंधन कीं पुत्र-   प्रेमें विवेकेंचि तोड बापा हें
सुखकर नव्हेंचि उघडुनि   विषरलाचा न तो डबो पाहें ३८
सोत्साह युद्धधर्मीं   होता नव्हताचि तो असावध हो
गेला उत्तमगतिला   त्याचा कां शोक हा असा वध हो ३९
धर्म म्हणे जें झालें   तें कथितों सर्व ऐक बा ज्ञात्या
त्यां व्यूहीं द्वार करीं   ऐशी केली स्वयेंचि आज्ञा त्यां ४०
द्वार करी शिरतां भी   न व्यूहा जेविं सागरा मगरें
तुरवी कुमार परमद   लवहि जसा धरुनि गग रामकरें
होय जयद्रथ आम्हां   हेतु कुमारास अंतरायास
त्यांस न निवारवे बा   जेविं प्रबलास अंतरायास ४२
आम्हां त्या क्षुद्रेंवरें   रुद्रवरें करुनि वारिलें वाटे
मैथुनें सौभद्रासि न   पांचासहि आजि मारिलें वाटे ४३
कृतवर्मा द्रोण कृप   द्रोणज कौशल्य कर्ण रथ सा हे

---

१जो शस्त्रादिकांचा भार, २ रक्षणकर, ३ हे भगवद्गीते, ४ सर्प, ५ गळफांस, ६ करंडा, ७स-उत्साह-उत्सुक, ८ रणांगणींमरणोंअसा, ९ अभिमन्यूस, १० रुसर, ११ परशुरामाचाहात, १२ हेतूस, १३ यमारा, १४ नीचशिरोमणीनें, १५ शंकराने.

शर वर्षले[1] जलदसे  परि धैर्यें करुनि धर्मपथ[2] साहे ४४
केला विरथ अधर्में  दृपुनियां शकुयुद्धसव सोनीं[3]
दौःशासनिनें वधिला  स्वगदेनें कश्मलांत[4] अवसानीं[5] ४५
अष्टसहस्र रथ द्विप-  पति नवशत राजपुत्र रणदक्ष
द्विसहस्र मर्दिले वा  सौभद्रें अश्वपति बहुत लक्ष ४६
गुरुला न सांपडावें  म्हणउनि ऐसें करावया गेलों
तों शोका सांपडलों  पुत्रा-आधींच मी न कां मेलों ४७
पाडी विजयास म्हणे  तुजही मी शोक-वेग मोहीन
हो अधिक क्ष्वेड करी  मूर्छित तरि ओकवे गमो हीन
धर्ममुखें वृत्तांत  स्वसुताचा ऐकतांचि तो कानें
पडला मूर्छित अर्जुन  हा वत्स अरे म्हणोनि शोकानें ४९
सर्वांस वीरमंडल  झालें अत्यंत घाबरें हो तें
धर्म म्हणे दाखवितें  न तपोवन या अघा[10] बरें होतें ५०
सावध होउनि अर्जुन  सोडी बहु दीर्घ उष्ण निःश्वास
कोपें पेटे वाटे  जाळील सधार्तराष्ट्र[11] विश्वास ५१
विजय म्हणे सत्य उद्यां  मारीन जयद्रथासि आपण हो
त्यां केला होइल जरि  मिथ्या शरणागतींच[12] हा पण हो
वांचेल कराया नय  जरि जाइल काय तो अरण्यातें
अथवा म्हणेल शरणा-  गत मी या केशवा शरण्यातें[13] ५३

---

१ वर्षले हें क्रियापद-कर्तरी आहे म्हणून हे सहारथी असा कर्ता, २ धर्ममार्गी, ३ साक्षजणांनीं, ४ मूर्छेंत, ५ सेवटीं, ६ हा पुत्रशोक, ७ विष, ८ हा यहाय, ९ वनांतच असतों तर बरें असा भाव, १० या कुकर्मास, ११ धृतराष्ट्रपुत्रांसह, १२ शरणागतांचे ठायीं मात्र मिथ्या होवो, १३ शरणागताचें रक्षण करण्याविषयीं समर्थ अशातें.

किंवा युधिष्ठिराच्या । आश्रय तो जरि करील पायाला
गेला शिवा हरिभयें । पशुमागें तरि करी लपायाला ॥ ५४
अथवा भीम नकुळ सह- । देवांसि म्हणेल वांचवा दास
तरि खोटयासहि राखिति । साधु जसे काय लांच वादास
ज्या जीवदान दिधलें । तो हा कीं कां अजी वदाना तें
कळलें पात्र दुखविला । अहिसा वैरी न जीवदानातें ५६
वधिलाचि रणांत उद्यां । ज्यां बालकघातहेतु सिंधुप हा
या गरुडें धरिला तो । अहि उडउनि शत्रु-सैन्य-सिंधु पहा
मारिन जयद्रथाला । कोंडिन दोघे गुरूहि शर-भवनीं
श्रमतिल कौरव माझ्या । इषुपटलीं जेविं सिंह शरभ वनीं
न वधिन जयद्रथा तरि । पावेन असत्यसंध नरका मी
ज्या ज्या पावे क्रोधी । लोभी बहु संपदंध नर कामी ५९
मारिन जयद्रथ करिन । यश भुवनीं विशिखजाळ वितत रणीं
हें न घडतां जळेन । ज्वलनीं होतांचि अस्तमित तरणी ६०
करितां अशी प्रतिज्ञा । जगदीशें पांचजन्य वाजविला
लाजविला प्रळय-जलद । नादें ब्रम्हांड गोल गाजविला ६१
वाजउनि शंख झाला । कौरवहृदयासि देव दत्तेदर
तैसाचि सखा त्याचा । अर्जुन फुंकोनि देवदत्तदर ६२
देता दुर्जनहृदया । स्वदररवें करुनि कंप देवांघ्रें

---

१ जयद्रथ, २ कल्याणाकरितां, ३ नोकरी म्हणजे हत्तीजर शंकरापाशें लपेल तर कल्याण होईल असा भाव, ३ बालकघाताविषयीं कारणीभूत, ४ भग्नप्रतिज्ञा, ५ नरकास, ६ संपत्-अंध-संपदांध, ७ विस्तृत, ८ अस्तम-इत-अस्तमाव पावलेला, ९ भयदेणारा, १० कृष्णानें.

प्रकटिति कटकीं भेरि- प्रमुखें बहु नादसंपदें वाद्यें ६३
चारकथित प्रतिज्ञा परिसुनि बहु सिंधुराज तो भ्याला
भिववी धननाशाची वार्ता अत्यंत जेंवि लोभ्याला ६४
राजसभेप्रति जाउनि पार्थाची श्रुत करी प्रतिज्ञा ती.
पळतों म्हणे न रक्षिति पळ हरि-भागा-करी-प्रति ज्ञाती
जाच म्हणा न उगे तुम्हि धरुनि असा ध्यान हा निरोपाला
पावो रिपुची त्यांच्या लेश असाध्या न हानि रोपाला ६६
कुरुप म्हणे पतनावधि निजधर्मीं काय हा निभावो जी
शूरहृद यशो-हानि-परिस बहु वपुची काय हानि भावोजी
दुःशासनादि आम्ही आहों तुज सर्व वज्रकोट रहा
कर्ण भुजाश्रितजीवा न म्हणो दे कीं सुरद्रुकोटर हा ६८
आहेत कृप द्रोण द्रौणि शुचियशासि सर्वथारा जे
रक्षितिल तुला यत्नें हे कालिंगादि सर्वथा राजे ६९
आहेस शूर तूंही सोडूं धृति धर्म नय नको पावे
कोपुनि काय करिल पर न महेशाचेंचि नयन कोपावे ७०
बोलुनि ऐसें येउनि वंदुनि गुरुच्या पदाप्रतिज्ञाते
कुरु सिंधुराज कथिती पार्थकृता लागला प्रतिज्ञा ते ७१
सिंधुपति म्हणे गुरुजी लांघव[10] दृढ दूरलक्ष्यवेध[11] रणीं
बहु जाणें मीं कीं तो रविलाचि अशेष[12] लक्षेवे[13] धरणी ७२

---

१ नाद बाहुल्यें, २ सिंहाचाभागजोहत्तीत्याप्रति, ३ रहा, ४ मोन, ५ अर्जुनाच्या, ६ बाणाला, ७ पतन-अवधि-मरणपर्यंत, ८ अभेद्यकोट, ९ सुर-द्रु-कोटर- कल्पतरूचीढोल, १० चापल्य, ११ लांबचेंनिशाणमारणें, १२ सर्व, १३ पहावे.

द्रोण म्हणे सिंधुपते ठावे हें तुजहि त्याहि सभ्यास
परि तुजहुनि विजय अधिक त्याचा चापीं अखंड अभ्यास
बहु खवळला धनंजय वनवासें त्यांत आजि कृत-पातें
तत्तप बहुमत त्यां जे तपले पंचाग्निमाजि सु-तपानें ७५
परि तूं भिवोंनकोंचि त्यजुनि मरणभय सुखें करीं समर
न शकतिल मद्भुजाश्रित मर्त्य विलंघन करावया अमर
रक्षीन असंशय मी तूं वदन करूं नकोंचि अवनत रे
कां सोसि लागल्याचें क्षुद्र अलाबुहि करूनि अवन तरे ७६
करिन असा व्यूह जया तो न शके वासवीहि तरायातें
प्रिय हित सत्य वदावें मज भूदेवास विहित रायातें ७७
अनुभविलें साध्वी-सुत- रत्न परिष्वंग-रुचिर-दामीहि ग्यां
गाती यशोरसाच्या अमृतरसाच्या न सुर सदा महिम्या
पुरवी प्रयागसा कीं हा धीरांचा समस्त काम रण
नाचवि अमरस्तका हें कां नाचविना समरस्तका मरण
कौरव पांडव यादव अन्यजन तसाच सरुन मीहि महा
अध्रुव[11] सर्वहि तुरवी काल जगीं स्थिति जसा तमीं हिमहा[12]
नरवर्या पर्यायें[13] आम्हीं हरिलों असोंचि कालवलें
रुगतिद रण-मरण उप- स्थित होतां कोवि चित्त कालवलें[14]
गुरूच्या अभयें बोधें कोळेंहि[15] सिंधुपाळक वळविला

---

१ तत्-तप-अर्जुनाचें तप, २ मत्-भुज-आश्रित, ३ खालतें, ४ भोंपळाहि, ५ रक्षण, ६ अर्जुन हि, ७ साध्वीपुत्राचें आलिंगनरूप-हार, ८ यश-रसाच्या, ९ कबंधातें, १० मस्तक असणारास, ११ अशाश्वत, १२ हिम-हा-हिमनाशक सूर्य, १३ प्रकारांतरानें, १४ कालवलें येथें भासाकरितां "व", १५ यमानेंहि म्हणजे त्याचें मरण आलें असा भाव.

हो काय मृत्युकरवीं दैवें प्रभु-मित्र-बोळ कवळेविला, ८२
सैंधव म्हणे विस्मय मी झालों कीं गुरु नद्ध अलीकवचा
गुरुवचना कीर्ति जशी कैंची पविच्या तशी भली कवचा ८३
सस्मित सचिंत होउनि गुरु शिष्यांच्या गुरु-प्रतिज्ञानीं
प्रार्थिति अपकीर्ति न हो ऐसें त्रिजगद्गुरुप्रति ज्ञानी ८४
ऐकुनि गुरु-प्रतिज्ञा कुरुकटकीं वाद्यमात्र वाजविलें
बहु नरसिंहध्वनिनीं घटिकाभरि सर्व गगन गाजविलें ८५



## अध्याय. ८

देव म्हणे सखया मज धर्मा भीमादि न पुसतां स्वमतें
कशि दुर्घट प्रतिज्ञा केली बा परम कठिन हें गमतें १
जाणों वेडे ते जे स्व गुरुजना रुमति-दायका पुसते
बा तूं सत्य धनंजय काय द्रोणादि काय कापुरस ते २
हे चार म्हणति ज्याला सैंधव परिसुनि गुरु-प्रतिज्ञा ती
कथिते झाले त्यासहि पायधरुनि हे गुरुप्रति ज्ञाती ३
नद्ध-क्षणार्थ केली स्वसुखें गुरुनें तुझ्या प्रतिज्ञा ते

---

१ जयद्रथ. २ अभिमन्यु, ३ ग्रासविला, ४ मिथ्यावादी (सकारांत पुरुषवाचक आणि बहुव्रीहि समासांत जें नाम येईल त्याची प्रथमा संस्कृताप्रमाणेंच केल्याचा मोरोपंतीं नियम आढळतो.) ५ हर्षयुक्त, ६ सखेद (द्रोणप्रतिज्ञेनें सस्मित आणि अर्जुनप्रतिज्ञेनें सखेद.) ७ कृष्णाप्रती.

कीं हे सत्या गानिल त्याच्या कीं नव भुजा-भनि ज्ञाते ४
शकट-व्यूहीं पद्म- व्यूह नयाच्याहि कर्णिके-माजी.
राहेल जयद्रथ कीं बहु चिंता बुद्धि पावली मोजी ५
कर्ण वृषसेन गुरुसुत मद्रप भूरिश्रवा कृपाचार्य
सिंधुपतिपुढें षड्रथ हे तेव्हां साधतें कसें कार्य ६
हे दुर्जय जिंकावे त्वां आधीं मग रु.दुर्जय द्रोण
तेव्हां कीं सैंधव वध हें शक्य म्हणेल तुज-विना कोण ७
मंत्रज्ञ सचिव सात्यकि भीमादिक धर्मराज हे आर्य
साध्याऽसाध्य विचारुन कीं व्हावें सिद्ध योजिलें कार्य ८
अर्जुन म्हणे मुकुंदा मानिशि ज्या सा रथांसि अधिक बळ
ते मद्बलार्ध-सम बल न जसें नवनीत केवळ दधि कवल ९
कृष्णा असोत मदधिक बल ते कर्णादि सा रथ केवी-नं
कोदंड-वेद-पंडित मी त्यांस हरूनि सार थकवीन १०
सैंधव शिर हरिन करिन रण सगण द्रोणगुरु-समक्ष महा
चिंता करूं नको बा गुरु माहात्म्येंचि गुरु-सम क्षम हा ११
किं बहुना जरि निकडे होइल जिंकीन तूर्ण विश्वास
माझ्या शस्त्राऽस्त्रांचा मजला आहेचि पूर्ण विश्वास १२
मजसीं करील गुरु त्या पापा रक्षावयास कटकट कीं
एकहि अभग्न राहों देईन न मी नया-सकट कटकीं १३

१ मध्यभागीं, २ हे सहामहारथी, ३ वळ (बळ) मारसाकरितां, ४ ग्रास, ५ कवि-इ... ६ श्रेष्ठ, ६ धनुर्वेद, ७ बळ, ८ गणासह वर्तमान, ९ मी अर्जुन, १० जगास, ११ भरंवसा, १२ जयद्रथा, + मार्ग

गांडीव यशस्वी जय- श्रीचें लोकीं अगार[१] मानिल यो
दुर्योधनहि उद्यां अभि- मानी तो कीं अगा रमा-निलया[३] १४
गांडीव चापयोद्धा मी सारथि तूं श्रित-स्वरंग[४] काय
मग जिंकिला न मागें कोण पुढेंही न मत्करग-काय १५
सर्वार्थ-दर्शक[५] म्हणों तुझिया भास्वे-च्छवि[६] प्रसादास
या-स्वार्थ-पात्र[७] रू गृह- स्था अतिथि स्वच्छ विप्रसा दास १६
मद्रथ सिद्ध असों दे उदया-पूर्वींच हेंच कर जा गा
आदेचि तुझा स्वीकुन सर्व-समवनीं[८] सदैव कर जागा १७
त्या रात्रींत श्रांतहि गज मन निद्रा-करीं न दे वाजी
जो नोहि म्हणे सैंधव मेल्या निद्रा करीन देवा जी १८
विजय म्हणे माधवजी दावाया वदन न स्वसे[९] लाजा
शोकोंऽग्नि[१०] निचा विझवा भिजवा पुसुनि नयन स्वसेली जा
रू-विवेक सुभद्रेच्या या-परिदेवन[१२]-परा रुनेला[११] हो
बहुधा देह शिवांनीं[१३] त्याचा दोनां परोंरू नेला[१४] हो २०
अंतःपुरांत जाउनि देव रुभद्रेसि बोध युक्त करी
त्या-सकरुणासि हें किति केला जेणें क्षणांत मुक्त करी[१५] २१
तूं वीरजा रुभद्रे बाइ उगी वीर बांधवा-कन्या
झालीस वीर-पत्नी वत्से तेंवीचवीरसू धन्या २२

---

१ स्थान, २ गांडिवा, ३ हे रमावासा-श्रीकृष्णा, ४ श्रित-स्वः अग-श्रित कल्पतरू, ५ सर्वपुरुषार्थ देणारा, ६ भास्वत्-छवि-प्रसाद-देदीप्यमान आहे शोभा ज्याची अशा प्रसादास, ७ स्व-अर्थ-या प्रसादरूप द्रव्यासाठीं दासपात्र म्हणों असा अर्थ, ८ सम्यक्-अवन-उत्तमप्रकारें रक्षणाविषयीं, ९ भगिनीस, १० शोकरूपअग्नि, ११ आपला शोला, १२ विलाप १३ कोल्ह्यांनीं, १४ मृत, १५ गजेंद्र.

सु-यशें पितृ-मातुल-कुळ उज्वल करिता असा असावा गे
बाई वदले सुर गिरि- जा-सुत तारक बली असा वा गे २३
त्यजुनि अमृत मधुर म्हणुनि जेविं न मधुखंड[1]-पायसा गावें
तव सुत-यश इतर यशो ऽधिक ऐसें बहुत काय सांगावें २४
वत्से आम्हांशि असी गति देवू वरद-नायक पिनाकी[2]
रण-मरण असरताऽधिक झाले नाहींत काय कपि[3] नाकीं[4] २५
उडविल उद्यां स्वसुत-वध- हेतु-जयद्रथ-शिरासि सितवाजी[5]
आण तुझी होईल प्राप्त दशा योग्य होय कितवा[6] जी २६
ऐकुनि म्हणे सुभद्रा हा वत्सा काळ काय हा निधना[7]
झाली कशी अकस्मात् धन-लुब्धाच्या समूळ हानि धना २७
शोकीं कसे बुडविले माझे अश्रु उत्तराऽश्रु-सह सारे
झालाऽसि स्वप्नींचा निधिसा[8] तूं दृष्ट-नष्ट[9] सहसाऽरे २८
धिक् पांडु-यदु-बळानें रक्षाया न शकलें मुलाला जें
स्व पति-पराक्रम-वर्णन- शीलत्वें मीहि बा तुला लाजें २९
झालें व्यर्थ वृकोदर- भावोजीचें बलाढ्य-पण आजी
वाटे मरेल शोकें नातू आहेत फार पण आजी[10] ३०
हा वत्सा धैर्य-निधे हा वत्सा जन-मनोहराऽकारा
हा वत्सा कुळतिलका हा वत्सा सर्व सद्गुणाऽधारा ३१
जी शूर-साधु-धार्मिक- पितृ-सुर-गुरु-विप्र-भक्त परम गती

---

१ शर्करा, २ शिव, ३ वानर, ४ स्वर्गवासी, ५ शुभ्रवाह अर्जुन, ६ दुष्टाला, ७ मरणा, ८ स्वप्नासारिखा, ९ दिसूनअदृश्य, १० कुंती,

प्राप्त असो तुज वत्सा विरह न देवू कदापि पर मग ती ३२
इतुक्यांत उत्तरे-सह कृष्णा ये होय भेर विलापाला
शोकीं आप्त-समागम विष-तरुच्या जेविं मेरविला पाला ३३
मूर्छित पडे सुभद्रा शीघ्र तिला सांवरी कमले-पाणी
वारा घाली लावी नेत्रांला शीतसें अमळ पाणी ३४
कृष्णा म्हणे कृष्णे दे पुण्य असावीच उत्तरा सासू
हा हें किती वदविती परि किमपि न देचि उत्तरा-सासू ३५
प्रभुला हाय म्हणाया लावी मोहीं बुडोनि घटिका हो
स्नेह असाचि असो जरि लटिका करितील साधु लटिका हो
उठउनि अनुजोसि म्हणे हें तुजला योग्य काय गा बाळा
त्यजिति हित स्र यश जोडुनि कवि पल भुग्भोग्य-काय-गावाळा
जें तव उदार देता झाला सर्वां-परा स्रन रणीं तें
मुनि-दुर्लभ कीं भेदुनि गेला तत्क्रुन परास्र तरणीतें ३८
सत्य करिल प्रतिज्ञा हा न कधीं विजयि बाहु टळला गे
न उडेल अरि-शिर-स्तृण कां ज्या विजयेषु वाहुटळ लागे ३९
कृष्णो-त्तरा-स्रभद्रा- धेनूंच्या मथुनि मोह-यवनानें
भवनानें येउनि तो प्रभु विजयाच्या करी समवनानें ४०
प्रक्षालुनि कर-चरण प्रभु विमळ जलें करूनि आचमनें
शुचि शयन रची मानी मित्रा मणिं आपणास काच मनें ४१

---

१ अतिशय, २ चारला, ३ कमलासारिखे आहेत ज्याचे हात असा, कृष्ण ,४ म- मसु-जिवंत, ५ प्रीति. ५ "साधु सर्व मायावी असें मानतात म्हणून." ६ श्वापदभोग्य शरीर गावाळाला, ७ यश, ८ विजय-इषु, ९ वावटळ, १० रत्न.

लिंप्त-स्थंडिल-शयनीं एकहि सोसेल शक्ष दर्भ कसा
देवाला भक्त नवा- नवसाचा गतवयास अर्भकसा ४२
शयना-समीप मांडी गांडीव प्रमुख सर्व हातेरें
तनेज वाढवी निज तेजाचें घे करूनि मातेरें ४३
निजतां रात्रौ त्र्यंबक- बलि-विधि हा शिष्ट-पथ सदा साचा
त्या महदस्वास्थ्यांनींहि लोपो दे लोक-गुरु न दासाचा ४४
अर्पावें गंध कुसुम उपहार त्र्यंबकासि जें कांहीं
कृष्णासि अर्पिलें तें पार्थें कीं स्वास्थ्य मानसीं नाहीं ४५
स्मित करुनि मनिं म्हणे प्रभु गेलें सोडूनि भान निज यातें
स्मित-दर्शन होतां स्व- स्खलित समजलें मनांत विजयातें
यज्ञापरत्वें स्वचलें पावुनि अहिता-समेत कांप हुडें
तो पार्थ स्वार्थार्थ प्रभुनें संप्रार्थिला न कां पहुडे ४७
समजुनि शरण्य-वर्य स्वर्गीं स्तविती जयाशि शिबि राजा
अर्जुन म्हणे तयाला श्रमलासि निजावयासि शिबिरा जा
निधि रक्षणार्थ जैसा अति-सादर राजराज यक्षांतें
पार्थाऽवनार्थ तैसा स्थापी शिबिरीं मुकुंद दक्षांतें ४९
शयनीं निजोनि पाहे परमेश्वर परि न पळहि निज लागे
चित्तीं चिंतेसि म्हणे त्वां वरिला कोण जडहि निजला गे ५०

१ स्वृद्धास, २ शंकर पूजाविधि, ३ महत्-अस्वास्थ्य-मोठ्या-चिंतेनंही, ४ श्रीकृष्णा, ५ हास्य मुद्राऽवलोकन, ६ आपली चुकी, ७ बुरुज, ८ निद्रार्थ, ९ निजे, १० कुबेर, ११ वनुरक्षारांतें, + सारविलेल्या यज्ञशाळेंतील शयनाचे गर्यी- या आर्येचा संबंध वरचे आर्येंत आहे म्हणजे शयनाचि शयनरची हा.

देव निशीथीं शयनीं बैसे मग दारुकासि आणउनी
त्यासी वदे प्रतिज्ञा पार्थाची प्रथम सर्व जाणउनी ५१
भक्तीं जसा महात्मा देहींहि तसा न दारुका रमला
या विजय-वेद-वचना घावा लागे सदा रुकार मला ५२
निज रक्षणाऽधिक ध्वज- रक्षण राजासि दारुका पडलें
मोलें राज शिराहुनि बहु असतें काय दांरु कापड तें ५३
मद्रथ सिद्ध असों दे जाणोनि व्यसन कां गळांठावें
पतिच्या अग्नि-प्रतिज्ञा बुडतां पडती स्त्रिया गळां ठावें ५४
विश्वासहि कुरु-गुरुचें आप्त-विपत्सरिदलाबु धनु ठावें
कोण म्हणेल व्यसनीं स्वजन समऽवना भला बुध नुठावें
तूं पांच-जन्य-नाद श्रवणीं शिरतांचि शीघ्र पाव कसा
पेटेन बसोनि रथीं मी कुरुकटकीं तृणांत पावकसा ५६
साची करिन सख्याची मारुनि सर्वहि अरि प्रतिज्ञा ते
जोडिनिल उद्यां बहु कर या शार्ङ्गो-प्रति अरि-प्रति ज्ञाते
प्राकृतहि लुब्ध जातां पदरींचा एकदा रुकांहि मरे
सर्वहि पदार्थ नापद मज भक्तचि एक दारुका हिमें रे ५८
दारुक म्हणे अवश्य स्यंदन आहेचि सिद्ध अजि तरणी
तेज न मिरविल तुमचा प्रभुजी सेवकहि सर्व अजित रणीं

---

१ मध्यरात्रीं, २ अर्जुनरूपवेद वाणीस, ३ ध्वजाची काठी, ४ दुर्दशा पावावें, ५ आप्त-विपत्-सरित्-अलाबु आप्तविपत्तीरूपनदींत भोंपळ्यासारिखें, ६ न-उठावें, ७ अग्निसारिखा, ८ धनुष्यानें, ९ चक्रानें, १० पंशाच्यातिसराभाग, ११ यं ५.९ शांतिदायक असा भाव.)

मोहें प्रिय सुत-शोकें करुनि पणहि दुःशला-विलापार्थ
स्वप्नीं दर्शन दे प्रभु कीं तो कांसेस लाविला पार्थ ६०
श्रीपति म्हणे सख्या कां म्लान वदन चित्त काळजी वाहे
चिंता चतुर न वरिती नाशी धृति-वित्त काळ जीवा हे ६१
स्वप्नींहि प्रेमें दे प्रत्यु-त्थाना ऽसनादि वासवि त्या
जोडी कर तेजस्वी तेजस्वीशा जसा दिवा सवित्या ६२
भीती न काल-काल- प्रभुचे कालाहिच्या विषा दास
सांग स्पष्ट सख्या तूं कां सांपडलासि या विषादास ६३
पार्थ म्हणे देवा कशि होइल केली खरी प्रतिज्ञा ती
रक्षितिल सकल सैन्यें व्यूहा-मार्गे अरि-प्रति ज्ञाती ६४
मज दुर्घट न सकळ कुरु वीर-कटक-कदन-कर्म परि सविता
दुर्तगति कृत-प्रतिज्ञ द्रोण गुरुहि सर्व धर्म परिसविता ६५
सैंधव-शिर न उडवितां जरि जाइल काय भानु अस्त-नगा
तरि जीवित अयश-स्कर व्यर्थ स्त्री रत्न जेविं अस्तन गा ६६
दुसरी तरि प्रतिज्ञा रक्षिन दहनांत कांय होमीनें
नाकहि नरक तुज-विना वांचे अन्यत्र काय हो मीन ६७
स्पर्शमणे संगा क्षण विघ्नें धरिला विषाद या लोहें
मित्र तुझें पात्र न हो विरहाऽपयशो-विषा दयालो हें ६८
प्रभु करुनि जल-स्पर्श प्राङ्मुख बैसे उगाचि पळ आधी

---

१जयद्रथस्त्री म्हणजे विलापार्थ, २ धैर्यरूपद्रव्य, ३ तेजस्वी-ईशा, ४कालाचाकाळअशा, ५कालसर्पाच्या, ६ खेदास, ७त्वरित-चालणारा, ८अस्ताचलास, ९ स्तनरहित, १०देह, ११हवन करीन, १२जलावांचून इतरठिकाणीं, + प्रति-उत्थान-आसनादि-अभ्यु त्थानादिआसनः

मग विजयास म्हणे मी सांगेन नसेंचि कार्य तूं साधीं ६९
परमाऽस्त्र सनातन जें ज्ञाते म्हणताति पाशुपत ज्याला
जेणें देव महेश्वर समरीं असुरांसि मारिता जाला ७०
तें जरि असेल अवगत मारिसिल उद्यां जयद्रथास रणीं
अवगत नसेल तरि मन लावीं त्या-त्रिपुर-शत्रुच्या चरणीं
करिल प्रसाद देइल अस्त्र सु-निश्चय करीं असा ध्यो तें
शिव-पद सु-साध्य करितें ध्यातां मोक्षाहि कीं असाध्यातें ७१
बैस स्वस्थ ध्यानीं पार्थासीं पतियासि लाव कसा
हो श्येनसा सख्या तूं शत्रु जयद्रथहि शीघ्र लावकसा ७२
उदक-स्पर्श करुनि नर बैसे दर्भाऽसनीं असा ध्याया
कीं नारायणहि म्हणे परमा सिद्धिहि नसे असाध्या या ७४
धरितां समाधि पार्थ ब्राह्म-मुहूर्तींच तो असें पाहे
जातों स्वयें उदीची- प्रति गगन-पथें सवें हरिहि आहे ७५
चालविला दक्षिण-भुज धरुनि नभीं पार्थ जलज-नाभानें
त्याच्या तेजःप्रवर्गां सोडुनि जायेंचि खलजना भानें ७६
पाहे हिम-नग मणिमान् श्वेताऽद्रि धनाधिप-प्रिया नलिनी
कविनीं शिव-लीलासी जी साऽदर सेविली सदा अलिनीं ७७
स्वर्गासि सुरवें जीच्या स्नानें पानें सुराप गेला हो
अवलोकी नारायण- सख बहु मानें सुराऽपगेला हो ७८

१ झाला, २ आश्विनकल्यनरूच्या, ३ ध्यानकर, ४ पाहांटच्याराात्रीं, ५ उत्तरदिशेस, ६ कमलनाभकृष्णानें, ७ स्मृतीनें, ८ कुबेरप्रिया, ९ कमलयुक्तसरोवर-नदी. १० मद्यपी, ११ सुर-आपगा- देवनदीला-

प्रेक्षी मंदार-द्रुम- भूषित-मंदर-गिरि-प्रदेश तदा
पाहुनि काले[1]-नगानें दृष्टि न लागो असें वदे शतदा ७९
जो ब्रम्हतुंग-पर्वत तैसाचि सुतुंग आणि शतशृंग
शर्याति-वनीं तापस कमल-वनीं जेविं हंस-खग भृंग ८०
अश्व[2]-शिरःस्थान सकळ सिद्धींचें जें सभाग्य माहेर
आथर्वणाऽश्रमहि ज्या त्यजुनि पळहि न मुनि निघति बाहेर
वृषदंशास ह्या मंदर पूर्वींहृदयांत रेखिले होते
जे परम रम्य तापस- सुर-सिद्धि-निवास देखिले हो ते ८२
श्रीराम-बाण-सम गति देउनि दावी सखयासि नवल हरी
देव-दया दासा दे सुख न तसें अमृत-सिंधु-नव-लहरी
तो श्री-नारायण-सख नर तेजःपुंज-पर्वता पाहे
चित्तीं म्हणे निवाले डोळे सोडूनि सर्व तापा हे ८४
त्या शैलाच्या अग्रीं झाले सुर चित्रसे पहाते ज्या
अवलोकिला भवानी सह भगवान् भूत-पति महा-तेजा
ज्याच्या शुद्ध तपा-सम कोठेंही किमपि तप न भास्वर[3] गा
कृष्ण नमस्कारी-त्या दासाच्या कोटि[4]-तपन-भा स्वरंगा[5] ८६
अजित तसा विजय नमी क्षिति-वरि ठेऊनि सुचिर शिर गुडघे
बहु नमन-लाभ-लोभी जाणो दुष्काळ-सुक्षुधित गुडें[6] घे
ईश्वर म्हणे उठा बहु साधु तुम्ही मुनि कवि-प्रवर दास

---

१ नामविशेष पर्वत, २ हयग्रीवस्थान, ३ देदीप्यमान, ४ कोटिसूर्यप्रभा असा. ५ कल्पतरूला, ६ गुळ.

मज आ[1]शुतोष म्हणती सर्वज्ञ अनेक-विप्र- वर-दास ८८
झालों प्रसन्न मागा ऐसें ऐकोनि अभय-दा नमुनी
स्तविती प्रेमें सात्विक- भावांत बुडोनि अभय-दान मुनी ८९
खरसेवा-सुरभीच्या कासेला भक्त वत्स लागावा
कविनीं तुझा प्रसादचि अनु-दिन वा भक्त-वत्सला गावा ९०
सर्वाऽर्थ संप्रदर्शक अर्क तुझे पाय अंधकाऽ[3]राते
याचे आश्रित जे जे भीति भ[4]वाऽरण्या न अंधकारा ते ९१
नमनें स्तवनें अर्जुन होय स्नात प्रसाद-वृष्टीतें
आलें धैर्य मनांत प्रभु-दर्शन-योग्य-तेज दृष्टीतें ९२
जें आपण कृष्णासि त्र्यक्ष[5]-बलि-द्रव्य वाहिलें होतें
प्रभुच्या पाया पाशीं पार्थें पुष्पादि पाहिलें हो तें ९३
[6]पार्थिव-मूर्ति-समर्पित- माल्य किरातीं तनुसचि हें वाटे
हरि-हर-रूपाऽ[7]भेद- ज्ञानाऽनंदाऽमिनें गळा दाटे ९४
मागे मग प्रतिज्ञा सिध्यऽर्थ प्रभुसि पाशु-पत न नमुनी
कीं म्हणति न हो अयशीं हो मृत्यु मुखांत आशु पतन मुनी
स्मित करुनि महेश म्हणे यदु[8]-कुरु-वरहो पुरेल हा हेत
जा चाप बाण आणा त्या अमृत-सरोवरांत आहेत ९६
[1]कृष्णा प्रभुसि नमुनि जों गेले रवि-मंडळ-प्रभा सु-सरा

१ अल्पसंतोषी, २ नरनारायण. ३ अंधकासुररिपो, ४ भव-आरण्य-संसारनासका, ५ त्रि-अक्ष-बलिद्रव्य शंकराचें पूजासाहित्य, ६ पार्थिवलिंगास अर्पण केलेलें पुष्पज सें किरातस्वरूप धारण केल्यावेळीं प्रभुच्या ठायीं पाहिलें नसें आतांही पाहिलें असाऽऽर्थ, ७ अद्वैतज्ञानाच्या आनंदप्राप्तीनें, ८ यादव कौरवश्रेष्ठ कृष्णार्जुन, ९ कृष्णार्जुन.

तों एक नाग आहे ॰ घोर सहस्राऽस्य[1] घोरतर दुसरा ९७
पहि ल्याहुनि बहु दुसरा दुष्प्रेक्ष्य विषाऽग्नि-संपदे वमुनी
ज्यातें पाहुनि पार्थित दूर-स्थित नताहि[2] कंप देव मुनी ९८
वंदुनि भावें म्हणतां शत रुद्रिय-पाठ हात जोडून
झाले धनुष्य शर ते नाग स्व-महोग्र-रूप सोडून ९९
कृष्ण-स्कंधीं घेतीं चाप गमे[3] हेल विशाल शरें भाला
प्रभुला नमुनि निवेदुनि नमिति पुन्हा सिंह जेविं शरभाला
गुण शर जोडुनि जेव्हां प्रभु मांडुनि ठाण चाप आकर्षी
तें ध्यान पाहुनि जितें[4] कृष्णाचि न म्हणति समस्त नाकर्षी १०१
श्रीमूर्ति राज-मुद्रा नर कागद त्यांत सम ठसा हो तो
तो ध्यान-योग बुडतां सर्वांहि जडांसि कमठसा[5] होतो १०२
हृदयांत ध्यान तसें धरिलें सरहस्य[6] पाशुपत गा तें
जें कालातें जिंकी जेविं गरुड-तेज आशु पतगातें[+] १०३
प्रभु दावुनि निज विजय-द सदरि-घ्न[7] ध्यान चाप चढऊनी
शर त्या सरींच टाकी कार्मुकहि महाऽस्त्र-मंत्र पढवूनी
विजयी व्हा जा ऐशी आज्ञा होतां महेश-पद नमुनी
होउनि कृतार्थ आले शिबिरासि पुन्हां प्रसन्न-वदन मुनी[8]
प्रभुनें स्वप्नीं केला कृत-कृत्य सखा न लेश भागविला
इकडे दारुक गोष्टी सांगोनि प्रातरऽवधि[9] जागविला १०६

१ सहस्रमुख, २ नागर, ३ शिव, ४ जयजय, ५ कूर्मासारखा (उद्धारकर्ताअसा भाव.) ६ मंत्ररहस्यसहवर्तमान, ७ सत्-अरि-घ्न, ८ नरनारायण, ९ प्रातः कालपर्यंत, + पक्ष्यातें.

प्रथम करी जप होम ब्राम्हण पूजादि विहित जें कर्म
मग विश्वकर्म-निर्मित भास्कर-भद्राऽसनीं बसे धर्म १०७
शुभ्रांऽबर मुक्ता धर सित-चामर वीज्यमान शोभे तें
बहु राज-रत्न ओढुनि घे शारद-पूर्ण-चंद्र-शोभेतें १०८
चंद्र किति जसा धर्मा न तसा कवि मानवे शतक्रतुला
मग तद्यशोऽमृताची धरिल कसें मानवेश तत्क तुला १०९
ज्याचा प्रताप-रवि मधु- कैटभ-तिमिरीं लव प्रभा वमला
तो प्रभु ज्याच्या द्वारीं वाच्य न त्यांचा लव प्रभाव मला ११०
तों भूप-प्रभु कवची खड्गी मणि-कुंडली युवा वंदी
द्वास्थ म्हणे प्रभु येतो तो वेद स्तविति ज्या जसे बंदी १११
धर्म म्हणे त्यजिति जया नमुनि कुलें-धनादि भव-मदा ज्ञाने
प्रभु चरण दर्शन मला द्याया इच्छिति कसे मदाऽज्ञा ते ११२
तिमिर-हत गतींच्छु कवण रविच्या घाठील आण वाजीतें
आणाही द्वास्थ तया पूजा साहित्य आणवा जी तें ११३
येतां प्रभुचें धर्म स्वकरें लागे सभाजन कराया
धन्य म्हणे यां जसि रघु- पति बहुमानी सभाजनकराया १४
भक्तापुढें न मिरवी तेज श्रीमूर्ति रवि सभाजी जी
दावी बहु विनय म्हणे जरिहि ब्रम्हाऽदि कवि सभा जी जी
द्रुपद विराट वृकोदर सात्यकि-इत्यादि सर्वही आले

---

१ तत्-यश-अमृताची-धर्मयशोमृताची, २ मानवश्रेष्ठ, ३ वजन करण्याची तुला, ४ धर्माचा, ५ द्वारपाल, ६ कुल-धन-तारुण्य आणि विद्या-यांपासून भव म्हणजे निर्माण होणारा जो मद त्यानें. ७ अंधकारामुळें आडलेला, ८ गमन करण्याविषयीं इच्छा करणारा, ९ पूजन. १० धर्माला. ११ रामचंद्रास बहुमानी अशा, १२ सत्कारी.

झाले कृतार्थ हरिला पाहुनि चंद्रा चकोरसे धाले ११६
धर्म म्हणे माधवजी भ्यालें मन करुनि बोध वळवा जी
व्यसनीं तरेल मंदर- सा जरि तारील तो धवेळ-वाजी ११७
कृष्ण म्हणे राजाजी कां भ्याला विजय हा अ सामान्य
एका पुराऽरि वांचुनि नाहींच जगत्त्रयीं असा मान्य ११८
ज्या पाहुनि स्फुरहि म्हणति कृष्णाचि कृष्णाऽनुजा धव लवा जी
तो धर्माला सर्वा- मागुनि येउनि नमी धवेल-वाजी ११९
आलिंगुनि धर्म म्हणे वत्सा विजयोऽस्तु का महा बाहो
मारिन जयद्रथ म्हणसि तरि सत्य तुझा स्फु-काम हा वा हो
आश्चर्य मेधाविजया विजया होतोसि तूं करुनि आजी
कीं हा प्रसन्न बहु तव मुख-वर्ण असाहि अच्युतहि आजी
धर्मासि विजय सांगे स्वकर्मांच्या अद्भुता अनुभवातें
नमिती क्षितिवरि ठेउनि शिर सर्व स-देवकी-जनु भवातें
किति म्हणति काय सुरभी पुरवी आख्या पिनाकि-लीला हो
किति म्हणति एक हरि हर इतरीं हा स्थापिना किलीला हो १२३
धर्म म्हणे हूं अद्भुत करुनि मला आजि समर-सव दावा
काय इतर रस योगचि एक भला आजि-समररस वदावा १२४
धर्म प्रेरित गेले ते भीमाऽदिक स्फुरोपम रणाला
राम-महित जसे दश- मुख-कटकाच्या स्फुरोप मरणाला १२५

---

१ श्वेताश्वअर्जुन, २ शिव, ३ कृष्णा-अनुज्या-धव (पति) अर्जुन ४ नमा, ५ विजय-उत्सुका, ६ युद्ध, ७ देवकी नंदनासह, ८ युक्तिला, ९ युद्धयज्ञ, १० युद्धतुल्यरस, ११ देवतुल्य, १२ शार

## अध्याय-१

श्रित[1]-वत्सलें मुकुंदें त्यजिला स्व-स्वामि[2]-भाव-सार थिनें[3] १
प्रेमें श्रीहि न वरिली तेसी जेसी स्वदास[4]-सारथिना १
सिद्ध करिति यन्नामें[5] ब्रम्हाऽदि सकल मनोरथास जुनीं[6]
तो प्रभु म्हणे पटु न मी दे पंचा[7]ऽक्षर मनो-रथा सजुनी २
देव म्हणे अर्जुनजी व्हा सिद्ध रथस्थ तपन[8]-कोपाऽर्थ
तें कां न म्हणेल मनीं ब्रम्ह-पदाद्यऽर्थ तप नको पार्थ ३
करुनि प्रदक्षिण द्विज- वृंदासि रथासि तो कवि नयानें[9]
संग घे[10]वोनि अधिष्ठी[11] जनकाऽकीं जेविं तोक विनयानें[12] ४
काय उणें त्या[13] करि स- श्रीकृष्णा[14] ज्या निवास[15] विप्राऽशी[16]
कर्णांहीं[17] स्व स्तुतिस श्रीकृष्णाजानि[18] वासवि[19] प्राशी ५
झाला निज दासाचा ज्या स्तविति सुधीर विप्र तो दास
श्रीनलिनीचा[20] चक्र त्यजुनि धरि सुधी[21] रवि प्रतोदास[22] ६
पांसु[23]-निकरहि प्रभुच्या हेतु बहु प्रीतिचा बुकासाच
वाटे न कौस्तुभाला जपला जगदीश चाबुका साच ७
अनुभवती रूपाची एक स्थिति एक हानि पट[24] सूत
तैसे हे कृष्ण सखे एक रथी एक हा निपट[25] सूतें[26] ८
कृष्ण रथीं चढले मग तोहि चढे पुत्र सत्यकाचा[27] हो

---

१ आश्रिताविषयीं कृपाळु अशा, २ धनीपणा, ३ तोकडा, ४ स्व-दासाचें सारथ्यपण, ५ यन्-नामें, ६ पुराणीं, ७ हे पंचाक्षरमंत्र, ८ सूर्यकोपार्थ, ९ नीतीनें, १० घेवोनि, ११ वसे, १२ नम्रतेनें, १३ अर्जुनास, १४ कृष्णासह, १५ स्थान, १६ ब्राम्हणाच्या आशीर्वाद, १७ कानांनीं, १८ द्रौपदीपति, १९ अर्जुन, २० लक्ष्मीरूप कमलिनीचा, २१ चांगला बुद्धिमान्, २२ चाबुकास, २३ धुळी-समूह, २४ वस्त्र, २५ अत्यंत, २६ सारथी, २७ सात्यकी.

जेविं हर-रथीं विधि-हरि दुसरा दृष्टांत सत्य कोंचा हो ९
अवलोकुनि सात्यकिला पार्थ म्हणे धर्मराज रक्षावा
सैंधव-वधाहुनि उणा न तुवां हा कार्यभाग लक्षावा १०
चिंता करूं नको तो कुरु-गुरु तेजें असो अनल सर हो
एक मजपुढें माधव तूं जा धर्मापुढें अनलस रहा ११
गेला तो धर्माला रक्षाया जेविं सत्यक-पित्याला
स्फुगलों-क्त राम-सेवा स्मरला पाहोनि सत्य-कपि त्याला १२
द्रोणें रचिला सैंधव- रक्षाऽर्थ व्यूहनायक-व्यूह
परमाऽर्थ रक्षण-क्षम अपराजित जेविं काय कव्यूह १३
चोवीस कोस लांब व्यूह दहा कोस रुंद तो मागें
जेणें श्विना न बाधों धावा पर[10]काल जेविं सोमाऽगें १४
जिंकीसा कोणाहि न शास्त्रें शास्त्रें तपोनि धीरा जा
तो जपला अमृतरसा बहु शास्त्र तसा तपोनिधी[12] राजा[13] १५
सैंधव मागें दूर स्थापूनि व्यूह-गूढ-गर्भांत
होय पुढें पर कटकीं जाया दैव जेविं शंख-दर्भांत १६
व्यूहापुढें स्वयें गुरु दुर्मर्षण त्यापुढें उभा राहे
मृग जैसा वाराया हरि[15]ची तो वाट जिष्णुची पाहे १७
सेनाग्रीं वाजविती नर-नारायण सरवे दर[16]वरा जे
ते[17] मोरसे भुजगसे ऐकनि होउनि सरवेद रव राजे १८

१ कच्चा, २ जयद्रथ, ३ अग्नि, ४ सरोवर, ५ अर्जुन, ६ आलस्यरहित. ७ सावध. ७ स्फूर्तीवानें सांगितलेली, ८ व्यूहश्रेष्ठव्यूह, ९ कवि-ऊह- कवितर्क, १० शत्रुरूपकाळ, ११ सीस-अग- अमृतरसानें, १२ द्रोण, १३ जयद्रथास, १४ दावानळ, १५ सिंहाची. १६ शंखश्रेष्ठ, १७ नरनारायण.

रोमांच-कंचुकाला कडकडतां कृष्णा कंबु कपिल्याला
पर सोडी भानाला सिंह-रवें जेविं जंबुक पिल्याला १९
बहु गज हय हगति मुतति. दे शंख-स्फुरण तें विपत्तीतें
श्रीनृहरि-नाम-गर्जन भूतातें होय तेविं पेत्तीतें २०
ज्याचे निवात-कवचा घोऽस्फुर बला निपट म्हणति शर दैत्र
त्या दुर्मर्षण-बल किति गर्जुनि पिववील वायु शारदाऽभ्र[4] २१
अर्जुन-बाण-समूहें दुर्मर्षण-कटक सर्व भंगे तें
जरि विजय-शक्ति तें पर रोधिल सैकतहि सेतु[6] गंगेतें २२
दुःशासन होय पुढें दुर्मर्षणसाचि भग्नहि रणांत
खद्योत-तेज उरतें कांहींतरि काय अर्क-किरणांत २३
दुःशासनं शीघ्र पळे जाणो गिरिवरुनि दगड तो घसरे
गुरुवरि जाय कपि-ध्वज[7] जेविं पुढें मथुनि सेतु ओघ[8] सरे २४
कृष्णाऽनुमतें अंजलि जोडुनि अर्जुन म्हणे अहो गुरुजी
स्वस्त्यऽस्तु म्हणा घा मज शिष्या आशी जयप्रदा गुरुजी २५
पांडुसम युधिष्ठिरसम कृष्णासम तुम्ही त्रिनेत्र[10]सम महित[11]
करिल प्रसाद तुमचा जेविं तसें नाकनाथ[12] न मम हित २६
प्रेम असा मान्य करी गुरुराज दयालु जनक-सामान्य
तें न स्मरेल जो तो होईल कृतघ्न जन कसा मान्य २७
या दुर्भेद्य-व्यूहीं इच्छितसें आजि मी शिरायास

---

१ मारुति, २ पायदळास, ३ तुच्छ, ४ शरत्-अभ्र-शरदृतूंतील अभ्र-(मेघ) ५ वाळूचा, ६ बांध, ७ ज्याचे ध्वजीं मारुति आहे असा अर्जुन, ८ प्रवाह, ९ मोठी, १० शंकरासमान, ११ पूज्य. १२ इंद्र.

तुमच्या प्रसाद नसतां होइल माझा वृथा चिराऽयास २८
अश्वत्थामा जैसा सैंधव वध पणहि हाहि राखावा
कीं भंगतां प्रतिज्ञा मान-धनें अग्नि वी हिरा खावा २९
हांसोनि द्रोण म्हणे पार्था मजला न जिंकितां आजी
जिंकावया जयद्रथ शक्य नव्हे मज-सवें करीं आजी ३०
ऐसें वदोनि मार्गण- वृष्टि तयावरि महांतपा सोडी
जेंवि-आटोपाया मत्त-गज-शिरीं महान पारसोडी ३१
तो अर्जुन गुरु-कार्मुक खंडाया बाण निज गुणीं जोडी
तें जाणोनि गुरु प्रभु गांडीवाच्याचि त्या गुणा तोडी ३२
जोडुनि गुण पार्थ करी कुरु-सेना-पाल-विप्र-कट कांऽता
कीं गुरु-पराभवेंही कुरुसेना पाळवि प्रकट कांतां ३३
त्या दोहीं कृष्णावरि गुरु खवळे जेंवि देव कीनाश
बहुधा म्हणे पृथेसह शोकें पावोचि देवकी नाश ३४
द्रोण करी नाराचें क्षत वक्षीं जेंवि तक्षक रदानें
कांपे क्षण तो भीना रक्षाया परम दक्ष करदानें ३५
धैर्य धरुनि गुरुवरि शर सोडी श्वेताऽश्व जेंवि कुपितांही
हर्षे द्रोण न कोपे पुत्रोत्कर्षे कुंटे न कु-पिताही ३६
जो योजिला गुरूनें सर्वहि तो कृष्ण-रक्त सायक पी
ज्याच्या बैजीं प्रसादें खाती ब्रम्हाऽद्यऽलभ्य साय कपी ३७

---

१ किंवा. २ युद्ध. ३ पांठें आहेत तपज्याचें असा द्रोण, ४ शापडी, ५ हा कापारी, ६ यम, ७ दंतानें, ८ कृष्ण, ९ हात देण्यानें, १० क्रुद्धसर्प, ११ दुःखनसानी, १२ गोकुळीं, + द्रोणाच्या सेन्याचा अंत (नाश)

गुरु-शर पडति नर-रथीं नव जलजीं जेविं भृंग रस-रसोऽर्थं
कीं त्या रू-यज्ञ-वाटीं शिरला घ्याया स्वभाग सुर-सार्थ ३८
केशव म्हणे सख्या हा गुरु सोडुनि मुख्य कार्य साधावें
सैंधव वधार्थ सत्वर नियत शिवाऽर्चोऽर्थं आर्यसा धावें ३९
पार्थ म्हणे सूचविलें समयीं हित उचित काय तुज बाहूं
चाल सख्या लवकरि हा कुरुसेना-पाल घाल उजवा हूं ४०
गुरुतें प्रदक्षिण करुनि रथ काढी वासुदेव वेगानें
नच म्हणितलें जयाच्या किमपि यशाच्या न देवबे गानें ४१
जातां गुरुवरि सोडी शर नर होऊनियां पराङ्मुख
असुरा अमृत नसे बहु दुर्लभ ज्या-साधुचें परा वृत्त ४२
द्रोण म्हणे रे अर्जुन कोठें जातोसि कां निसरलास
शत्रुस न जिंकितां तूं निघसी कीं या पणा विसरलास ४३
पार्थ म्हणे शत्रु न तूं माझा गुरुराज बा दयालो कीं
जोडील कोण समरीं तुज जिंकुनि साधुवाद या लोकीं ४४
ऐसें बोलोनि निघे अर्जुन सत्वर सिंधुराज-वध-कर्मा
त्या अयुत-बळें रोधिति जय कांबोज श्रुतायु कृतवर्मा ४५
त्या कटकातें मथितां गांठी कुरु-गुरु पुन्हाहि पारि त्यानें
सोडी पार्थ महा-मति काल-विलंबाऽर्थ युद्ध करित्यानें ४६
कृतवर्म्योसीं झटतां देव म्हणे चाल करुनि मथना तें

---

१ नूतनकमलावर, २उत्तमरसाकरतां, ३उत्तमयज्ञमंडपीं, ४ देवतासमूह, ५ शिवपूजना-र्थ, ६ पराङ्मुख, ७ द्रोणाचें, ८शाबासकी, ९जयद्रथाचा वध करण्याचें व्रत केलें ज्याचें असा अर्जुन, १० द्रोणातें, ११ कालक्षेप करण्या करितां.

आणू नकोचि चित्तीं त्याही हें त्यजुनि धर्म-पथ नातें ४७
मोहुनि भोज निघे कीं प्रभु वरिच्या वरि म्हणे सख्या निघ रे
शिरतां नर द्रवे पर- बळ अर्कें घनहि घृत जसें विघरे ४८
पांचाल उत्तमोजा चक्रत्राता दुजा युधामन्यु
त्यां गांठी भोज जसा गत-सत्संगा नपीं बुधा मन्यु ४९
व्याली ज्याला वरुणा- पासूनि नदी प्रसिद्ध पर्णाशा
जेणें पूर्ण न केली स्व परि भवें शत्रुचीच कर्णाशा ५०
पर्णाशा प्रार्थी बहु ज्या अमर करा वरें असें वरुणा
ज्याला मंत्रपुरस्कृत सु-गदा देउनि पिता करी करुणा ५१
ज्यासि म्हणे वरुण तरणि होउनि अरि-सागरांत तारील
युद्ध न करि त्यावरि जरि सोडिसिल गदा तुलाचि मारील ५२
तो धावला श्रुतायुध- राजा भीमाऽनुजासि वाराया
होउनि विरथ स्व गदा सोडी नारायणासि माराया ५३
जें भक्ष्य-भ्रांत्याऽगत- मूषीतें भय महा भुजग दे तें
त्या वरुण-कृत-नृपाच्या देता झाला महाभुज गदे तें ५४
जसि योजितां अविषयीं कृत्या तसि ती महागदा परते
मारी श्रुतायुधाला सर्व भयें भंगले तदा पर ते ५५
मग कांबोज-सुदक्षिण नृप वधिला जेवि सिंह शरभानें
हरिति शिरें बहुतांचीं जेसीं तेसींच पार्थ-शर भानें ५६

१ सूर्यतेजें, २ गत-सत्-संग- गेलाआहे साधुसंग ज्यापासून अशा, ३ कोप, ४ नामविशेष नदी, ५ श्रवणेछा, ६ मंत्रपूर्वक, ७ नौका, ८ भक्ष्य-भ्रांति-आगत-मूषी; भक्षणाच्या आशेनें आल्याउंदरीस, ९ अर्जुन.

हाणी श्रुतायुराजा समरीं रक्त[1]प्रपाऽर्थ तोमर तो
मोहे प्रभुही जाणों वदला नवदोनि पार्थ तो मरतो ५७
तद्बंधु अच्युतायुहि हाणी शूलें करूनि सितवाहा[2]
देव म्हणे बा सावध हो देइल हर्ष मोह कितवा हा ५८
उठतां वाटे आला जाऊनि प्रेत-राज-सदनातें
वारा घालूनि पुसी प्रभु वारंवार मित्र-वदनातें ५९
गमले स्व काळिजा अहि डसले शर शौरिच्या शरीरा जे
विजया निज नयन-युगीं कोण दोघे बंधु ते शौरी राजे ६०
दावी विकलत्व प्रभु जो कांहीं कौतुकेंचि कोपाऽर्थ
इंद्राऽस्त्रें कटकासह करि दोघांचेंहि भस्म तो पार्थ ६१
नियुतायु एक दुसरा दीर्घायु कुमार वीर जे त्यांचे
तेही वधिले विजयें शहों न दिलेचि धीर जेत्यांचे ६२
वेष्टिति अंग कलिंग प्राच्य असे बहुत भूप कोपानें
ते दंडिले नरानें जेविं स्व-पशु प्रमत्त गोपानें ६३
पार्थ प्रवर्तवी पर- बल मर्दुनि शोणितोऽपगेला हो
जेसा वर्षा काळीं तैसाचि क्षोणि ताप गेला हो ६४
प्रभुसि गदेनें हाणी तो अंबष्ठ-श्रुतायु जगदीशा
हृदयीं धन्य म्हणे त्या विजय ध्वज-निलय वायुज गदीशा
नरे[12] त्या गदेशि खंडी जों तो धांवे धरूनि दुसरीतें

१ रक्ताचीपोईहोण्याकारितां, २अर्जुना, ३ कपटयास, ४ यमगृहातें, ५ रजःकण ६ बाण धरणारे, ७ जयनशीलांचे, ८ पूर्वदेशाचेराजे, ९ शोणित-आपगा-रक्तनदीला, १० अंबष्ठदेशाचाराजाश्रुतायु, ११ वायुपुत्रमारुति, १२अर्जुन.

आला गमे नदीचा लोंढाचि पुढें करूनि स्वैरीतें[1] ६६
नाडी आधीं मभुला मग पार्थाला पुनः पुन्हा रागें
अद्भुत तें चावावें गरुड-गुह-शिखी बळें जसे नागें ६७
जसि गति घटकर्णाची[2] करि पुरवाया स्व काम राम रणीं
झाली प्राप्त तसिच त्या पार्थापासूनि पामरा मरणीं ६८
शिरतां विजय बहु करी दुर्योधन कटक तें विकळे[3]-पातें
शिववील न प्रवेशों हरिणाच्या हरिहि तेंविं कळपातें ६९
व्यूहीं शिरतां अर्जुन दुर्योधन निज मनीं म्हणे हाय
जाय द्रोणा-पासीं नमुनि म्हणे त्यासि हें बरें काय ७०
तो तुज-समक्ष कैसा शिरला व्यूहीं शिरो नये वातें
तेजें अलंघ्य कीं तूं आचार्या वासवादि-देवातें ७१
भ्याले सर्वहि योद्धे पार्था हरि जेविं वध-परा शरभा
आम्हां न सोसवे नर- रथ-भा जसि राक्षसां पराशर-भा[4]
दिधलें जयद्रथाला अभय व्यूहीं सिताऽश्व शिर कविला
रक्षोचित प्रतिज्ञा- वच न नसें धन कलत्र शिर कविला[5]
विश्वास-घातकी हा लावियला त्वांचि पाप डाग मला
अभयद जयद्रथा नव- कर माथां जेविं पापडा गमला ७४
महि-प्रिय-रत धर्म- प्रिय-रत तूं स्पष्ट आजि कळलास
मज पोषिल्या विष-फळें अमृत+-फळें मदहितार्थ फळलास ७५
तूं मधुनें मारविला केवळ वरि मात्र गोडया खरची

१ मगरीतें, २ कुंभकर्णाची, ३ मूर्च्छित, ४ पराशराचें तेज, ५ ज्ञात्याला,

+ "अमृत-फळें मदहितास फळलास." असाही एक पाठ आहे.

जो गुण करी तयाचें अरि-यश होउनि अनिष्ट वारव र्‍चीं ७६
खेदें प्रलाप केला गुरुजी चित्तीं धरूं नका पावा
रक्षा सैंधव आपण लाउनि पोखुनि तरू न कापावा ७७
द्रोण म्हणे तूं अश्व- त्थामासा हें न अन्यथा नातें
सेवीं गुरु मातेच्या विद्या-रूपा न अन्य थानातें ७८)
कोप नसोचि तुझा मज सांगतसें सत्य मी न वंचकसा
माझा धनंजयाचा होइल तुल्य प्रताप-संच कसा ७९
मी वृद्ध रथी सारथि नर नारायण सखे तरुण भाते
अक्षय लक्षयशोधन- जनसन्नुत रथ तुरंग धनु वाते ८०
बा सोडिले शर पुढें जे जे त्या अर्जुनें महाभागें
वेगाऽतिशयें पडती ते एक कोश तद्रथामागें ८१
हय-बल बहु कृष्णाचें निपुणपणाहि बहु न सांगवे गा तें
भ नसा संचहि सोसिल- हि प्रवयाचें न आंग वेगातें ८२
व्यूहाचें सुख सोडुनि त्यामागें म्यां वृथा न लागावें
वदलों धर्म धरिन तें करिन मग तुम्हीं न कां मला गावें
करितां युद्ध धनंजय उजवें घालूनि हात जोडूनी
गेला न जिंकितां मज बहु होकरितांहि शीघ्र सोडूनी ८४
अर्जुन शिरला व्यूहीं त्या मागें धर्म सांपडेल मला

---

१ ठका प्रमाणें, २ जोडा, ३ यशाच आहे धनज्यांचें अशा लक्षजनांनीं उत्तम प्रकारें स्तुत केलेला असा. (रथाचें विशेषण.) ४ तत्-रथ-अर्जुनाच्या रथामागें (त्याच्या रथाचा वेग बाणापेक्षांही अधिक होता म्हणून तो बाणाच्यापुढें जाई असा भाव.) ५ व्यूहाचें, ६ हटकितांही.

सुरवें[1] साध्य यक्षराज[2]- त्यक्त निधि जसा तसाचि तो गमला ८५
मी जातों धर्मावरि तूं जा त्या पांडवास[3] वाराया
होय सु दुःसह जीवित[4]- निस्पृह-जन-कांड वासवा[5] राया[6] ८६
नृप म्हणे इच्छावा बाळें घ्याया सुधांशु[7] उडुनि करें
तैसें हे गुरुजि कसा जिंकावा चंडभानु[8] उडुनिकरें[9] ८७
हें न घडेल न म्हणवे धरिता झाला धरेसि दर्भ कसा
रक्षावें यश आपण हा शिष्य करिल गुरूक्ति[10] अर्भकसा
द्रोण म्हणे कुरुराजा पार्थ दुराधर्ष[11] सत्य परि त्यातें
तूं रोधिशील माझ्या सामर्थ्यें सैंधवांत[12] करित्यातें ८९
होशील त्या प्रवाहा पर्वत तूं मी नव्हे अलीक[13] वचा
तुज लेववितों तें ज्या दृढता वज्राहुनी भली कवचा ९०
घे कवच अ-भेद्य सुरा ऽसुर-नर- सर्वाऽस्त्र-शस्त्र-वृष्टीनें
श्रीशुक वैराग्य जसें रंभादि स्त्रीप्रकांड-दृष्टीनें[14] ९१
श्रीगुरुनें लेवविलें नव कनक-कवच जपोनि मंत्रास
जें अरिचा हारि[15] सस्पद- रज मूर्तिंचा[16] जेवि सर्व संत्रास ९२
द्रोण म्हणे वृत्रासुर या-सामर्थ्येंचि जिष्णुनें[17] मथिला
सोक्षाद्रुद्रेंचि[18] कवच- धारण-मंत्र-प्रयोग हा कथिला ९३

---

१ सुरवानें साध्य-(सहजीं मिळण्यासारखा.) २ कुबेरानें टाकलेला. ३ अर्जुनास, ४ जीविताविषयीं निस्पृह जो जन त्याचा शर (जीवावर उदार झालेल्याचा बाण असा भाव.) ५ इंद्रास, ६ दुर्योधना, ७ चंद्र, ८ सूर्य, ९ नक्षत्रसमूहें, १० गुरु. उक्त- वडिलांचें भाषण, ११ दुर-आधर्ष- निवारण्यास अशक्य, १२ जयद्रथाचा अंत; १३ मिथ्यावादी (सकारांत शब्द) १४ रंभादिक रूनउत्तम स्त्रियांच्या नजरेनें, १५ हरणकरी, १६ मृत्यूचा, १७ इंद्रानें, १८ साक्षात्- रुद्रेंचि.

हरिपासुनि जोडुनि दे हें विद्या सु-धन अंगिरा जीवो
तो अग्निवेश्य-गुरुला ह्रद जीवन जेविं संगिराजीवा २४
लेवविलें तुज म्यां हें कौतुक दाविल अभेद्य कवच रणीं
ऐसें ऐकुनि गुरुच्या घाली निघतां नृपाल केव चरणीं २५
जाय सुयोधन वारुनि पार्थातें सिंधुराज राखाया
स्पर्शे युधिष्ठिर-चमू व्यूहा जसि सिंधुरा जरा खाया २६

---

## अध्याय. १०

मारुति सात्यकि धृष्ट- द्युम्न तसे कुरु-बळासि तुडवीती
कुरु-पति-राष्ट्रासि जसे दुष्काळ व्याधि चोर बुडवीती १
द्रोण न थारे क्षण पर- कटकांत जसा न रुद्र थारावा
तच्चाप-रवा पांडव भीति जसे अहि गरुद्रथारावा २
द्रोण क्षत्रिय-हृदया बहु जेरी भीति रामें दे व्रधुनी
करि पूर्ण सेविल्यांचे रक्त-नदी जेविं काम देवे-धुनी ३
शत-संख्य नाचले त्या अद्भुत-समरोत्सवीं भट कबंध
वातें घनसा द्रोणें धर्माचा भेदिला कटकबंध ४
रक्त-नदींत बुडाले गज मग गेले न कोण वाहोन

---

१ बृहस्पतीचा बाप, २ बृहस्पतीला, ३ द्रोणाचे गुरुला, ४ डोह ; ५ संगरुत्यांच्या मुलास, ६ मिठी, ७ गजास, ८ दुर्दशा, ९ टिके (स्थिर न होय) १० गरुद्रथ-आरव-गरुडाच्या शब्दास, ११ परशुराम, १२ देव-नदी; भागीरथी, १३ व्यूहरचना ; + बृहस्पती.

गमला गोवर्धन-नग- वर्षि-घन-समूह शोण-वाहोन ५

द्रोण-रण विलोकुनि स्मर सिद्ध स्मरती तदा पिनाकि-रणा
म्हणती दापिल काला हा रविच्या काय दीपिना किरणा
गांठी धृष्टद्युम्न द्रोणाला राहु जेंवि रविला हो
सिकताऽब्धि नदेसा तो वाढे त्या बाहुजें विरविला हो ७
भिडवूनि हयांसीं हय घेउनि तेजस्वि चर्म करवाली
तो स्व रथा-वरुनि उडे जैसा समरोग्रकर्मकर वाली ८
द्रोणावरि झड घाली तो जेंवि श्येन आमिषा नेयां
कौरव म्हणती बहुधा काळचि हरणार या मिषानें यां ९
चढतां युगीं हयांच्या पृष्ठींहि क्षिप्र सर्व विभ्रम या
पाहुनि पर पृथ्वी-पति झाले परि पावला न विप्र भया १
खंडुनि असि चर्म रथहि मर्मीं सर्वत्र विंधुनि करानें
घेउनि खर शर जोडी चापीं तो शक्तिसिंधु निकरानें ११
प्राण हरावेचि म्हणुनि जों प्रखरतरोऽशुगासि गुरु सोडी
तों तात्काळ चतुर्दश- बाणांहीं त्यासि सात्यकी तोडी १२
सात्यकिला षड्विंशति शर हाणी द्रोण तो महा कोपी
तो माधव तितुकेचि प्रखर शर गुरुस्तनांऽतरीं रोपी १३
तों वीरांला राजा- धर्म म्हणे सैन्यपाल पळवा हो
सात्यकि-रण-प्रवाहीं पडला गुरु हा असाचि पळ वाहो १४

१ शोण-वाह-ऊन-रक्ताश्वजोद्रोणत्याहून कमी, २ शिवाच्या युद्धास, ३ दबाविना, ४ वाळुवा पर्यंत, ५ क्षत्रियें (धृष्टद्युम्नानें) ६ ढाल, ७ तरवार, ८ समर-उग्र-कर्म-कर-रणांगणीं उग्रकर्म करणारा असा, ९ नामविशेष, १० नेण्याकरितां, ११ द्रोणास, १२ बलसमुद्र असा जो द्रोण १३ मोठ्या कठीन बाणास, १४ बाणास, १५ सात्यकी, १६ सेनापति सात्यकी, १७ पलभर,

बळेंप पळविला तें गुरु दावी भृगुवीरसा समर सरणी
किति म्हणति देखिलाचि न यामागें या-रसांसम रस रणीं १५
शैनेय म्हणे सूता द्रोणावरि नीट वाह हांक रणीं
करित नसे विप्राची धृत-पर-धर्म-प्रवाह हा करणी १६
षट्कर्मींच असावें नित्य रत ब्राम्हणें अ-घात-रतें
क्षत्रें स्व धर्म-युद्धाऽनुष्ठानें सर्वथा अघा तरतें १७
सात्यकिसीं द्रोणासीं होय महा युद्ध तेधवां कांपला
वाटे तद्बाण-निहत- कटक शव-भरें अहींद्र वांकविला १८
इषुनीं झांकुनि घेती ते करुनि छत्र केतु विध्वस्त
तो अ-प्रकाश त्यांचा आप्त-कुमुद-खेद हेतु विध्वस्त १९
सात्यकिनें कुरु-गुरु[11]ची कोदंडें खंडिलीं रणीं सोळा
त्या समर-चमत्कारें केले ब्रम्हाऽदि-सुर नभीं गोळा २०
शिष्यांच्या[12] शिष्यीला तो गुरु-वर बहु मनांत मानवला
कां नवलास नव्हे घट- कर्ण-गळीं[14] जरि बसेल कानवला[15] २१
गुरु-योजित सर्वाऽस्त्रें प्रत्यस्त्रें सात्यकि स्वयें शमवी
रमवी सत्सुर-दृष्टिसि वमवी मद अहित-दृष्टिसी भ्रमवी
करितां गुरु शर-पटलें दिन-कर-तेजोविनाश-तम खवळे[16]
सात्यकिकडे मनें विज- याऽर्थ विनवित्याविना शतमख[17] वळे
गुरु सात्यकि रक्षाया धरुनि सुधैर्याऽयुधा बहुतरा जे

---

१सेनापतिसात्यकी, २भार्गवरामसा, ३युद्धरीति, ४युद्धरूपरसासारखा, ५घोडे, ६पांड्
तास, ७अहि-इंद्र-शेष, ८भग्न, ९ अदर्शन, १० विधु-अस्त्र-चंद्रास्त, ११द्रोणाची,
१२अर्जुनाच्या, १३ सात्यकिला, १४ कुंभकर्णाच्या गळ्यांत, १५ पक्वान्नविशेष,
१६ वाटे, १७ इंद्र.

भिडले झाले शस्त्र- ज्वलनीं न करुनि विलंब हुत राजे २४
हरिनें जेविं नराचा अरुणें रथ पळविला न तपनाचा
मुनि म्हणति परस्पर हें पाहुनि झालेंचि सफळ तप नाचा
अरि एक क्रोश पुढें लक्षुनि ज्या ज्या शरा विजय सोडी
क्रोश पुढें गेल्यावरि मागें तो तो तदीय शिर तोडी २६
तो कीं सूत मिरविला निळ-भरहि जयापुढें न वेग मनें
रविचे उणे गुणें हय जिंकितिल कवण तयां नवे गमनें २७
विंदाऽनुविंद ताडिति पार्थासि जसे तसेचि गोविंदा
विरथ करुनि अनुविंदा मारी लोकैकवीर तो विंदा २८
ताडी भाली त्यातें कोपें अनुविंद तो गदा घातें
ज्याचें चरण-स्मरणचि नाशी बहु नरक-भोग-दाऽघातें
अनुविंद-बाहु-मस्तक खंडन केलें पळें सिताऽश्वानें
नर-कीर्ति नर बळें जरि हरिनिल हरिंची बळें सितां[१०] श्वानें[११]
श्वश्रू[१२]-करजेविं शिरें गेहीं जरि न म्हणती स्नना सीर
व्यूहीं तेविं कुरु-चमू धिक्कारुनि तो धरा-स्नानोसीर[१३] ३१
श्रमला जयद्रथाच्या जायासि न शक्त हो निकट कांहीं
हें योजुनि वेढियला पार्थ करायासि हानि कटकांहीं ३२
त्या समयीं पार्थ म्हणे देवा संश्रित-शरणोऽकरा वाजी
श्रमले कीं श्रम-शमना घडि भरि तरि रथ उभा करावा जी

१ दग्ध, २ सूर्याच्या, ३ शत्रूंचें, ४ लोक-एक-वीर-वीरश्रेष्ठ अर्जुन, ५ कृपाळी, ६ कृष्णानें, ७ नरकभोगदेणाऱ्यापातकानें, ८ अर्जुनानें, ९ अर्जुनाचीकीर्ती, १० स्त्री, ११ कुतरीं, १२ सासूचाहात, १३ पृथ्वींद्र, अर्जुन, १४ अर्जुन, १५ संश्रितांच्या कल्याणाची खाणजो तूं,॥ .(संबोधनार्थी) + सिंहांची.

कृष्णा म्हणे माझ्याही हेंचि मनीं लोळवीन हे वाजी
लोळिव तूंहि कुरु-चमू बा करितें तुजसवेंहि हेवा जी ३४
उतरे रथावरुनि नर पळवी कुरु-कटक कृत-पराभव तें
करि निर्मनुष्य मंडळ तो एक क्रोश आपणा-भवतें ३५.
स्वस्थ-स्यांतें क्रीडे कुरु-बळ-पंकज-वनांत पार्थ-करी
मंत्र-बळें स्फ-सरोवर निर्मुनि शर-गृह अनातपाऽर्थ करी ३६
शर जेविं किरण भवते जें कौरव-कटक तोचि परिवेष
रविच्च कवि-मतें अर्जुन तेजें स्फुर्योहि भिन्न परि वेष ३७
निःशंक कुरु-बळीं नर जेविं हरि-शताऽवृतींहि शरभ वनीं
पर्वी शिवाऽलयींसा शिरला देवर्षि[11] शीघ्र शर-भवनीं ३८
प्रभुनें मुक्त करुनि हय चुचकारुनियां हळूच कौशल्यें
निज[12]-बोधें श्रितें-हृद्गत[13] दुःखेंसीं सकळ काढिलीं शल्यें ३९
अश्व पर-शरांहीं भव तापांहीं जेविं दास पोळविले
ते देवें भक्ति-रसें जायों स्व-चरण-रजांत लोळविले ४०
देवर्षि भुरवीं घालुनि बोट म्हणे हें[14] सुयोधना कुटिला
भक्ति-बळेंचि पहा हा परमेश्वर आजि अर्जुनें लुटिला ४१
ज्याचें पद-नख दासां जें सुख दे तापल्या न तें विधु तो
भगवान् स्वयें अहा या विजय-हयां सत्पदास तेंवि धुतो
आम्ही दत्त[15]तसे गुण गुरु लघु हो वर्जुना नरा बावा

१स्पर्धा, २ पराभूत केलेलें (कौरवसैन्य) ३ स्वस्थमनानें, ४ कौरवसैन्यरूपकमलवनामध्यें, ५अर्जुनरूपहस्ती ६ अन-आतप-अर्थ-छायार्थ, ७ परिधि, ८ निराळा, वेगळा, ९ पर्वकाळांत, १० नारद, ११ शरगृहीं, १२ आत्मबोधें, १३ आश्रितांच्या हृदयांतलीं, १४ उद्गार, १५ दत्तात्रेयासारखे.

तूं धन्य यौंध नातरि यापरि हा अर्जुना न राबावा ४३

ज्याच्या श्री पद-दास्यें पावे तोरवा सदा रमा जाया
हरितो मना नराचा होउनि तो खासदार मोजा या ४४

पुरुषाऽर्थद ते केले दास-हय-हितोदया-कर खरारे
झालासि दास-दास प्रभुही तूं बा दयाकर खरा रे ४५

खुरवद स्पर्श श्रीच्या बहुधा न हयसम स्तनाचा या
हें यश गाउनि शिवसा लागेल सुधी समस्त नाचाया ४६

प्रेमें माता बाळा न्हाणी कीं भक्त त्र्यंबुच्या लिंगा
तैसाचि नर-हयां हरि कवि हो याचेचि पाय आलिंगा ४७

औषध स्रु-चणक कर्थी पीत-पट पसाहि तो बरा माप
श्रित-साहित्य कराया न बरा मंदोर तो बरा मा-प ४८

हरि हरित-तृणीं चारी तो प्रभु ज्याचा प्रताप दुर्वार
हरि हरि तई कारिति पद देउनि गणपति-शिरांहि दुर्वार ४९

तोक-तृषा शमना कीं क्षाळाया तात तोक-मल पाणी
प्यायाचेंही वेची करि न पिउनि तोवि तो कमल-पाणी ५०

उच्चैःश्रवा म्हणावा पार्थाच्या का न नीच तुरगानीं
त्या पूजी तो ज्याचें यश नंदन-काननीं चतुर-गानीं ५१

योजुनि तुरग-वर रथीं आपण कुरु-बल पहात देव रिघे
मग विजयातें मर्दुनि रडवाया खलप हात दे वरि घे ५२

---

१ खपावा, २ संतोषानें, ३ माझ्या, ४ श्रीकृष्णास, ५ चांगले हरभरे, ६ कल्पतरु, ७ लक्ष्मीपती, ८ हिरव्यागवतांत, ९ दुर्धर्ष, १० रुदन, ११ बाप, १२ उदक, १३ इंद्राचाघोडा, १४ कृष्ण, १५ चतुरांच्यागाण्यांत, १६ खलपति, + ८ अपत्याचीताहान, ॥ यो ध्दा.

चालवितां प्रभुनें तो गरुडें स्तविला तसाचि रथ वातें.
फाटे पर-बल वाटे तसाचि कनक-कशिपु[1]-वक्ष अथवा तें ५३
वेदांसि नास्तिक तसे गेले पार्थासि भीरु[2] सोडुनी
मोडुनि धर्म-सन्नय-[3] मर्यादा प्राज्य[4] पाप जोडुनी ५४
नद सिंधुपासुनि नरा- पासुनि पर परतले न माघारे
क्रूर म्हणति भला क्रीडा करिसी श्रिव[5]-शशांत बाघा रे
कुरु-कटक-राहु-वदना- आंतुनि ते कृष्ण[6] रवि शशी सुटले
कीं ते मकर-व्यूहचि जाळ[7] सु-भट-तंतु तटतटां तुटले ५६
कृष्ण जयद्रथ पाहुनि होति सुखी जेविं यज्ञ-वाट[8] सुर
मरु-धन्व-देश-मार्गी[9] जेसे प्राशुनि तोय वाटेकरु[10] ५७
गज गांठिला हरींनीं[11] तुडउनि गेला मदांऽध पुच्छानें
तुच्छातें बहु मानिति तृषित मधुप[12] जेविं कुटज-गुच्छा[13] तें ५८
श्वेताऽश्व म्हणे न शकुन झाले या आजि सा-रथां[14] बरवे
प्रभुजी म्हणा सुदृष्टी[*] तरिहि पहा आजि-सार[15] थांब रवे ५९
म्यां वाहिला प्रभु-पदीं तो जिंकिल आजि सा रथां बेल
जरि भानु[+] बहु-द्रष्टा[**] देखाया आजि-सार[15] थांबेल ६०
देशिल जयद्रथा तूं मरुनि अयश आजि सा रथा नीचा
देवींच्या[16] पदराला टाकिल हा आजि-सार[15] थानींच्या[17] ६१
विजय असा हर्षे तों दुर्योधन होय आडवा राया

१ हिरण्यकशिपूचें हृदय, २ भित्रे, ३ धर्म आणि सुनीतीचीमर्यादा, ४ बहु, ५ ...रूप सशांत, ६ कृष्णार्जुन, ७ जाळें, ८ यज्ञमंडप, ९ मारवाडदेशाचेमार्गांत, १० पांथ, ११ सिंहांनीं, १२ भ्रमर, १३ कुडयाच्याफुलांच्याघोसास, १४ सहारथ्यांस, १५ युद्धसामर्थ्य, १६ देवांऽगनाच्या, १७ स्तनावरच्या, + हे सूर्या, ** सर्वपहाणारा, * सुनयन.

विघ्नहरा विघ्न जसा किंवा उदधीस ओढ वाराया ६२
कृष्ण म्हणे कौंतेया श्रीमद्रुद्रापुढें जसा मार
आला पुरुष-व्याघ्रा दुर्योधन मूढ हा ससा मार ६३
तुज हा वराक बाहे तरि हरि मरणाऽर्थ कां न बाहु रुरु
घालुनि गांठि अधर्महि धर्माची करिल कां न बा हुरुरु ६४
मरणार्थ बाहतो हा तुज नर-सिंहास मस्त बकुरा गा
करितील मरोळाचें काय धरुनिही समस्त बक रागा ६५
झाला धनंजयाला मान्य अभिप्राय हाटक-पटाचा
त्या वाटे सोडावा खल रुरु-नृपा जेविं होट कपटाचा ६६
कुरु-पति-रथाऽभिमुख रथ चालवितां नीट लोक-नाथानें
कटकें न रोधिति जसीं रंभेचीं ऊरु-विलोकना थानें ६७
पार्थावरि नृप उठतां कुरु-सेना वि-त्रपा वदे हा हा
होमी पतंग दीपीं नुमजुनि तेज-प्रभाव देहा हा ६८
भूप म्हणे कां भ्याला भट हो माझा प्रताप हाल पहा.
पर-जीवन निःशेष शोशील प्रलय-भास्वदाऽतप हा ६९
जाणा म्यां कृष्ण सख्या पार्थासह आजि हरुनि मद वधिला
पावेल भुज-बळें नर न जलधिच्या तीविं तरुनि मदवधिला
पार्थाहि म्हणे जरि तूं वीर्यें झालासि पांडुच्या पाहूं
शस्त्राऽस्त्र-बळ तुझें दे यश शारद-चंद्र-पांडु चापा हूं ७१

१ विनायकास, २ कूप, ३ श्रीमत्-रुद्र-श्रीमत्शंकर, ४ मदन, ५ पुरुषश्रेष्ठा, ६ नीच, ७ बलावी, ८ रोही-हरिण, ९ हंसाचें, १० पक्षिविशेषबगळे, ११ सुवर्णासारिखा पीतपट, ज्याचा अशा कृष्णाचा, १२ बाजार, १३ कांतिहीन, १४ प्रलयकालचे सूर्याचें ऊन, १५ मन अवधि-माझ्यापाराला, १६ शारत्कालीनचंद्रासारिखें, + हुरहेवडी, हुर्यो हुर्यो·

हाणी तीन शर नरा चार हयां नवघनप्रभास[1] दहा
तोडी मनोरथहि म्हणे तें पाहुनि जिष्णुचा सभासद हा ७२
पार्थे शर पाठविले भेदाया मर्म वातसे चवदा
कृपण गृहीं अतिथि जसे नृप देहीं तेविं था नसेच वदा ७३
तितुकेचि पुन्हा झाले विफल जसे दुर्जनीं सदुपदेश
तेव्हां सख्या तुझें बळ कोठें गेलें म्हणे यदुपदेश ७४
पार्थ म्हणे कवच दिलें गुरुनें वात्सल्य दर्शविलें याला
भेदील न शस्त्रास्त्रें शक्रादि समस्त देव विलयाला ७५
परि मी तुझ्या प्रसादें एसांहि अभेद्य कवच खंडीन
दंडीन अरिशिर माझी शक्ति तशी कापर्दीच थंडी न ७६
ऐसें वदोनि मंत्रुनि शर कवचविदारणार्थ जों सोडी
सर्वास्त्रघातकास्त्रें अश्वत्थामा तयासि तों तोडी ७७
विस्मित होउनि पार्थ प्रभुसि म्हणे गुरुसुत प्रभाव मला
दिसत अहितांहि जेविं तमीं वाटेत फणी मणि-प्रभा चमला ७८
योजीन जरि पुन्हा तरि मजवरिच फिरेल अस्त्र बापा हें
साहें क्षण जिंकितसे लीलेनें अरिस दास हा पाहें ७९
वश कोरिल रसिकसा शिर बहु तुंकुनीहि काय गा शठ कविला
काय इतर नरसा हर हाणुनि हृदयीं स्मरें शर ठकविला ८०
हय सूत पार्ष्णि सारथि मारुनि खंडुनि समस्त हातेरें

१ नवीन मेघासारिखी कांती ज्याची अशा कृष्णाला, २ कृष्ण, ३ कृपाळूपणा, ४ नाशाला, ५ अश्वत्थाम्याचें सामर्थ्य, ६ डोलवून, ७ सरडा, ८ मदनानें.

फोडुनि कवच पळें करि पार्थ खळाचें पळांत मोनेरें ८१
श्येनारी धृष्टपणें गांठि बळें घालितां जसा चटक
व्यसनीं पडे सुयोधन तें पाहुनि सर्व धांवलें कटक ८२
पार्थाचा रथ झांकुनि नाना शस्त्रांचिया समूहानीं
चुकविति रुयोधनाच्या प्राणाची सर्व कुरुचमू हानी ८३
त्याकाळीं जगदीशें पर-धृति-हर पांचजन्य वाजविला
तन्नादें गजवरमद- नाशक केसरि-निनाद लाजविला ८४
प्रभु-शंख-रवें कौरव जेविं गरुड-गर्जनें महासर्प
केले भग्न नुरविला गांडीवें तिळहि पर-बळीं दर्प ८५
कुरु बळ-विमुक्त नररथ जंगम जन मुक्त माध्वसा साजे.
गर्जति जयद्रथाच्या हरणारे मृत्यु-साध्वसा सो जे ८६
कृष्णांही निज दर वर वाजउनि बहु स्वशत्रु कोपविले
कर्ण कृपाऽश्वत्थाम- प्रभृतींचे सिंहनाद लोपविले ८७
बहु तां कर्णाऽदि महा- वीरांसी एक विजय युद्ध करी
बहुतहि करितिल काय क्रुद्धा कंठीरवारि रुद्ध करी ८८
भूरिश्रवा प्रभूच्या खंडी करगत नव प्रतोदास
तेणें काळहि कांपवि केवळ न सुमेरुवप्र नो दास ८९

---

१ दुर्दशा, २ दांडगेपणानें, ३ चिमणा, ४ शत्रूचें धैर्य हरणाराअसा, ५ नामविशेष (शंख) ६ सिंहाचाशब्द, ७ मध्वमतानुसारी ब्राम्हणसा, ८ मृत्युभयास, ९ साहा १० उभयकृष्णानीं, ११ सिंहास, १२ गज, १३ चाबुकास, १४ मेरुचापाया

## अध्याय ११

येरीकडे वृकोदर सात्यकि पांचाळ मत्स्य हे भारी
भांडति कुरुवीरांसीं जेविं महेभासवें महेभारी १
खंडी युधिष्ठिराच्या आधीं खरतर शरव्रजें धनुला
हनुला धरुनि विनविला वात्सल्यें म्हणुनि हळुचि मग तनुला
करुनि प्रसाद गुरुनें दिधली ती गुरुसि दारवी शक्ती
भक्तिमदुत्तम धर्म प्रेषी द्रोणाकडे महाशक्ती ३
द्रोणासि स्वस्ति असो ऐसीं तें सर्व बोलिलीं भूतें
शक्ति महाकृत्यासी चळचळ तत्काळ कांपवी भूतें ४
शक्ति ब्रम्हज्ञानें ब्रम्हज्ञातें जसीच काळाची
तेविं द्रोणें हरिली ब्रम्हाऽस्त्रें ती मनुष्यपाळाची ५
भस्म करुनि शक्तीतें ब्रम्हाऽस्त्र क्षुब्ध होय तच्छमना
ब्रम्हाऽस्त्रानेंचि करी गुरुवत्सल धर्मराज अच्छमना ६
शर-पंचकें विदारुनि कायें क्रूर क्षुरेंम सोडुनी
गुरुचें धनु मनुजेंद्र क्षितिवरि पाडी पळांत तोडुनी ७
सोडी द्रोण गदेतें तीवरि धर्महि महा-गदेतें हो
सच्चरित सवंग कुतुक दे नंदन बहु महाग देतें हो ८

---

१ महा-इभ-मोठ्यागजाशीं, २ महा-इभ-अरि सिंह, ३ हनुवटीला, ४ सामर्थ्य, ५ भक्तिमंतांमध्येंश्रेष्ठ, ६ पृथ्वीतें, ७ महाशक्ति, ८ धर्मराजाची, ९ संतप्त, १० तत्-शमन त्या ब्रम्हास्त्राचे शांतीस, ११ शुद्ध अंतःकरण ज्याचें असा १२ देह, १३ शर, १४ मनुज-इंद्र, धर्म, १५ साधूंचें चरित्र, कौतुक सवंग (स्वल्पकीमतीनें देतें आणि नंदनवन म्हणजे (इंद्रवन) महाग देतें)

पडल्या भंगुनि पावुनि सहीर मुखें स्रुवर्णन गदा त्या
गुरु शिष्य रणा वर्णिति कवि जेविं अधन स्रुवर्ण-नग[१]-दात्या
च्याऱ्ही वाजी वधुनि. च्छेदुनि धनु केतु भूमिवरि पाडी
भारद्वाज महात्मा धर्मासि शर त्रयें उरीं ताडी १०
विरथ व्याऽयुध होउनि सहदेव-रथीं चढे पळे धर्म
कर्म असें घडतां त्या कविचा न स्वल्पही मळे धर्म ११
भूप पळाल्यावरि बहु नाश रणीं प्राप्त होय राजास
वध्यचि अहिंसा अभिमुख येतां गुरु बंधु सोयरा ज्यास
धृष्टद्युम्न घटोत्कच सात्यकि भीमाऽदि वीर धर्माचे
मथिती कुरु-कटकातें जैसे दुःसह विपाक कर्माचे १३
दूरुनि पांचजन्य- ध्वनि परिसुनि बहुत भय धरी धर्म
सात्यकिसि म्हणे बापा धांव करा हो धनंजया वर्म १४
व्यसनीं सहाय होउनि आमाला होय जो परास्रु क्षेमी
शक्राऽदि लोकपालां- मध्यें बहुमान्य तो बरा स्रुकृती[११] १५
समयीं सहाय होता पुरुष श्री विष्णुसींच तोलावा
प्रियसख माधव[१२] दोघे असतां न कुडो नटासि तो लावा
धांवा शीघ्र असोंद्या स्नेह रसाचा मनांत ओलावा
माधवजी आजि तुम्हा मित्र थई[१३]ल म्हणोनि ओ लावा
आहेत भीम धृष्ट- द्युम्नाऽदिक मज समीप भय नाहीं
बा त्वद्भुजाऽश्रितें म्यां विदूर[१४] पाहों नयेचि नयनांहीं १८

१ स्रुवर्णाचा पर्वत देणाऱ्यास, २ द्रोण, ३ रथहीन, ४ आयुधहीन, ५ क्षात्रधर्म, ६ ज्यास, ७ प- रिणाम, ८ कवच, ९ भृत, १० कुशल, ११ धन्य, १२ कृष्ण सात्यकी, १३ अर्जुन, १४ अनिष्ट.

सात्यकि बोले प्रभुजी चित्तीं चिंता करूं नका कांहीं
हंस[1]-ध्वंस कधीं तरि केला संगर करून काकांहीं १९
गुरु करचि शिरोरक्षक भारावह काय ओरवटा टोप
गुरु वर सहाय असतां व्हावा काशास हा स्वटाटोप २०
असतां सहाय साक्षात् प्रभु काय धनंजयास मी राजा
कृष्णा नरा क्रिया त्या स्मरा न धनंजया[6] समीरा ज्यां २१
मी जातांचि करिल कीं तुझिया तो द्रोण विप्र हरणातें
बा सांपडतां सोडिल सप्रहरण कोण विप्रहरणातें २२
सांगावें धन-पतिनें निधिचें रक्षण जसेंचि यक्षातें
कथिलें तैसेंचि तुझें विजयें मज आजि आजि-दक्षातें २३
गुरु तूंहि अर्जुनहि म्यां आज्ञा तुमची कधीं न मोडावी
सोडावी प्राणाची प्रभुचीच प्रीति पूर्ण जोडावी २४
वदुनि असें मान्य करी धर्म-वचन सबहु-मान सत्वर तें
गुरु-कार्यासचि कविचें निज कार्या न बहु मानस त्वरतें[11] २५
तो वीर वीरपान द्विज-पूजन करुनि सत्व-राशि कवी
शीघ्र निघे ज्याला बहु गुरु-भक्ति समर-रस त्वरा शिकवी २६
व्यूहीं सहसा सात्यकि शिरला जैसा दवाऽग्नि शुष्क वनीं
खंडन करी प्रतिपदीं कटकीं दोषज्ञ जेविं दुष्कवनीं[13] २७
सुर म्हणति अहा शिरला हा या जलधींत काय हो मकर[14]
बा दुसरा जिष्णुचि तूं हूं धर्मां[15]शांतिकाय होम कर २९

---

१ हंसाचा भंग, २ युद्ध, ३ कावळ्यांनीं, ४ वाईट, व्यर्थ, ५ अग्नीस, ६ वाऱ्यास, ७ सत्शस्त्र, ८ विश्रस्थातें, ९ कुबेरानें, १० रणदक्षातें (मज) ११ त्वरा करते, १२ सुरापान, १३ दुष्टकाव्यांत (वाईट कवनांत) १४ नक्र, ग्राह, १५ धर्मशास्त्रं चे देह

व्यूहीं शिरे महाबल करि-हरिण-कुलीं[2] जसाचि हरि[1] शिर तो
कमल जसा लीलेनें द्विरद अरीचें तसाचि हरि शिर तो ३
द्रोण तयाला गांठी रोधी जैसा महाऽचल[3] नदास
गुरुसा समर-प्रेक्षक पक्ष्मीं[4] नुरवीच तो चलन दास ३
सात्यकिला द्रोण म्हणे त्वद्गुरु शक्राऽश्व[5] हात जोडुनी
करुनि प्रदक्षिणा मज गेला केल्या पणासि सोडुनी ३
म्हणशिल यशोर्थ वेच्चिन सर्वस्वा मी सदास मरशील
तरि तूं पावोनि मला सगुरु स्वामी सदा समर-शील ३
सात्यकि म्हणे गुरुगुरो स्वस्ति असो तुज सदैव आर्यास
कालक्षेप[6] नसावा विजय-परामर्श-धर्म-कार्यास ३
ज्या वाटेनें गेले गुरु धरिती छात्र त्याचि वाटेतें
आचार्ये पार्थें जें केलें मजहि प्रशस्त वाटे तें ३
एवं वदोनि वंदुनि घालुनि कुरुगुरु रणांऽगणीं उजवा
सात्यकि निघे म्हणे गुरु- भट हो हूं शंख करुनि मुख रुज
कर्णाचें बळ भंगुनि कृतवर्म्यातेंहि संगरीं उडवी
नलिन-वनासि गज जसा त्या कुरुकटकासि तो तसा तुडवी
मागुनि उठले पांडव सात्यकिच्या रक्षणाऽर्थ जे त्यांतें
भग्न करी कृतवर्मा ध्यावें ज्यां पविकरेंहि[7] जेत्यांतें[8]
मुरडे सात्यकि सर्पचि जाणों बल-पुच्छ तुडविलें मागें
जलजातें विरथ करी मर्दी तत्काल तच्चमू रागें

---

१ सिंह, २ हरणकरी, ३ मोठापर्वत, ४ डोळ्यांचेपापणींत, ५ शक्रआहेतअश्वज्या असाअर्जुन, ६ काल विलंब, ७ इंद्रानेंहि, ८ जिंकणारांस.

पुनरपि परते मार्गीं माधव हरिसा[1] शिरे गजौघींकीं
अजितचि तो वरिला नर- नारायण-पादुका-रजानीं कीं ३९
मथुनि गज घटा[2] मारी शक्र-प्रतिम-प्रभाहि जलसंधा
कीं सर्वदाहि सत्या सत्संधा[3] निष्फळाचि खलसंधा[4] ४०
गांठी गुरु सात्यकिला तों दुःशासन सुयोधनहि राया
जेंसे वनांत सधना बहु तस्कर वेढिती धन हिरोया[5] ४१
युयुधानें[6] दुर्योधन करुनि विरथ पळविला पळांत रणीं
शोषी बळा शरांनीं जेंवि करांनीं[7] नदीजळां तरणी[8] ४२
हांसति धृतराष्ट्र सुता शीघ्र-पलायन-परा सुर विमानीं
हा मंदा तेजस्वी स्वाऽधिक होतां परासु रवि मानी ४३
गुरु-सात्यकि-मुक्ताऽशुग- पटल[9] न दे लेश मार्ग वातातें
त्यां विंधुनि मिळविलें यश जें भीष्मा आणि भार्गवा[10] तातें ४४
समरीं सारथि मरतां द्रोणारि स्वैर[11] पळविती घोडे
मोडे सैन्य स्वामि- व्यसनीं स्थिर वीर राहते थोडे ४५
द्रोण व्यूह-द्वारीं राहे मग शीघ्र सात्यकि निघाला
घन-पटलांत पवनसा पर-कटकीं तो सुदुर्धर रिघाला[12] ४६
काय इतर गज देता जंभाऽरातीभ[13] वाट वीरा या
त्या सुज्ञा सेना बहु- संभारा ती भवाटवी[14] राया ४७
सात्यकि जातां मथिलें द्रोणें पांचाल कटक बहु तरणीं

---

१ सिंहसा, २ गजसमुदायांत, ३ साधूचीप्रतिज्ञा, ४ खलाचीप्रतिज्ञा, ५ लुटाया, ६ सात्यकिनें, ७ किरणांनीं, ८ सूर्य, ९ द्रोणआणिसात्यकीयांनींसोडलेलेबाणाचेंआवरण, १० परशुरामास ११ स्वच्छंद, १२ शिरला, १३ जंभ-अराति-इभ-इंद्राचागज, १४ संसाररूपअटवी म्हणजे वन

धृष्टद्युम्नें केला तों नव्हता समय म्हणुनि न हुत रणीं ४८
चढला होता धावुनि ईर्ष्येवार नग्न करूनि तरवारी
परि गुरु विनिस्सित शर हाणुनियां त्यासि शीघ्रतर वारी ४९
तें पाहुनि कवि वदले झड घाली लांवकीं असि ससाणा
गुरु-शिक्षा उग्रत्वाचि देती उग्रा जशा असिस साणा ५०
अर्जुन-सात्यकि विना कुल धर्म असें वृकोदरासि वदे
आम्हां उत्साह तुझा दे अभय जसें सुरांसि वासव दे ५१
वधिले शिशुपाल जरा- संधात्मज वीर संगरीं बहुत
गुरुनें पुढें न झाला जो केला तोंचि रण मरवीं न हुत ५२
भीमा धनंजयाचा घ्याया क्षम तूं मरुत् समाचार
तत्कुशल-वृत्त मौक्तिक- सम तें मज सितगरुत्समा चार ५३
सात्यकि वळेंचि ज्यां कुरु- कटक महा संकटांत शिरकविला
गेला शरसम समर्थी वा द्यावें लागतेंचि शिर कविला ५४
कां पाठवितों कळतें जरि कविल व्यूह नद गंडप यातें
तूं सेतु तरेल इतर न कुरुबळा जेविं न दगड पयातें ५५
तों पांचजन्य ऐकुनि धर्म म्हणे हा अभाग्य बहुधा मी
कृष्णा पृथा सुभद्रा उत्पात विलोकितील बहु धामीं ५६
वा स्पष्ट पावलाचि क्रूरारिगणांत वत्स मरणातें
सख्य स्मरोनि करितो अभिमानी कृष्ण तत्सम रणातें ५७

---

१ द्रोण, २ धुरेवर, ३ वीतभर लांबीच्याअसे, ४ पक्षिविशेष, ५ खड्गास, ६ सहाणा, ७ वायु ; ८ हंसासारिखाजोमीत्या मला, ९ ज्ञात्याला, १० नाहींसा, ११ उदकानें, + अग्नीचा, अर्जुनाचा,

भीम म्हणे आहे प्रभु- वर सारथि अर्जुनासि भय नाहीं
तूं त्या कृत-प्रतिज्ञा- प्रति शीघ्र विलोकिसील नयनांहीं ५८
आज्ञा धरूनि शिरीं हा मी जातों सर्व शत्रु पळवीन
मळवीन सुयोधनयश शंखरवें कृष्णो कुशल कळवीन ५९
धर्मा देवाच गमे केली भीमें अशी प्रतिज्ञा तीं
द्विज म्हणति तुझे होउत अहित वश तुझ्या असी प्रति ज्ञातीं
पूजुनि नमुनि द्विज-गुरु- चरण निघे पिउनियां नव स्फुरतें
हा तो ईशचि न परा भी जो जन्मे स्रमानव-स्फुरतें ६१
बल जलधि गमे शिरतां जो भीमहि मत्त तो खरा मकर
वर्षे शर पर निकरीं जेविं सुहृद्धत्त-तोरव राम-कर ६२
तों भीमानें वारुनि गुरुनें नाराच हाणिला अलिकीं
तो अमृत-कनककलशीं भासे कृष्णाहि तीरजीं अलि कीं
द्रोणमनीं कीं वश हा मज गुरुतें जेविं हरि लगामातें
नमिल म्हणेन स्रखें जा खद्रुज परतेज हरिल गा मातें ६४
गुरु हांसूनि म्हणे या व्यूहीं भीमा तुला न शिरवेल
शिरसिल जरि तरि घालुनि वांचेल दवाऽनलांत शिर वेल
मज वंदुनि मदऽनुमतें शिरला व्यूहांत कृष्ण-सारथि रे
शरभापुढें टिकेना सिंहहि मग काय कृष्णारशार थिरे ६६
अक्षत जरि मी शिरणें तुज या व्यूहीं अशक्य मंद्रेचितीं
जाणे करावया जीं कर्में फलतींच एक मद्रचि तीं ६७

---

१ अर्जुनाप्रति, २ कृष्णार्जुनांचें कुशल, ३ स्रमानवाच्या वीर्यें. ४ पाहू, ५ संतोष, ६ ललाटी, ७ कमळीं, ८ किंवा. ९ अश्व, १० वळी, ११ अर्जुन, १२ मृग, १३ मन-रचित-ग्यांर चलेल्यांत.

रक्तेक्षण भीम म्हणे झालासि ब्रम्हबंधु चळलास
कळलास अधम कीं तूं खळसंग धनुष्य धरुनि पळलास ६८
योग्य नव्हे घ्याया तव अनुमत तो वासवि प्रवेशाला
कुतुकें राष्य प्रभुहि न बहु मानिति काय विप्र-वेशाला ६९
हें किति तुच्छ मदऽनुज स्वबळेंचि घसेल शक्र कटकांत
वचकेल काय शिरतां हंसाऽद्येऽनिरुद्ध गरुड चटकांत ७०
मी भीम त्वेदरि मध्यें त्वस्पूजक सदय तो धवळ वाजी
मज मद्गदा म्हणतसे तेजेंचि खळाऽरि योध वळवा जी ७१
आपण पुत्र पिता तूं म्हणतों द्रव परि न हें तुला लव दे
पद-पतित-रजा देऊनि पात्रत्व गुण स्वयें कुळाल वदे ७२
म्हणतों नित्य निज मना कीं या द्विजनायका पिता मान
परि तूं निर्दय इतर- प्रणताची काय कापिता मान ७३
तूं काय गा स्व धर्मचि सर्वांची पुरविणार आळ पिता
किति नाग-कालपाशा स्वाऽन्यायचि करकरुनि आळपिता
जरि आपणाशि मानुनि शत्रु असा पानलासि कलहातें
तरि या कर्माचें घे देतों मी भीमसेन फल हातें ७५
ऐसें बोलुनि सोडी तो द्रोणरथीं उडी गदा घाली
अनिवार्याचि खवळली जरि पाडाया कुडी गदा घाली
तों स्व रथावरुनि उडी टाकुनियां त्या गदेशि गुरु चुकवी

---

१ रक्त-ईक्षण-आरक्तनेत्र, २ ब्राम्हणाधम, ३ हंसादिकानीं रोधलेला नाहीं असा, ४ त्वत्-अरि-तुझा शत्रु, ५ मत-गदा-माझी गदा, ६ द्रोणा, ७ बांधणारा, ८ युद्धांत. ९ निवारण करण्यास शक्य न्हवे अशी, १० शरीर, ११ रोग व पापयांची पं

अभिमान त्यजुनि जसा कालगतिस आत्मयोगपटु सुकवी ७७
पडतां रथीं गदा तो वरूसा पळ वीर विप्र भारतेना
कौरव वेष्टुनि भीमा तो त्या फळवी रविप्रभा सेना ७८
भंगी भीमगदाऽशनि सतुरग सूत ध्वजा रथैनगा ती
रुद्रचि वृकोदर गमे त्या त्रिपुराचेंचि ते मथन गाती ७९
सुरवधूं त्वदऽपत्यें भीम शरां जेंवि हरि नरवां वकरीं
म्हणुनि तुज म्हणत होतों कीं रवल कुल-मंडपा न रवांब करीं
भीमें एकैक शरें दृढबाहु सुषेण दीर्घनेत्र असे
वधिले सुदर्शनाऽदि त्वत्सुत दश मृगवरें जसेचि ससे ८१
द्रोणें पुनरऽपि केलें दारुण शर-वर्ष धरुनि वाटे तें
वर्षे व्रजीं प्रलय-घन- वृंद तसें गुरु-धनुष्य वाटे तें ८२
भीम रथावरुनि उडी टाकुनि गुरु-यश करावया गोळा
धांवे यंत्रापासुनि वेगानें जेंवि उसळला गोळा ८३
शर वृष्टीतें वृकोदर लेशहि न धरुनि साध्वस रिघे तो
वाटे डोळे झांकुनि वृष त्या लीलें करुनि सोस घेतो ८४
द्रोण रथातें कवळुनि तो नित्य नवा युवा सवांहातें
दूर झुगारी म्हणवी शतवार सवायु-वासवा हातें ८५
गुरु मानिं म्हणे विलोकुनि हें गरुडाहि चित्रसा उगा राहा
ऐसेचि वत्सभुज हो दूर समस्ताऽरि-मद झुगारा हो ८६

---

१ भीमाचीगदारूप अशनि (वज्र) २ रथरूपपर्वतानें, ३ तोफेपासून, ४ भय, ५ बईल, ६ पावसाचीसर, ७ अश्वसहितानें, ८ वायुसह इंद्रानें, ९ हाशा ब्रातें, + अमिता.

स्वरथीं भीम बसविला  शीघ्र विशोकें जसा तपन अरुणें
तंव यानीं गुरुहि बसे  ज्या वृद्ध असें म्हणो नये तरुणें  ८७
द्रोण द्वारीं राहे  मागें सोडूनि पद विरोध सरे
मारुति म्हणे विशोका  हूं व्यूहीं शत्रुमद विरो धंस रे  ८८
भीम करी वीरांचें  वृक्षांचें मथन वातसा वांटे
निर्मावा जेविं वनीं  दहनें तो पथ नवा तसा वाटे  ८९
कल्पांतीं कदन जसें  रुद्र तसें तो गदीन भीम करी
तीहि गदा कुरुकटकीं  शिरतां जैसी नदीं न भी मकरी  ९०
पर-सेना लीलेनें  शिरतां तत्काल तो विदारी ती
राम-शरांची बहुधा  आली त्या युद्ध-कोविदा रीती  ९१
दूरुनि सात्यकि अर्जुन  पाहुनि दे भीम योध हांकेला
धर्माला कळवी कीं  आहेंत स्वस्ति शोध हा केला  ९२
तें परिसुनि कृष्ण-सखे  सात्यकि-सह गर्जले स्फुरवें फुगले
असनिल मयूर परम-  प्रिय-घननादोदयीं कसे उगले  ९३
भीम धनंजय माधव  सात्यकि हे वीर गर्जना चवघे
धर्म म्हणे शीतल हो  कर्ण-युगा या क्षुधोर्मिची चव घे  ९४
वत्सा जेविं निवविती  इंदु-कर चकोर-दृष्टिला गोरें
तेविं रुदन्नयना तव  भुज यांसि न पापदृष्टि लागो रे  ९५
या चिंता-तटिनीच्या  गिळिले बहु देव दैत्य नर डोहें

१ विशोकनामक सारथ्यानें, २ सूर्य, ३ रिघ, ४ गदी-इन-गदाधरांतश्रेष्ठ, ५ मगरी, ६ युद्धपंडिता, ७ उगेच, ८ दोन्ही कानास. ९ क्षुधा-ऊर्मि- अमृतलाटेची. १० गोरवर्ण, ११ रुदत्-नयन- आसांच्यानेत्रांस, + वाटेला.

श्रीगुरुनेंचि म्हणावें कीं त्वां स्वाऽश्रित कदापि न रडो हें ९६
श्रीकृष्ण कृष्ण सात्यकि कुशली आहेत धन्य मी आजी
आजि-क्रतूंत गिळिती रिपु काळासी करूनियां आजी ९७
बा तूं ज्यांचा द्वेष्टा कैसे जय पावतील ते जन गा
शक्रा-पुढें टिकावें ऐसें कैचें प्रचंड तेज नगा ९८
आजीसी बहु मान्या गांडीवलता पराऽयुध-ग्रामा
विजया जय देउ जसी कोदंड-लता पराऽयुधग्रामा ९९
रवि अस्तासि न जातां मारूनि जयद्रथासि धवल-हरी
उठविल काय स्मरवाच्या जेविं पयोधींत रात्रि-धव लहरी १००
सैंधव मेल्यावरि तरि कौरव-पति करिल काय सामातें
तो दुःख-प्रदहि प्रिय सर्वस्वा वरिल कायसा मातें १०१
अंध म्हणे हा भीमा- त्कर्ष मला संजया परिसवेना
गमला नसेल दुःसह मुनि-धिक्कृति-गज यापरिस वेना
कांपविला कीं व्यूह व्याघ्रानें जेविं कातरोऽक्ष समरा
रुत शेष राहिले जे त्यांचाही करिल घात शक्रसमरा १०३
चुकवावें हरिणाच्या कैसें क्षुब्धा हरीस कळपानें
वधिल मुलें तो तरूंचीं जेविं महाऽनिळ हरी सकळ पानें
कुरु-कटकीं भीम करी कर्म कसें काय तें कळीव मला
ज्याहि सूर्य न जिरे बा कर्कोटाऽहिविष कंळी वमला १०५

१ अर्जुन, २ रणयज्ञांत, ३ शत्रु, ४ गांडीवगुण, ५ शत्रूंच्याशस्त्रसमूहा, ६ पुरु-आयु-धक्-राम- शत्रूचें आयुजाळणाराजो राम त्याला. ७ उवेनाइव अर्जुन, ८ रात्रिपती (चंद्र) ९ ऐकवेना, १० धिक्काररूपदीग, ११ वेनगजाला, १२ भयानें चंचलनेत्र असा. १३ क्षोभपावलेल्या, + कली.

सूत म्हणे श्रवण करीं कथितों मी भीम-कर्ण-समरा ज्या
पाहुनि सुर मुनि वदले रण-पंडित भीम कर्ण सम राजा
केला तें रोमांऽचित भीमानें कर्णवासवें काय
गमले प्रळयीं भिडतो तो अर्णव अर्णवा-सवें काय १०७
नरहरिचें लाजविती जैसे बाळाऽर्क-वर्ण नख पविला
भीम-शर तसेचि निर्हीं केला परिभूत कर्ण न खपविला १०८
होउनि विरथ पळाला कर्ण तया घे रूपेण निज-यानीं
भीम-भुजांनीं केलें त्रस्त सकल सैन्य लब्ध-विजयानीं १०९
भीमाच्या सिंहरवें भ्याले बहु एकही न परे परते
जे शूर मदांऽध द्विप हगले बलधैर्यहीन परपर ते ११०
कळला कर्ण-पराभव झाला हें भीमसेन-सिंहरवें
धर्म म्हणे जोडावें वत्सा ऐसेंचि यश तुवां बरवें १११
कर्ण-पराभव-हर्षें वाजविले शंख बहु अनीकांहीं
त्या आनंदा मांया नाहीं अवकाश जन-मनीं कांहीं ११२
परिसुनि परदररव बहु वाजविती शंख तोंवकाहि मानी
तो प्रभुशंख नव चमू- पा जेविं प्रलय-पावक हिमानी ११३
गांडीव-पांचजन्य- ध्वनिही लीलेंकरूनि लोपविले
भीम-रवें मग योगी पळेंतरि नसतील काय कोपविले ११४

---

१ देह. २ वज्राला, ३ निजरथीं. ४ भयशील, ५ शत्रु, ६ मावया, ७ तुझ्याकडील, ८ घट्ट बर्फ, ९ पळभरतरि.

## अध्याय. १२

शिरतां अर्जुन सात्यकि  भीम व्यूहीं गज-व्रजीं हरिसे[1]
धांवत जाय गुरुकडे  दुर्योधन वसति षडरि[2] ज्यासरिसे १
द्रोणासि म्हणे गुरुजी  शिरले व्यूहीं कसे तिघे अरि ते
तुमच्या प्रताप-तपनें  केले तुच्छ प्रवाह कां न रिते २
गेले अर्जुन सात्यकि  भीम महाबळ जयद्रथाजवळ
साक्षात् कालाऽतक यम  जाणों त्यांचा करावया कवळ ३
तुज जिंकिलें तिहीं हें  अद्भुत लोकां न काय वाटावें
ग्रीष्में जेविं तडागें  तेविं समुद्रेंहि काय आटावें ४
हतभाग्य मीच बहुधा  आहे माझा विनाश या कलहें
कीं जें तुझें त्रिलोकां  लंघ्य तिघांनींच लंघिलें बल हें ५
आतां काय करावें  कैसी होईल सिंधु-राज-गती
झाली त्या पार्थ-भयां[10]  सिंह-भयां जेविं सिंधुरा[11] जगती ६
द्रोण म्हणे सर्वाऽधिक  भीताऽभय-दान सत्य जा वेंचें[12]
शिर शिरतिल पर यास्तव  म्यां व्यूह-द्वार न त्यजावेंच ७
वत्साहि त्याविषयीं  आहें मी निश्चय अनलस मगया
जा सैंधव रक्षाया  पर-दुःसह तूंहि अनलें[13]-सम गया ८
दिव्य-कुरुक्षेत्र-पट  ग्लह[14] सैंधव ढळति अक्ष हे बाण

१ सिंहसे, २ षट्-अरि-कामादि सहा शत्रु, ३ ज्याच्याबरोबर, ४ रिकामे. ५ जयद्रथाचा. ६ त्रास, ७ नळ्यानें, ८ युद्धानें. ९ जयद्रथाची गति. १० अर्जुनभय (सर्वत्र अर्जुन अर्थी) ११ गजाला, १२ खर्चें, १३ अग्नितुल्य. १४ पण द्रव्य.

या युद्ध-द्यूतींचे जय परिभव सत्य तें मृषा जाण ९
मी द्वारीं नसतां गज सरसींसी पर चमू दवळतील
शत्रु-करांतें सैनिक- पति दत्ताऽभय अमूद वळतील १०
जाणें युक्ति बळाचा जी स्तव कुरु-नायका पुरोवा ती
शिवतांचि पराभूति स्वच्छ यशा खाय कापुरा वाती ११
मानुनि शासेन गुरुचें व्यूहाबाहेरुनि क्षितिप तूर्ण
जाय कराया जीवन- काम-जयद्रथ-मनोरथा पूर्ण १२
तों वीर उत्तमौजा तद्बंधुहि देखिला युधामन्यु
तत्काल तिघां-करवीं धरवी युद्धाऽर्थ आयुधा मन्यु १३
होऊनि उत्तमौजा विरथ युधामन्युच्या रथीं चढला
रथ भंगितां तिहीं बहु कुरु-पति कोपें करूनियां कढला १४
भूप गदा पडतां कुनि सिंह गजावरि जसा तसा तूर्ण
धांवे दोघे भ्रातें वीर कराया रथा-सकट चूर्ण १५
आयु म्हणे त्यांसि मरण आलें हें टाकुनी उडी दवडा
वधिलाचि हा शूलीऽन्नीं वाटुनि केला जसा उडीद वडा १६
ते भू-पृष्ठीं पहिली मग घाली तद्रथीं उडी दरदो
तो झाला पीठ जसा सांपडला चर्वणीं उडीद रदों १७
परिभूतिनें तळमळे जेविं नरवीं विद्ध मानव स्फयानीं
भूप चढे शल्यरथीं तेही राजोत्तमा नवें-स्फयानीं १८

१पूर्वीच्या द्यूतांतले, २सरोवरासारिखी, ३पुर्ते, ४पराभव, ५आज्ञा, ६दुर्योधन, ७क्रोध ८उत्तमौजा व युधामन्यु यांही ९ज्या प्रकारें धारण करावयाची त्या प्रकारें धारण करून, १०आयुष्य, ११शूलारोपणीं ठिकाणास. १२भय देणारी, १३दांताळा, १४पराभवानें, १५टोंचलेला, १६नव्या रथीं.

पार्थाकडेचि गेले ते त्याचे चक्र-रक्षक रयानें[1]
राया मग दुर्योधन- राजाही युक्त होय वर-यानें[2] १९
पुनरपि गाठूनि करी भीमाला कर्ण कौरवा[3] रण गा
सर्वाऽसुर-राज बळी जेविं चतुर्दंत-गौर- वारणगा[4] २०
वृद्ध म्हणे भग्न करी भीम बळें करुनि संगरा ज्याला
त्यावरि जाया झाला कैसा[5] उत्साह अंग-राजाला २१
ज्याच्या भयें न लागे धर्माचें पळहि पातया पातें[6]
तो कर्ण भग्न झाला केला लघु नहुष-पात यापातें[7] २२
भीष्म-द्रोण-भयाऽधिक ज्याचें भय मानितो अजातारी[8]
त्या भीम-शक्ति भंगी हरि-भीत गजा न कां अजा तारी २३
जो उपजला स-कुंडल- कवच नव-चमत्कृतिमान प्रसवे
रस-वेत्ता दाता ज्या[9] ब्राम्हण-पद-पूजना-विना न सवे २४
देते पर-घूकांनें[+] स्फुट-हृदयाब्जांचे[10] प्रभाकर दरी जे
ते सर्वहि ज्या एकें केले हरुनि प्रभा करद[12] राजे २५
त्या वीर-वरा कर्णा सर्व-स्फविद्या-दया-कळाऽवासा
भीम करसा विक्रम-गति रोधक झाला हया कळोवासा[13] २६
पुत्रास सखा आश्रय सर्वस्व अपोह्य कर्ण तो कवच
यश बहु रुचे जयाचें जैसें अस्पष्ट-वर्ण तोक[*]-वच २७
तुरविल शेष परांच्या मथुनि सकल सित-हर्यां[14]-सकट कटकीं

१ वेगानें, २ उत्तमरथानें, ३ हे धृतराष्ट्रा, ४ इंद्राला, ५ कर्णाला, ६ डोळ्याचें पातें, ७ कर्णपतनानें, ८ धर्म, ९ संजय, १० स्फुटन- अब्ज- आमांच्या हृदयकमळांचे, ११ मी नीला, १२ करभार देणारे, १३ पायखुंटा, १४ अर्जुनासहित, + गरुडरूपघुबडांस, ** कर्णास, * बाळ.

ज्याच्या भवंविसयानें केली न धरुनि भयास कटकट कीं २८
त्या कर्णासीं कैमा पुनरपि तो भीमसेन समर करी
अत्यद्भुत हें प्रतिभट मर्त्य-करी एक एक अमर-करी २९
आधींच सदय कळलें बंधुत्व-कथी स्वयें पृथा ना तें
मग केलें युद्ध कसें न करावें साधुनें वृथा नातें ३०
दोघांत कोण विजयी झाला तें सांग आयकोंदे गा
कांहीं काल सुखें कीं दुःखें संसारि-काय कोंदे गा ३१
ऐकुन म्हणे भीम निघे बंधुकडे जावयासि वात-गती
त्याच्या दृष्टि-पुढें पर- शक्ति न हरिच्या जशा शिवा नगती ३२
धांवुनि कर्ण म्हणे रे दावुं नये पृष्ठ संगरींपरतें
परतें रणांत मरणा ऽवधि जरि रक्तांतील अंग रीपरतें ३३
तुजसीं युद्ध घडो हें स्वप्नींहि न चिंतिलें परानीं कीं
तो तूं भीमा मजला पृष्ठ कसें दाविसी पराङ्नीकीं ३४
सर्व स्वजीविताऽधिक यशाचि रूपवाऽस्पद न भाउ परते रे
रण-निज-धर्मापासुनि न मळाया वदनभा उपेरते रे ३५
शत्रूंसि पाठ दाविसि हें तुज कुंतीसुतासि अनुचित रे
क्षत्रिय लब्धजयाचि कीं खर-नर-परशर-विशीर्ण ननुचि नरे ३६
भीम प्राणहराया अपकारें ताप-सापसा परते
विनविनि गमे करुनि त्या आत्रेया तापसा पसा परते ३७

---

१. कन्हई, २. अति-अद्भुत-मोठें आश्चर्य, ३ देवांचा गज. (ऐरावत) ४ संजय, ५. वायु मार्गी वेगमन ज्याचें असा (भीम) ६ कोल्ह्या, ७ संगर-उपरत- समरपराङ्मुखानें, ८ बाण, ९. शत्रुसमुदायांत, १० पराङ्मुखन होत, ११ विकळ, १२ दुर्वासास.

* आधींच सदय कळवी- असाही पाठ आहे.

मृदुपूर्व युद्ध रविसुत भीम करी क्रोधपूर्व गा राजा
कांपविती इषु त्याच्या बहु थोडे त्या शुचींत गारा जा ३८
भीमातें आच्छादिति वृषशर जे पार्श्वपतिसम रयज्ञ
या दोघांचा बहु दे नारदनयनांसि रति समरयज्ञ ३९
कर्ण करी स्मित तेणें भीमाला बहुत राग ये रचितें
हास्यचि बहु ताप न विष मानधन न साहतात येरचि तें ४०
जरि होय भीम जैसा बहु पुष्पित पळस लालभडक वनीं
कठिणांहि रणीं न पडे त्यागुरुभक्तासि जेविं जड कवनीं ४१
तें भीमवपु विनाशर गत्यवपु जसें विनां शलल नाहीं
केला इषुनीं त्याचा न शकाचा जेविं नाश लज्जेनाहीं ४२
भीमें आठविला स्त्री- वस्त्रहरण हा निकोग भागी हो
कर्णहि मुख्यत्वें जो करणारा हानि कारभागी हो ४३
केला पुन्हा मथुनि धनु हय सारथि तो रणस्थ विरथ कर्ता
वाटे घनेंव समरीं कपि रोधुनि तोरणें स्थेविर थकर्ता ४४
अन्य-रथीं क्षिप्र चढे मोह प्रकट न करूनि आधिरथी
कीं होवून न विकल स्वेष्यामोहें धरूनि आधि रथी ४५
कर्णाचि धन्य न होता अन्य नरा मानव श्रम रणानें
देतें कां न स्तनशात- चित नितें उपमान वश्य मरणानें ४६
कर्ण पराभव म्हणवी येउनि कानास हाय हा निर्वेग

१ आषाढमासांत. २ कर्णाचे बाण, ३ गरुडतुल्य, ४ वेगजाणणारे, ५ प्रीति, ६ क्रोधानें, ७ अन्य. ८ शरावांचून, ९ साळूचें देह, १० कंटकावांचूनजसें, ११ स्त्रियांनी. १२ अपकार, १३ गेय नाद. १४ मारुती, १५ वहिहार. १६ कर्ण, १७ आपल्याभृत्योंनें, १८ मनोव्यथा, १९ स्तनशानानें प्याम, २० चाळणीसारखें, २१ म्हानात्याधूनगच्छास, + हद.

रोदन वृथा खरें परि साहेल कसी सहायहानि बरा ४७
मोहें वाहुनि हृदयीं चिंतेतें वृद्ध जेविं सांगे तें
पुनरपि तद्वृत्त पुसे परिसा संजय तयासि सांगे तें ४८
कर्ण पुन्हा क्रोधानें धांवे तें देखतां असें बहुत
वदले नावेक पावक- वदनीं झालाचि भीमसेन हुत ४९
हय वृषे हयांत मिसळी जे वर्णे स्पष्ट ओंसविल याला
देखुनि तव विजयाची पावे सारीच ओंस विलयाला ५०
अपकार तुम्हीं केले जे जे त्यांनें स्मरोनि तो खवळे
कर्णदवीं घनचि गमे घ्याया श्रितचातकांसि तोरव वळे ५१
एकें मुखें किति करूं अत्यद्भुत युद्धयज्ञवर्णन गा
यांत प्रवर्तला तो भेदाया मूर्तवज्र कर्णनगा ५२
तोडुनि धनु कर्णाची शक्तिहि भंगी जसीच मूढ कवी
कीं जेविं मथुनि मन मुनि विघ्नांची दारुणा चमू ठकवी ५३
भेदी भीम शरांनीं बहु शीघ्र परा शरासनादानीं
भिवविति वृषा न तें निशि- चर जेविं पराशरास नादानीं ५४
करिती ते वृषभ गज व्याघ्र हरि शरभ रुगरुरुसम रणा
ब्रम्हरस तसा न गणूं दे वीररसचि सुरां सुरस मरणा ५५
भीमें पुनरपि कार्मुक तोडुनि वधिले रू-शंख-धवल-हरी
नवल और करी प्रसवे बहुत नदानंद-सिंधु-नव लहरी ५६

---

१ शस्त्रविशेष (बर्ची.) २ वत्सक्षीप, ३ कर्ण, ४ आस्वलासारखे काळे, ५ आशा, ६ भीम. ७ कर्णरूपदवानळीं, ८ आनंद, ९ अति-अद्भुत, १० कर्णरूपपर्वतास, ११ कर्णास, १२ भीमशर, १३ भीमकर्ण, १४ रू-शंख-धवल-हरी - शंखासारिखेपांढरे घोडे, + मंत्रशास्त्रज्ञ, ※ राक्षस, ✻ कर्ण (नवलकरी म्हणजे आश्चर्यकरी.)

भ्याल्यासि म्हणे कुरुपति तूं वर्के पिटोनि दूर लाव कसा
दुर्जय धांवे व्हाया श्येनापासूनि चूर लावे कसा ५७
शरपातदेश सोडुनि सेना होती उगीच बाहेरी
जरि जाय एकला अरि-वरि दुर्जय तरि उगाच वाहे री ५८
लागे स्वर्ग-फलद शर भीम-क्षेत्रीं सुधीट पेराया
यश साधाया घालुनि अंजन नेत्रीं स्पर्धी टपे राया ५९
सातानीं मग आर्धी भीम उरीं ताडिला नवशरानीं
तारसाकेश उपडितां गज होय हरास कां न वश रानीं ६०
तो साश्वरथून दुर्जय वधिला तत्काल न करितां गलबा
जाणो भीम म्हणे घे स्वर्ग त्यागुनि कुसंग हा चल बा ६१
रडतचि दुर्जय कर्णें त्यासमरसरवांत घातला उजवा
भीतें म्हणे कुमार व्यर्थ नयन सजविना मुखें सजवा ६२
कर्णें गणिले न विशिख भीमाचे लागले कचाकच ते
नच तेजस्विज नसता पचते तदवयव खळखळा खचते ६३
स्थविर म्हणे हा कर्णा बळ बहु परि पांडवां पुढें न चले
अंगार सर्व-दुर्धर तदपि चकोरांसि ते मुखें पचले ६४
सूत म्हणे होय पुन्हा कर्ण कलह-रत चढोनि नवयानीं
आश्चर्याचि तें कीं रणें- सव दाखविला सुरांसि नवयानीं ६५
कर्णाचे हय चारी मारी खवळोनि तो गदाघातें

१ नीच, २ दुर्योधनभ्राता, ३ पक्षिविशेष, ४ पाहे, ५ दुर्जय, ६ सूर्यपुत्र, ७ गाळ ते. ८ धृतराष्ट्र, ९ निखार, १० रणयज्ञ, ११ नव्यानीं, + बाण, ++ चकोरपक्ष्यास (चकोराचें भक्ष्य निखारे आहेत असा भाव.)

भीमबळानें वारुं न शके तो जेविं भोगदा[2]घातें ६६
केतु छेदुनि सूतहि वधिला अत्युग्र तेज गया तें
वृष मंदोत्साह गमे आला पर भूमि न जरा यातें ६७
राहे कोदंडबळें तो दंड-बळें उभा जसा जोतें
तेजस्वी नख वांके स्वीकारिल केसरी[+] कसा तोतें ६८
भूप म्हणे रे दुर्मुख द्याया कर्णासि अभय वा धावें
आपण देखत असतां अरिचें स्वसखयासि अभय बाधावें
केला कीं कर्ण विरथ चापीं गुण आधिरथिं रथीं चढवी
तों शर जसा मनापें त्यों याजंळधीस तूंहि जा कढवी ७०
गेला वाराया जो दुर्मुख देखुनि समक्ष याला हो
पेर्षी शर भीम म्हणे सत्वर हाही यमक्षया लाहो ७१
वाराया गेला तो आपणांचि न लागताहि पळ वारे
जाणों शरां म्हणे धनु कार्य पुढें नीट होत वळवारें ७२
दुर्मुखरथ सांपडला विरथा कर्णासि आयता राया
देवत्यक्तासि शके न सखा न पिता न माय तारया ७३
राधेयाला नधैर होतां दुर्मुख परोक्ष रोदन हो
स्नेहगुण असाचि कसा सोहृद मज्जनपरा[12] सुरोद न हो ७४
तोंडें सकंब सदोदित संसारीं तोचि जो अनय[13] न करी
न निघे इतर जन बुडे व्यसनीं पंकीं जसा अनयन[14] करी[*] ७५

१ कर्ण, २ कर्मफळाचा भोग देणाऱ्याच्या घातें. ३ म्हातारा, ४ खोगीर, ५ रामशर, ६ असिद्धसागरास, ७ भीमास, ८ यमसदनास, ९ मरे, १० नाटोपे, ११ गतप्राण, १२ स्करासमुद्र, १३ अन्याय, १४ अंध, + सिंह. * गज.

करि साऽश्रु दुर्मुखाच्या तो कर्ण कवि प्रदक्षिणा देहा
समरीं भीम गमे श्रुति-गो-तर्णक विप्र दक्षिणा दे हो ७६
रडतां प्रहार केले द्रोणे ते सर्व उगविले निपट
निपट प्रखरशरांहीं वाटे चित्तांत पाहिले विपट ७७
सव्यभुजीं भीमाच्या कर्णे नागच अर्पिलें चवदा
चव दाखउनि वदान्यें स्वैरसें ते अनिष्टि नर्पिले च वदा ७८
भीम न चळला जरि हृत खळ खळखळ विपुल भुज वेग रुधिर
गमलें त्यजिना शिरतां रविसुतनागाच रक्तवमें रुधिर ७९
भेदी भीम निहींच क्रोधभरें त्या हयास गयोनी
जाणों म्हणती ते हय त्याडोहीं दुते तृषा मसी पानीं ८०
करितां नर्द्ध्यातें ते काम-क्रोध-लोभसे नाहीं
वृष निरखिला हरि-नख-क्षत-गजसा नष्ट-शोभ संनाहीं ८१
ते सत्य सर्प न विशिख कर्णाहि न नर्दाय-मर्दन-वारुळ तो
कीं माणिक्यसर जय-श्रीवरणीं शर गळां नवा रुळतो ८२
बहु रक्त दिसे खेळुनि होय जसा काय वा गुलालानें
पळतां कर्ण स्मरलें शिउनि पळे बाळ वागुलाल्या तें ८३
उच्चैःश्रवःस्वसेसी भी त्यागुनि न रमते जेवन राजी
प्रकटिति कशा प्रतोदा वांचूनचि परम ते जव नवा जी ८४
तृप्ति वरि सदुत्कर्षे विहित-जय-स्थान नारद नविच कीं

१ गोवत्स, २ विपर्यास, ३ रक्तें, ४ भोंके, ५ बाणानीं, ६ नयकर, ७ शोभा
रहित, ८ शोभतो, ९ चपल, + कर्ण, ÷ दान्यानें (कर्णानें), * त्यागर्पाचें गृहरूपवास्त्व, ' मोक्ष.

ब्रम्हरसहि म्हणतो हरि जन रुयशा स्वानना रद न विचकीं ८५
कर्ण पळे भीमभयें जैसा राक्षस पराशरें-भयानें
तें आपणा हरि करुनि दारवविले बा परा शरभ यानें ८६
भासे भीम भयंकर बहु जैसा देव अंधकाराती
जे भीत भंगवेला जीं कीं ते स्पष्ट अंध कोरा ती ८७
वृद्ध म्हणे बहु देतो दुर्योधन परममंद राग मला
सांगे नित्य स्वयशो- हर कर्ण असेल मंदरा गमला ८८
दिधलें देइलहि यशो- मृत परबळ जलधि मथुनि अनिबल हा
कलहा करितां मजसीं भंगचि पावेल सामरहि बलहा ८९
लज्जाहानि न झाली त्या मुग्धा मजहि मुग्धताता कीं
म्यां कल्पिली प्रबलता अल्पबळीं जेवि दुग्धता ताकीं ९०
जय भीमवधाविषयीं कर्ण रुयोधन करोत बकबक रे
कैसे करितील तिमि- ग्रास दहनमेषभंग बक बकरे ९१
सूत म्हणे धृतराष्ट्रा बा कारण तूंचि या विनाशाला
शून्या होत्या न तुझ्या सच्छलपर या नयाविना शाला ९२
कपट द्यूतादि कुमत गुरुस्रुमतसम प्रभावि लेकांचें
त्वां पक्कहि शांत नव व्यासविदुरवचन भाविलें कांचें ९३
झाले भीष्मद्रोण- व्यास-विदुर-सदुपदेश तुज कुंचले
कर्ण-शकुनि-दुःशासन- दुर्योधन-मंत्र अमृतसे रुचले ९४
उरलेंही घालिसि बा काळमुखीं स्वकुळ घातलें कांहीं

१रुद्र, २ बंदिशाळा, ३ कल्पवृक्षास, ४ देवसहवर्तमान, ५ इंद्र, ६ मूर्खपित्यास, ७अर्जुन, ८ प्रलाप, ९ तिमिनामक महामत्स्याचा ग्रास, १० साधु छल प्रधान, ११ काजरे, १२ मसलत, + दांत, ** पराशरऋषीच्या भीतीनें, + पराजयवेळा.

कां देसी दोष परा त्वां हा केला न घात लेंकांहीं ९५
स्वयशोरक्षणचि करिति बहु न तुझे अंगरक्षण नयेज्ञ
कीं तत्काळचि देतो सद्गतितें संगरक्षण न यज्ञ ९६
भंगे परि न समितितें कर्ण सतीनें जसा न विट लाजे
क्षणभरि म्हणोत याला ते जन म्हणतील राहु विटला जे ९७
कर्णपराभवकोपें भीमावरि धांवले तुझे सुत ते
दुर्धर दुर्दम दुःसह दुर्मर्षण जयहि जे मदें उन्नते ९८
भीमें त्या पांचांचे केले तत्काळ पांच विलय महा
कर्ण म्हणे आयुविना यांचा रिपु कोण वांचविल यम हा ९९
छेदी धनु हय सारथि मारी खंडी पुन्हाहि चापातें
भीम करी कर्णातें विरथ कथूं कर्म काय बापा तें १००
भासे कर्ण क्षितिवरि झाला सोडुनि गगन रवि पत्ती
आल्या नसतां भीतो मग न गणी सखनग-नर विपत्ती १०१
कर्ण गदा भिरकावी क्रोधभरें चावुनी रदनवासा
तीनें वारुनि वर्षे विजयाचा भाउ नीरद नवासा १०२
नुरवि करुनि पर कवचा अंगप निनेउ पलेसमय मनि भानें
भीमानें शर गणिले अंगपेनित उपलसम यमनिभानें १०३
कवच शत-च्छिद्र करुनि दक्षिण भुजहि व्रणोत्थ-शतधार

---

१स्वपक्षीय. द्रोणादिक, २ नीतिज्ञ, ३ युद्धातें, ४उन्मत्त, ५. गदचारी, ६ ओष्ठां तें, ७ बंधु, ८मेघ, ९ कर्ण, १० चाळण, ११ पळभर, १२ स्मृतीनें, १३ आंगा वर पडलेले, १४ यमसदृशाअशा (भीमानें) १५ व्रण-उत्थ-शत-धार-क्षतांनींउत्पन्नझालेल्याशतशः रक्तधाराअसा.

केला कर्ण शिखरिसख भीमें निज विशिखनिकर शतधार
पुनरपि होय पराङ्मुख वृष होतां शक्ति बाहुची शिथिला
भीमाला मानवली जनता जशि रामबाहुला मिथिला १०५
ज्येष्ठाज्ञेनें धांवति रक्षाया कर्ण चित्र उपचित्र
चित्राक्ष चित्रवर्मा चित्रायुध करिति ते रणहि चित्र १०६
सर्वहि वधिले भीमें न करुनि बहु युद्ध गलबला कांहीं
आम्हीं विलोकिला तो गरुड जसा रुद्धगल बलाकांहीं १०७
वृष बहु रडे हळहळे होय विदुरसूक्तिचीच आठवण
हेचि चुकाया घेती स्वांगीं सत्प्रणति करुनि आठ वण १०८
बसुनि नवरथीं वृष करि जिंकाया अरिस जो निकर कांहीं
वाटे वर्षे गोव- र्धनगिरिवरि हरि सजोनि करकांहीं १०९
व्याकुळ करी विदारुनि कर्णा रिपुनाशकोविदा राया
तें प्रभु म्हणे असाचि स्तु- योधनहृदया शको विदाराया ११०
कृष्णार्जुन सात्यकि बहु मानवले भीमसेनबाहूतें
त्यांचें आम्हा याहूं तेज सहायांहि दे न बाहू तें १११
प्रेतकुमार विलोकुनि नम्र करी कोप शोक राधेया
तो धात्रीसे म्हणे कां वाढविलें श्रम करूनि राधे या ११२
मग आपणा म्हणे धिक् कर्ण त्वामनपहृत-नरवराधे
दाइस म्हणे पृथावत् त्यजितां तुज लागतां न रेवें राधे ११३

१ पर्वतसख्या, २ वज्रतुल्य, ३ मान्य झाली, ४ जनांचासमूह, ५ नामविशेष(नगरी) ६ चमत्कारिक, ७ रोधलेलागळा, ८ बगळ्यांनीं, ९ साधूंसनमस्कार, १० स्नवरें झाल्यावर जेंडागासारखें चिन्ह राहतें तें, ११ गारांनीं, १२ कुशला, १३ दाईस, १४ त्वां- अनपहृत- नरवर- आधि- नाहींहरण केली दुर्योधनाचीमानसव्यथा अश्यातूतें धिक्- (संबुध्यर्थीं आधे) १५ शब्द (लोकांचें दूषण) + निरर्थक, ‡ इंद्र, ‡ साह्यकर्त्यांस

गांठी सूर्यरुचि-वृषविशिख- तति भीमा परमदारुणा स्तनगा
द्याया श्रीकृष्णाला जेविं बकी परम दारुणा स्तन गा ११४
दुःसह भीम कुरुबळीं होय जसा दहन नरकेंतुन रानीं
गणिलें त्यासमयाहुनि हळहळही न बहुतर कटु नरानीं ११५
रामाची शक्ति जसी वा भीमाचीहि शक्ति चवकळ ती
वीररसाची श्रवणें थोडी नेत्रें उदंड चव कळती ११६
युयुधान उत्तमौजा जिष्णु युधामन्यु कृष्ण हे निकडे
वदले कर्ण किति कनक- गिरिचे भेदील भीमहेति कडे ११७
भूरिश्रवा गुरुतनय कृप हे तों सुज्ञ मानवावेंच
कवि म्हणति वाणि वर्णुनि देवाकीं सज्ञमानवा वेंचे ११८
समयीं गुण जाणुनियां शब्देंही सुयश साधु साधुनि घे
हें चित्र जयद्रथकुरु- पतिवदनांतूनि साधुसाधु निघे ११९
भीमशराच्छादित रवि- सुत झाला जेधवां दिसेना सा
ष्याला कुरुपति जाणों त्याचा त्याला न ती दिसे नासा १२०
भूप म्हणे धांवा रे म्हणतां काका सि काय पायस खा
मागें ठेविल माझा न च रक्षाया स्वकाय पाय सखा १२१
गेले अग्रज-वचनें धरुनि मनीं लाज सात वाराया
ते तोयबिंदु झाले तों तापविला जसा तवा राया १२२
शत्रुंजयादि नव सुत झाले यापरिस सोजिरे नाकीं

---

१ कर्णशरांचा समूह, २ शत्रुगर्वरूपसूर्यास अस्ताचलअशा, ३ पेटून, ४ विषही, ५ पुष्कळ, ६ भीमाचा खड्ग, ७ मेरुपर्वताचे कडे, ८ हेवाणि, ९ खर्च, १० नासिका, ११ सानबंधु १२ भीम, १२ शोभायमान, + क्षीर, ‡ कर्ण.

जो हरिभाग वृकाला तो भक्ष्यहि परि ससा जिरेना कीं १२३
न विकर्णेतरपानें रणरंगीं भीमसेन गहिवरता
न गदी जगदीश्वरसा गजबजता पडलिया नगींहि वरता १२४
भीम म्हणे अर्पावें सर्वस्व तुला न सायक विकर्णा
कीं तृप्ति तुझी रुचली बहुरसिका जेविं साय कविकर्णा १२५
योग्या नव्हे प्रतिज्ञा गुर्वाज्ञा जेविं भार्गवा त्यागा
असुख रुची खलसंगति जेसी कुग्राममार्ग वाटया गा १२६
सोडावीच कुसंगति सर्वार्थद-काय-पाळणारानीं
स्वर्गपरें पुत्राचा बांधावा काय पाळणा रानीं १२७
साधु बिभीषण कीं तूं जरि खळसंसर्ग करुनि मळले शें
स्पष्ट तुम्हा दोघांस स्पर्श न केला कुसंगमळलेशें १२८
होतासि सखा तूं त्या पुण्यश्लोका अजा मिळाल्याला
दोघांसहि लाभ प्रभु देउनि सद्यश अजामिळा त्याला १२९
ऐसें शोचुनि पुनरपि सिंहापरि होय गर्जना करिता
झाला रणोत्सवीं त्या वृक्षप्रासादवर्ज नाक रिता १३०
धर्मास कळे नेला भीमें वृषगर्व सकळ विलयाला
तो सिंहनाद कळवी स्वर्गा जय केविं न कळविल याला १३१
इकडेहि हृष्ट-धृष्ट- द्युम्नादि व्योम भरिति गजरानीं
जैसे यूथपतीच्या विजयोत्कर्षे करूनि गज रानीं १३२

---

१ सिंहभाग, २ विकर्ण-इतर-पानें-विकर्णाहून इतरांच्या पानानें, ३ परशुरामास, ४ वाहुटळ, ५ शतशः, ६ वृक्षप्रासादांवांचून स्वर्ग रिकामा झाला ७ म्हणजे देवादिक युद्ध पहावयास आले । ७ स्वर्ग, ८ कर्णगर्व, ९ धर्माला, १० विजय-उत्कर्ष- जयाच्या आनंदें + गडबडता, ‡ पर्वतहि, ‡ समास, ‡ बिभीषणा.

व्यूहद्वारीं देती जिंकाया गुरुसि वीर नर[1]मुंडी
न धरिति तिळहि तनुपतन- भय जेंवि विरक्त धीरतर [2]मुंडी १३३
जन्हिं दिव्य भोगभोग्या स्वर्गीं पावति सुयोध नव देहा
नन्हि एकोन[3]देशनमिन - सोदर-मरणें सुयोधन वदे [4]हा १३४
स्मरलें सुयोधनातें जें जें कांहीं क[5]निष्ठेनात वदे
राया हें फळ तुजला भीम न लोपे कनिष्ठना तव दे १३५
ऐक पुन्हा न पृथेला गाय अशी बा सुर[6]मसू नाहीं
[7]जैं झांकिले शरांहीं आधीं मग [8]भास्वुर-[9]प्रसूनांहीं १३६
मोहे भीमशरांच्या सर्वत्रहि विद्ध काय होय शतें
नन्हि विमुख नव्हे गातिल न सकल सुर सिद्ध काय हो यश तें
पडलें क्षितिवरि [10]उडुसें भीमशरें कर्ण कुंडल हरी तें
वृषमुख गमे जलधिच्या सांपडलें अग्निकुंड लहरीतें १३८
पाडूनि एक कुंडल मग दश नाराच हाणिले [11]अलिकीं
ते शोभले [12]सरोजें पाजाया स्वमधु आणिले [13]अलि कीं १३९
होउनि मुहूर्त मूर्छित कर्ण उठे तन्मनांतही राग
तो पद्मरागनगसा गमला रक्ताई कठिण [14]हीरशैग १४०
केले रोमांचित सुर- नर कर्णें अमित बाण संधानें
न गणुनि तें तत्कार्मुक केलेंचि छिन्न [15]सत्यसंधानें १४१
वृष घे अन्यधनु म्हणे शवपूर्णा करिल बंधु समुद्रि [16]रसो

---

१ मुसांडी, २ संन्यासी, ३ एकतीस, ४ खेदोद्गार, ५ विदुर, ६ देवांसप्रसविणारी, ७ पृथापुत्र, ८ शोभायुक्त, ९ पुष्पांहीं, १० नक्षत्रसें, ११ ललाटीं, १२ कमळानें, १३ भ्रमर १४ हिऱ्याचापर्वत, १५ सत्यप्रतिज्ञजो भीमत्यानें, १६ पृथ्वी.

क्रोधें वर्षोनि भरू पाहे भीमास अंधुसे मुदिरसा १४२
भोठें संकट आलें होतें परि म्हणति जों नरेप टळतें
तों जलदपटलसें त्या वार्तसुतें उडविलें शरपटळ तें १४३
त्याचे तूण उघडले जाणों उग्राहिगर्भपेटारे
नारद म्हणे भले हो जाळा दृग्दोषदर्भ पेटा रे १४४
पवनतनयसुत गमले- शक्र प्रल्हाद राम रावण वा
वाटे गगनीं तच्छर- संघर्षजदहन पामरा वणवा १४५
शरपट असे प्रकटिती कीं रवि न दिसे न वा पवन वाहे
एकाहुनि एक अधिक करिति चमत्कार बा नव नवा हे १४६
त्या वृषवृकोदरांवरि दिव्यकुसुमवर्ष लेख रचिती जीं
मुनि आशी बहु थोडी श्रीपुत्रीं हर्षले स्वरचिती जीं १४७
यत्न न चाले म्हणुनि प्रकट करी कर्ण अस्त्रमायेतें
भीमपरापनव इच्छी चित्तीं पसरूनि वस्त्र मायेतें १४८
चुरिले वृषविशिखानीं वायु-सुताचे धनुष्यशरभाते
झाले महाशरभ जरि पहिले हरि त्यो मनुष्यशरभा तें १४९
हय मारुनि नसुतही मर्मी हाणूनि बाण पांच कसा
उतर म्हणुनि म्हणे वृष जाणों त्यो जा पळोनि वांच कसा १५०
सूत युधामन्युरथीं चढला सोडूनि पवनतनयातें
जरि होय विरथ विक्षत होऊं दे धैर्य अवनत न यातें १५१

१ कूपास, २ मेघसा, ३ राजे, ४ भीमें ५ भीमआणिकर्ण, ६ बाणाच्याघर्षणापासूनउत्पन्नझालेलाअग्नी, ७ देव, ८ अजी, ९ मयतेनें, १० सिंह, ११ भीमा, १२ शर माने, १३ कसोटीस, १४ नम्र, + अथवा.

भीमें झुगारिली रथ शक्ति प्रकटावया ठळक लीला
अशनीच मानिली बहु जन-नयनाही नभीं झळकलीला १५२
खंडी तिला नव्हे तो वृष नागीला जसा वज्र शिखंडी
कीं रतिपतिच्या इषुला लीलेनें जेविं देव शशिखंडी १५३
तों खड्गचर्म घेउनि युद्धासि स्वकुमार कोळ जसे
ते धन्य पुरुष धर्मी नेणति आयास भीति आळस जे १५४
तोडुनि चर्म शरगणा- करवीं तो प्रबळबाहु घेरविला
वाटे ते व्हां जेसा गांठूनि मुखांत राहु घे रविला १५५
छेदी वृषचापातें भिरकावुनि परम भीम करवाळ
राया रविच्याहि म्हणे ओष्ठांला विजयिभीमकर वाळ १५६
हास्य करी कर्ण बहुत शरवर्षे कार्मुकें मग नवीनें
आक्रमिलें भीमें विष- दृगहि धराया जसें गगन वीनें १५७
राधेय रथोपस्थीं भीम नभीं देखतां दडाला जी
हे नीच भीति गरुडा- पासूनि त्या कालिया जडाला जी १५८
ध्वज तरु भीम शिखी वृष मूलबिलनिलीन सर्पसा राया
वाटे प्रवर्तला तो मारुति घननादद्र्प सारोया १५९
कर्ण ध्वजीं विलोकुनि बहु आशीर्वृष्टि करिति रूर भीमीं
सत्पुरुषकथा अद्भुत रसदा म्हणतो इलाचि रोरपी मी १६०
ा साधु साधु वदले केवल तद्दंगकाम जे पर ने

---

मयूर, २ मदनाच्या, ३ महादेव, ४ यमतुल्य, ५ ढाल, ६ भीम, ७ खड्ग, ८ रू
ग्गा, ९ विष- दृग्- अहि- विषदृष्टिसर्प, १० वि-इन-पक्षिश्रेष्ठगरुडानें,
११ अजी, १२ इंद्रजिताचागर्व, १३ संपवाया, १४ आशीर्वादरूपवृष्टि, १५कां
दुघा, + बाणाला, + मोर.

बहुधा स्वानुजभाग- स्मृति वारी म्हणुनि न वधितां परते १६१
क्षितिवरि येतां झांकी शरपटलें कर्ण पुनरपि तयातें
रविनेंहि लोपवी हो सद्गुणगणें जेविं सुनर पितयातें १६२
विरथ विशस्त्र वृकोदर चुकवाया कर्णबाणपात रणीं
विजयहतगजांत शिरे गगनीं जलदांत जेविं बा तरणी १६३
अघटितहि करायाचें जें कपिला जें कळे वरोहा तें
वाटे जाणे भीमहि कीं उचली गज-कळेवरा हातें १६४
त्या गजकलेवरातें कर्ण छेदुनि चहूंकडे विखरी
वाटे पविप्रहारें केला विध्वस्त वासवें शिखरी १६५
रोधिति वृषशरपटलें भीमबळा जेविं यामुना गांगें
तरि बा झुगारिलीं जीं विच्छिन्नें काय तींच नागांगें १६६
तेंचि झुगारी जें ये रथचक्र तुरंगगजकुणप हाता
रोमांचित होय अरिहि जो भीमीं सत्ववर गुण पहाता १६७
तें तें कर्णी पावे पाषाणीं जेविं भंग ढेकूळ
वृषमत्तेभ शररदन भीमवपु गमे तयापुढें कूळ १६८
मग भीम क्रोधभरें चावुनियां दांत ओठ मूठ वळी
चित्तांत म्हणे घालूं मत्तवृषीं आजि काळ मूठवळी १६९
तों स्मरला अर्जुनपण आटोपी म्हणुनि भीम हातातें
प्रबळहि कुपितहि सत्पुरुष धर्मातें द्दिरद भी महातातें १७०

१ अर्जुनाचा भाग आहे अशी आठवण, २ भीमातें, ३ पर्वत, ४ यमुना बलास, ५ जसीं गंगोदकें, ६ गजशरीरें, ७ शव (प्रेत) ८ कर्णरूपमदोन्मत्तहत्ती, ९ बाणरूपदंत, १० नदीनट, ११ क्रोधयुक्तहि, १२ गज, + पित्यातें, ** मारुतिला ÷ यज्ञवराहाला.

कर्णहि कुंतीवचन स्मरला म्हणवुनि वधी न भावातें
त्यजिलें सर्वस्वहि परि न पळहि सत्या बुधें नमा वातें १७१
जवळि भिडोनि कुरुपते [1]हिंवेची भीमासि कर्ण कोदंडें
सद्वाजिस प्रतोदें कीं केला स्पर्श अहिस तो दंडें १७२
कृष्ण करि+रदासि तसा घे त्या चापास भीम हिसकूनी
तेणें कर्णासि शिरीं हाणी न वधी वधासहि सकूनी १७३
वाटे महातरंगें करुनि थडक अर्णवासि अर्णव दे
साहुनि धनुःप्रहार स्मित करुनि वृकोदरासि कर्ण वदे १७४
तूं वरका औदरिका टाकुनि आलासि का महानस रे
भ्याडा अणिकांत सरे दुसरा वीरांत काम हा न सरे १७५
बहु अशन-सूदताडन- पंडित तूं रण-मखीं न कोविद रे
भीरू जयश्रीस तसे कन्येला वर जसे नको विरूप रे १७६
मजसीं भिडसी भ्याडा सिंहासीं जेविं विप्रताप ससा
बाळा तपोवनाश्रित हो तूं रणभीरु विप्र तापससा १७७
किंवा हो अनुजाश्रित तोचि तुझें करिल आजि असवन
मूढा मृगें शिरावें मृगराजवनीं त्यजूनि न स्ववनं १७८
भीम म्हणे राधेया जरि असकृत् भंगिलें तुला आजी
निर्लज्जा तरि म्हणसी मज ठावी काय तुज मुला आजी १७९
ये रे भुजयुद्ध करूं हो जेसा बकहिडिंबकीचकसा

१ टोंची, २ सत्-वाजिस-उत्तम अश्वास, ३ चाबुकानें, ४ शक्त असून, ५ समुद्रास, ६ तुच्छा, ७ पोटभरू, ८ पाकशाळा, ९ भक्षण १० पंडित, ११ विद्रूप १२ पराक्रमहीन, १३ असु-अवन-प्राणरक्षण, १४ संग्राम, + कुवलापीडनामक गजाच्या दंतास.

असतां अरू त्रिदोषी जेविं बडबड त्यजील नीच कसा १८०
"भीमाचें मत जाणुनि राहे राधेय मूकसा उगला
कीं भुजयुद्धोत्साहें बहु अकुलज धनमदें तसा फुगला १८१
तों प्रभु म्हणे सख्या हूं कांहीं इकडेहि शर उडीव कसा
विरथीं वृकोदरीं तो घालि नरें वृष झषीं उडी वकसा १८२
प्रेरी अनिलसरेनें प्रभु पार्था पार्थही शरसमूहा
कर्णेंहि सूता सूतहि अश्वांतें तें म्हणे कुरुचमू हा १८३
सात्यकिरथीं वृकोदर चढला राधासुतापसरणीं हो
म्हणति यशस्वी या कीं मथित-विराधा स्मृतापसरणीं हो १८४
जो शक्रें हि पराचा नाशाया मद बलाविला पार्थ
तो नाराच प्रेषी कर्णावरि नदबला-विलापार्थ १८५
त्यांतें खंडुनि गुरुसुत वारी बाधा जरी अहिंमगुरुजा
विकळ करुनि पळवी नें भिन्न प्रभुचें महामहिम गुरुंजा १८६



## अध्याय-१३

सात्यकि आला पाहुनि देव बहु महत्व देत नावाजी
हे किति यास भुजाधिक जे वाहति कीशकेतना वाजी १
पार्था सख्या तुझा प्रिय- शिष्य सखा पातला पहा यातें

१ मत्स्यीं, २ येथें ब असोन प्रासाकारितां व घेतला आहे. वकसा = बकासारिखा ३ राधा-स्मृत-अपसरणीं-कर्णपलायनसमयीं, ४ विराधराक्षसास मारणाऱ्यारामास, ५ नद्-अबला-विलापअर्थ-त्याच्यास्त्रियांस विलापदेण्यासाठीं, ६ नाराचांतें, ७ सूर्योद्भवा, ८ वर्णी, ९ देवास, १० अर्जुनरथातें, + अश्वस्थाम्यास.

याकुरुबळवेगानें तूं कीं क्षम एक हो सहायानें २

शिरतो पारावारीं परि कैंचा वेग त्या असा मकरा
आजि कळेलचि भावि स्वक्षम दुर्योधना असामकरा ३

श्वेताश्व म्हणे प्रभुजी कांपति चळचळ अरी पदानें ज्या
तो सात्यकिवरि उठला कीं हो भूरिश्रवा महातेजा ४

झाला युयुधान परि- श्रांत न भूरिश्रवा समरयांसीं
समबळसाहित्यांसीं गांठि बरी विषम बा समर यांसीं ५

सिंधु तरुनि न बुडो हा खाउनियां गोष्पदीं गटकलीला
बा बहु करीत आले त्वन्नामपदाश्रयें कटकलीला ६

त्वत्करुणामृतपूरीं सर्वस्वें प्रणतयाद वागावें
केवळ न सात्यकि सुखा अजित असें म्हणति यादवा गावें

तों तो कौरव्य म्हणे मृग होउनि सिंहदृष्टिविषय मरे
तसि माधवा मदरिगति कीं मामकतेज बाण विष यम रे ८

तुज पक्षतें कुरुपतिदृक्[१२]- दुर्गादेवीपुढेंचि कापीन
होईल सुप्रसन्ना कीं तूं आहेसि बहु निका पीन ९

कर जा वराप्सरांसीं अर्पुनि मन्मार्गणा शिर विलास
लाजो रडो युधिष्ठिर जेणें व्यूहांत तूं शिरविलास १०

निःसंशय धर्मार्जुन कृष्णा समर सोडितील शोकानें
स्पष्ट निरुत्साह सकल होइल हें आयकेल जो कानें ११

---

१सात्यकि, २सागरांत, ३रुक्मरथ, ४सख्य नकरणारा असा, ५समवेगासी, ६स्वैरक्रीडा, ७भक्ष्यरूप जलजंतू, ८भूरिश्रवा, ९सिंहदृष्टीला गोचर, १०हे सात्यके ११माझें तेज, १२दुर्योधनाची दृष्टिरूप दुर्गादेवी निजपुढें, १३चांगली, १४पुष्ट, १५माझ्या बाणास.

हांसुनि शैनेय म्हणे कौरव्या यमाहि भय न शिवविल या
न करुनि निरायुध रणीं नेइल न ज्वलन नयन शिव विलया १३
कोणासि भिववितां हो हा यादव अजितदास कळलें कीं
जेव्हां होये भजक दे भाग्य पिता अजि तदा सकळ लेकीं
मज नव गर्जित शारद- घनगर्जितसेंचि हांसवीतें हो
या गर्जनेसि होइल फल तरि यय कां न कांसवीतें हों १४
रे कौरवाधमा तुज वधिल्या वांचूनि मी न परतेन
होतें जेजे झाले शैनेयेषु बक मीन पर ते न १५
येणें तो नेणें हा बोलुनि बहु तीक्ष्ण वचन कोपविला
साहेल कोण हो अति- कठिणाही तीक्ष्णवच नको पविला
भिडले अत्यावेशें ते सात्यकि सोमदत्ति बहुत रणीं
तच्छरनिकरें केला छिन्न तसा राहुनें न बहु तरणी १७
विरथ निरायुध होउनि शूद्द नियुद्धीं प्रवर्तले मग ते
जरि नसते धर्मज्ञ ब्रम्हज्ञ कुलीन कां न डगमगते १८
कृष्ण म्हणे श्रांत दिसे सात्यकि कौरव्य नागविल याला
पार्था पक्षिपतिपुढें यावेना काय नाग विलयाला १९
रक्षावा व्यसनीं त्वां माधव आला तुझ्याचि कार्याला
स्वजनपरित्राणाहुनि अन्य व्रत मत नसेचि आर्याला २०
अर्जुन म्हणे गमे मज देतो मत्तेभ यूथपा टकरा

१ सात्यकि, २ मला, ३ जेव्हां भजक होय तेव्हां पिता लेकीं भाग्य दे असा भावार्थ, ४ शरत्कालींच मेघगर्जनेंसारिखें, ५ होवो, ६ शैनेय-इषु- सात्यकीचे बाण, ७ वज्राला, ८ बाहुयुद्धीं (मल्लयुद्धीं) ९ गरुडापुढें, १० यूथपतीस, + सर्प.

प्रभुजी सात्यकिरक्षण संकट मोठें तुम्हीच वाट करा २१
कृष्णार्जुन वदति असें तों त्याचा करूनि बाहु समर गडी
विधुसम मृदु होय नया कौरव्य क्रूरराहुसम रगडी २२
आपटिला भूपृष्ठीं केश धरूनि ओढिला जना गमला
वधिलाचि भूरिदक्षिण नाहींयं क्षणा वृष्णिवीर नाग मला २३
ईश्वरवरलाभ जया तो काळावरि करील सनेतें
कीं सोमदत्ति हाणी सात्यकिवक्षस्थळींहि लत्तेनें २४
कृष्ण म्हणे मजपासुनि जें शासन होय कालियाऽहीतें
झालें खन्नाथवरें यापासूनि दैवि कोलि याही तें २५
पाहे असिनें सात्यकि- मस्तक खंडावयासि जों रुकवी
भ्रमवी कुलालचक्रा- परि शिर चिर खड्गपात तो चुकवी २६
तों प्रभु म्हणे अरे रे श्वेताश्वा वीरनायका पावें
बा त्वत्समक्ष अरिनें सात्यकिशिर आजि काय कापावें २७
अर्जुन शार्ङ्गग्रजानें चिंतुनि चित्तांत मानवे शनदा
तद्दक्षिणभुज खंडी हा म्हणती सर्व मानवेश तदा २८
केवळ जडली होती जरि दृष्टि जयद्रथीं तरि रुजानें
पार्थे प्रिय सोडविला तोडुनि त्या भूरिदक्षिणभुजानें २९
सांगद सखड्ग तो कपि- केतुशरच्छिन्न वीरभुज गमला
सहसा खगपति-खंडित- भोग तदाननविमुक्त भुजग मला ३०
सोडुन सात्यकिस म्हणे कौरव रे पांडुपुत्र कपिकेतो

१ भूरिश्रवा, २ सात्यकि ३ हे कालि देवि, ४ भूरिश्रव्यातें, ५ स- अंगद- बाहुभूषण सहित, ६ भूरिश्रव्याचा भुज, ७ सर्पाचें शरीर, + गरुड, * राजे.

धर्म कृपादिगुरुकथित हा कीं अन्योक्त जीर्ण न पिके तो ३१
यादवसहवासें तूं झालासि तसाचि कर्म हें स्वमतें
तुजला नसेल रूचलें रुचलें बहुधा कुकार्य कृष्णमतें ३२
अन्यासीं रण करितां माझा भुज खंडिला कसा सहसा
धर्मासि काय कथिसिल शास्त्रें बुडवूनि गुरुयशासह सो ३३
जो श्रितरक्षणदक्ष प्रभु सखनर वीर कर्म निंदी तें
तन्नीतिनें भजे रूर वल्लीनें त्यजुनि जेविं सिंदीतें ३४
पार्थ म्हणे कौरव्या वृद्धपणीं स्पष्ट बुद्धि मंदावे
कुल जांहीं जीर्ण-पुरुष ते पुण्ययशोर्थ मात्र वंदावे ३५
भगवन्मतासि भगवन्- मननिष्ठा मजहि लाविती बोल
जो लक्षसुज्ञमान्य श्रितरक्षणधर्म मानिशी फोल ३६
माझा साक्षाद्दक्षिण- भुज सात्यकि हा कसा न रक्षावा
समरीं सहाय जो जन तो प्राणाहूनि अधिक लक्षावा ३७
त्वां आत्मा निंदावा कीं जो असमर्थ भुजहि राखाया
योग्य श्रितावनाक्षम कीं परमाऽसाध्य रुज हि रा खाया ३८
स्वभुजावनं जड ज्याला श्रितरक्षण करिल काय तो काचा
तो धन्य जया आश्रित उत्संगावरिल काय तोकोचा ३९
कौरव्य न दे उत्तर जाणों पार्थोक्त नायके कांहीं
त्याच्या नरौक्तिहीं मद सर्पाचा जेविं जाय केकांहीं ४०
करुनि शरासन मग तो होय प्रायोपविष्ट मौन धरी

---

१अनुजा, २फलदेणारा नाहीं, ३आश्रितसंरक्षण, ४श्रित-अवन-अक्षम-आश्रितांचेरक्षण करण्याविषयीं असमर्थ, ५रोग, ६बाळाचा, ७नर-उक्ति-अर्जुनाच्याभाषणानीं. ८साहा (शास्त्रें)

योगबळें विधिलोका- प्रति जाया उपनिषद्विचार करी ४१
कुरुनीं केली कृष्णा ऽर्जुननिंदा फार न कथवे गा ती
ज्यांला देवर्षींचे कामाद्यरिमीनबक कथवे गाती ४२
लेश विषाद न दे कुरु- कृतनिंदासारवर्य वीरा यो
त्या भूरिदक्षिणासहि न कुरुकृत स्तवन हर्षवी राया ४३
पार्थ म्हणे कौरव्या जें मद्व्रत लेशाही नसे मळलें
सर्वांसि विदित असतां तुज एकासचि कसें नसे कळलें
जो माझ्या शरविषयीं असतां प्रबळहि धरील हननाशा
न शकावाच कधीं तो शत्रु कराया मदीय-जन-नाशा ४४
खड्गं सात्यकिमस्तक खंडन करितां तुझा भुजच्छेद
हा जरि अधर्म म्हणतां या कर्में बहुत पावतां खेद ४५
विरथ विशस्त्र सुभद्रा- सुत तुमचें धर्मतोक सामान्य
केला तुम्हीं नशाचा वध कीं हो धर्म तो कसा मान्य ४६
ऐसें जिष्णु वदे तें ऐकुनि तो स्पर्शला शिरें महिनें
उडवी नयाकडे भुज वामभुजें पक्षिपति जसा अहिनें ४७
किमपि न वदतां प्रेमें कृष्णासख म्हणे नया अगोधाला
पाहुनि तुला मदात्मा ऐसा न सुराश्रया अगा धाला ४८
धर्मीं भीमीं नकुळीं सहदेवीं प्रीतिरीति परमा जी
तीच तुझ्या ठाईं बा आहे मति तुज म्हणे न पर माजी
तूं माझ्या कृष्णाच्या आज्ञेनें पुण्यलोक पाव कसा

१उपनिषत्-विचार, २काम-आदि-अरि-मीन-बक, ३अर्जुनास, ४शर-विषय-बाणाच्याप्रदेशांत, ५गंभीराला, ६कल्पवृक्षाला, ७तृप्तझाला, ८माझी.

हो सुगतिपात्र शिबिसा तेजस्वी सूर्यचंद्रपावकसा ५१
प्रभुहि म्हणे कौरव्या घे देतों सुवर वरदवर गा मी
साधो वैकुंठप्रांत जा हो मत्तुल्य पक्षिवरगामी ५२
साधु म्हणति हा घनसा दाता सततो ऽग्निहोत्र-याजी यो
निज-लोकीं अवलोकुनि चतुराननही म्हणेल या जी या ५३
इतुक्यामाजी सात्यकि धांवे कापावया शिर तयाचें
ब्रम्हीं गुरुप्रसादें न पुन्हा नापावयाशि रत याचें ५४
वारी कृष्ण धनंजय भीम नरी क्रूर तो तयास वधी
सात्यकिधी त्या वीरीं तैशी वृत्री जसीच वासवधी ५५
वारित होते कर्ण द्रौणि जयद्रथ कृपादि हा कांहीं
परि तो त्यजिना झाला न शलाग्रज-वधदुराग्रहा कांहीं ५६
जरि सर्व म्हणत होते रे युयुधाना नको नको परतें
हरिलेंचि भूरिदक्षिण- शिर वीरेण ऐकिलें न कोपैरतें ५७
सात्यकि विश्व-मुखें त्या कर्मकलंकें उदंड निंदुनि घे
संकोचांतुनि बाहिर बहुधा तैंपासूनीच इंदु निघे ५८
जो सात्यकि हत यूथप हरिसा अत्युग्र पूर्ण उत्साहें
कुरुवीरांसि म्हणे विष पीतां करितां मदीय-कुत्सा हें ५९
धर्म-कथा धार्मिकसे कथितां न विचारितांहि अन्या या
न वधावा न वधावा म्हणतां आपण करूनि अन्याया ६०

---

१ अग्नीसारखा, २ वरदश्रेष्ठ, ३ माझ्यासारखा, ४ गरुडावर बसून फिरणारा, ५ निरंतर अग्निहोत्रहवनकर्ता, ६ या भूरिश्रव्यास, ७ ह्याच्यासराविषयीं, ८ इंद्रबुद्धी, ९ भूरिश्रव्याचा वधरूपदुराग्रहास, १० हे सात्यके, ११ निवारण, १२ रागीट अज्ञानें, १३ गजपति-

जेव्हां केलें विरथ-वि- शस्त्र-सुभद्रा कुमारवधकर्म
तेव्हां गेला होता सोडुनि कोठें तुह्मांसि हा धर्म ६१
जो मज पाडुनि समरीं हाणिल माझ्या उरांत लात अरी
तन्मथन मत्प्रतिज्ञा नी म्यां केली वधूनि यासि स्वर्गी
जें कर्म अभित्राला पीडाकर होय सर्व तें कार्य
रामायणांत वदला ह्मणती कवि आद्य ज्यासि तो आर्य
ऐसें सात्यकि बोले उत्तर इकडील कर्णहीं न करी .
वाटे झाले परिसुनि हरिगर्जित शक्तिवर्णहीन करी ६४
खलदुर्जय बलजलधि च्छलरहिताचार जलदसा दाता
नलसम शुचि शलपूर्वज हलभृदनुजलोक पावला ताता
शिनिनें स्वयंवरीं जें श्रीवसुदेवार्थ देवकी हरिली
तें बहुत सोमदत्तें आत्मपरिभवव्यथा मनीं धरिली
बहु वीरमंडळीं यश जिंकुनियां युद्ध सत्वर शिनि घे
श्रीरुद्रासि शरण तो विजयार्थी शुद्धसत्वराशि निघे
किंचित् न देचि इतरा दात्यापरि जो दयालु देव रद
तो आशुतोष दर्शन देउनि वद वर असें वदे वरद ६८
तो सोमदत्त नमुनि स्तउनि प्रेमें परोपरि भवानें
मागे शिनिपुत्राच्या मत्सुत्र रणीं करो परिभवानें ६९
मत्सुत-करें वरावें वरिलें जें काय हो यश शिनि-करें
नासे तव प्रसादें ताप न नाहींच होय शशिनिकरें ७०

---

१ वाल्मीकि, २ हस्ती, ३ विष्णुलोक — हलभृत-अनुज-लोक-बलरामाच्या बंधूचा लोक ४ हे धृतराष्ट्रा, ५ नामविशेष (सात्यकीच्या पित्यानें) ६ चंद्रसमूहें *: तात्काल होतो संतोष ज्यास असा सदाशिव + शक्ति-वर्ण-हीन.

प्रभु एवंमस्तु ऐसें बोलुनि दे पार्थिला वर प्रणता
हें किति देता जरि तो चल कालपराभयार्थ घ्या ह्मणता ७१
शिनिनें जैसा परिभव केला होता रणीं स्वताताचा
तैसाचि भूरिदक्षिण करि ईश्वरें तदंगजोताचा ७२
यास्तव सात्यकि भंगे कीं जाया तदरिखेद हर पावे
तातरि तयापुढें तों शत्रूंचे सर्व वेद हरपावे ७३
ब्रह्मद्रव्य ज्ञाति- द्रव्य गुरुद्रव्य रक्षिति न हरिती
ब्रह्मण्य सत्यवादी दीनजनीं तातसे दया करिती ७४
बहु शांत दांत दाते अविकत्थन धर्मनीतिनिष्ठ तसे
सत्पुरुष तेचि यादव ज्यांपासीं विजय दैव तिष्ठतसे ७५
अजित पदाश्रित सर्वहि यादव अजितचि सुरासुरजनां कीं
गाती यांसि सजुनि बहु मधुररव नवे नवे मुरज नाकीं
त्यांसीं कैसा लाऊं दिधला त्वां पुत्रवत्सला दावा
काय ह्मणों वृष दुर्वह हस्तिभरें केविं वत्स लादावा

---

## अध्याय १४

अशि यूपकेतुची गति होय मग ह्मणे सिताश्व देवा हूं
श्रीरुद्रचरणकमलीं शीघ्र जयद्रथशिरोब्ज दे वाहूं १
थोडा उरला वासर बा सरसिजलोचना तुरग हाकीं

---

१ एवं·अस्तु·असें·असो, २ तत्पुत्राचा, ३ निंदापरस्तुतिनकरणारे, ४ मृदंग. ५ भूरिश्रव्याची, ६ शिरकमल.

माशवाचि खल अनुप- कारज्ञ खरारखुरा उरग हा कीं २
बा केव्हांही झालें यामागें जें सुधी न दासाचें
तें आजहि प्रतिज्ञा वच होचि दयासु*धानदा सोचें ३
तो भक्तवत्सल प्रभु ती पार्थाची मनांत मोत लिही
रथ चालवी त्वरित तें पाहुनि लाजे मनांत मातलिही ४
कुरुवीर धांवले बहु येतां नररथ जयद्रथाजवळ
कुरुपति कर्णासि ह्मणे न परसुखीं सिंधुराज हो कवळ
प्रकट करी बळ चिंतित होतों बहु दिवस या समरसमया
सुकवि ह्मणोत महाद्भुत ठावा नाहींच यासम रस मया
हा पण कीं अस्तासि न रवि जातां सिंधुराज माराया
अल्पावशिष्ट वासर वेंचे तों मात्र पार्थ वाराया ७
जातां वृथा प्रतिज्ञा पावेल श्वेतवाह विलयाला
ज्वलनीं शिरतां सत्य- त्राणा कवि कोण राहविल याला
होतील बंधु शोकें धर्म पवन[१०]पुत्र बुद्धिबळहीन
जलहीन मीनसे ते चवघेही वांचतील पळही न ९
पावेल हरिहि तापा- पासुनि बहु जेविं आ[११]ज्यप दराला[१२]
एवं सुखेंचि येइल निष्कंटक सर्व राज्य पदराला १०
शल्य कृप द्रोणि सहित करिशिल तूं स्पष्ट रत्नसानुजया[१३]
सेना तव माहित्या योजित मी करुनि यत्न सानुज[१४] या
कर्ण ह्मणे कुरुराजा मज गमला भीम अहिमकर[१५]साच
त्याचे सायक नायक उग्रांचे क्रुद्ध अहि मकर साच १२

१ सर्प, २ खोटी, ३ खरें, ४ उक्ति, ५ इंद्रसारथी, ६ जयद्रथ, ७ यायुद्धरसासारखा, ८ मयासुरास, ९ थोडा राहिलेला, १० भीम, ११ उंनमघृन अथवा लोणी, १२ भयाला, १३ मेरुजयातें, १४ स-अनुज-बंधूसह, १५ सूर्यसदृस *: दयारूप अंमृताच्या डोहा:

अमरांतेंही मर्म छेदुनि ह्मणतिल करूनि आ वांका
बहु विकल मी असावें ह्मणुनचि आहें धरूनि आवांका
मज बळ न चालवाया निजकर पाद-क्षताऽकुला लेश
[1]भीमा मी दाखविला विधिसि जसा द[2]क्षैना कुलालेश १४
परि समयीं न चुकावें ह्मणुनि यथाशक्ति करिल संगर हो
दैवीं जय प्रतिष्ठित आहे तूं धरुनि धैर्यसंग रहा १५
मी युद्ध करित असतां सैंधव न धनंजयासि गावेल
अभिमुख वात वहातां तरुला व्यापील काय गा वेल १६
ऐसें जों कुरुपतिसीं उत्साह बळें धरूनि कर्ण वदे
नर शर-जालें मथितां बहु गरळें जेवि नाप अर्णव दे १७
छेदी पार्थ तडतड द्विरदांचें कुरुबळीं शिरोनि करें
झांकी क्षितिला विखरुनि वीर धनुर्बाणभुजशिरोनिकरें
किंबहुना बहु शोणित- पूरीं योधबळ वाहवी राया
तेव्हां सुरर्षि वदले सद्यश यों[+] धवलवीरा या १९
कुरुकटक जलदपटलचि शिरतां अर्जुनसमीर वितुळे तें
ते नृप रक्षतुळे तें पावे तो विक्रमी रवितुळेतें २०
जेविं क्षम लीलेनें सर्व परमदा पि[10]नाक साराया
नरचाप तसाचि परा उग्र परम दापिना करा राया २१
दुर्योधन दुःशासन कर्ण कृप द्रौणि शल्य हे मा[11]नी
पार्थीं बहुशास्त्रानीं वर्षति पा[12]त्रीं जसेंचि हेमानी २२

---

१अवसान, २ कुशलता, ३ कुंभार, ४ हाती,कर्ण, ५ सांपडेल, ६ शुंडादंड, ७ समूह, ८ अर्जुनवीराला, ९ राक्षसतुळनेतें, १० शिवचाप, ११ अभिमानी, १२ सत्पात्रीं ब्राह्मणीं. + येथो.

विजयासि बाण ह्मणिति ते सर्वहि एकदांचि कडकडुनी
गमलें अमृतरसातें केली जिंकावया निकड कडुनीं
करिती प्रसन्न व्हाया जो सादर नारदादिभक्त पसे
त्या प्रभुच्याही मर्मी ह्मणिति शर दशमुखादि रक्तपसे
परशरशतें त्यजि न धृति विजय सुयति जेविं अंतरायशतें
रामयशासीं तुळितां न धरी तिलमात्र अंतरो यश तें
दुर्योधन दुःशासन शल्य कृप द्रौणि भंगतां क्रुद्ध
कर्ण पुढें होय करी अत्यद्भुत शक्रसूनुशीं युद्ध २६
सात्यकिचे भीमाचे पावुनि वित्रास हाय ह्मात रणीं
ह्मणती वाटे झाला प्रियसुतमित्रा सहाय हा तरणी
पार्थ न साहे जें वृष कृष्णीं क्षत करुनि होय अधिक रणीं
वेदांती परविरचित दूषणपांडित्य जेविं अधिकरणीं २८
शरजाला-सह सहसा पाडी तोडूनि पार्थ तो धनुतें
तों सज्य दुजें केलें निमिषार्धे त्या समस्त-योध-नुतें
कर्णें शरवृष्टि पुन्हा केली तिस विसकटूनि माराया
पविसम सायक सोडी रचित-निर्लिपार्थ पार्थ बा राया
जो हांसत पार्थ ह्मणे अर्पुनि बाणास अंग पावन हो
छेदुनि दुर्वार शर द्रौणि करी क्षिप्र अंगपावन हो ३१
केला पार्थ वृषें वृष पार्थें शतदा शरीं दीसेनासा
साध्वस[10] न धरिति जाणों साग्र्या[11] दोघांसही दीसे नासा

१ विषांनीं, २ अंजलि, ३ राक्षससे, ४ उत्तमसंन्यासी, ५ विघ्नशतें, ६ भेद, ७ सिद्धांतप्रतिपादनांत, ८ रचित. निर्लिंप. अर्थ. संपादित आहे देवांचा कार्यार्थ जेणें असा, ९ अंग-प-अवन कर्णरक्षण, १० भय. ११ स. अग्रां.

तों स्व१शठांसि नृप ह्मणे वृष विजया न वधितां न परतेल
सा हित्य करा दीपचि हरि तम त्या पाहिजेचि परे तेल ३३
मग नगेभित्सुत मारुनि हरि सारथि कर्णकीर्तिला मळवी
त्यातें अश्वत्थामा सत्वर वाहोनि निज रथीं पळवी ३४
गुरुसुत कृप मद्रप वृष-सेन झटति पार्थ शर सहात रणीं
इच्छिति सर्व असें कीं अस्तंगत होउ शीघ्र हा तरणी ३५
सिंधुपतीच्या जाऊं नच द्यावा पार्थ हा निकट कांहीं
तुमच्या असाचि निश्चय केला साहोनि हानि कटकांहीं
बहु वर्षतां परांस न नर मानी जेवि न नग मेघांस
भासे धनंजय धनं--जयेचि सकळ शत्रुजन गमे घांस ३७
गमलें आंगें करितो रतिरमणक्षयकराक्ष समरा या
कीं श्रीमद्रामानें वेढुनि झटतात राक्षस मराया ३८
हय गज भटांसि नरशर अहि द्याया मृत्यु रोकडा डसले
मग हृदयीं हरिवसा कुरुपमनीं फार तो कडाड सले ३९
गरुडें गांठावा अहि गरुदनिलें जेविं जलधि उडवूनी
बा गांठिला जयद्रथ तेवि नरें बहुत सैन्य बुडवूनी ४०
कपिवरि एक हयावरि वसु हरिवरि तीन अर्जुनावरि सा
शर योजी सैंधव विग- ताऽयु शरभहंतुकाम तो हरिसा ४१
ते छेदुनि पार्थें क्षत- तनु केला बाण साठ सोडूनी
तत्काळ पाडिले शर- युग्में तत्सूतकेतु तोडूनी ४२

१ परंतु. २ अर्जुन, ३ अश्व, ४ श्रमानें कामकरिती ५ अग्निच, ६ गवत, ७ मदनमारकनेत्रज्याचे असा शिव, ८ गरुत्-अनिल पक्षवातानें, ९ आठ, १० कृष्णावर, ११ जयद्रथ, १२ सिंहसा, + सहा.

तों प्रभु ह्मणे सख्या हा व्याघ्रीच्या जेविं सारथा नीचा
वधिशिल कसा न करितां भग्न रणीं प्रथम सा रथा नीचा
तुज थोड्यानरि व्हाव्या जिंकाया सारथासि सा घटिका
थोडा उरला वासर सन्मान्या पण तुझा न हो लटिका
सैंधव आजि कसा तरि तुज करवीं पाहिजेच मारविला
यास्तव मी योगें तम निर्मुनियां झांकितोंचि या रविला
वाटेल सैंधवासह सर्वांसहि सूर्य सत्य मावळला
चुकला मुकला अर्जुन भलतें शोकज्वरांत चावळला
चुकलें मरण ह्मणुनि बहु हर्षेल न आपणास रक्षील
हांसेल ह्मणेल भलें झालें पार्थासि वन्हि भक्षील ४७
त्या रंध्रींच अधम-शिर उडवीं शंका धरूं नको कांहीं
करितांहि शोक विरह- ज्वरभय चित्तीं धरून कोकांहीं
पार्थ अवश्य ह्मणे प्रभु झांकीं निर्मुनि महा तमा रवितें
अरिरस नरकुंजरीं हरि- तेजचि होउनि महात मारवितें ४९
करुनि तमें तरणीतें पुरवाया श्रितमनोरथा पिहित
यद्यपि दुर्घट होतें प्रभु लीलेनें करी तथापि हित ५१
बहु जोडिलें सुयशधन ऐसा हा भरुनि हाट कपटाचा
महिमा सहस्रवदना- हि न वदवे दिव्यहाटकपटाचा ५१
तरणि न दिसतां लावी सकळ कटक तोहि दृष्टि गगनींच
त्यो आपणाहुनि बहुत हर्षभरें होय मेरुनग नीच ५२

---

१ चक्रवाक पक्ष्यांनीं. २ आच्छादित, ३ बाजार, ४ दिव्यहाटकाचा पट ज्याचा, ह्मणजे सुवर्णापरी पीतपट ज्याचा असा जो कृष्ण त्याचा, ५ जयद्रथास, + वकला.

[1]देव ह्मणे सिततुरगा　देखनसे सिंधुपाल तो खौतें
तन्मस्तक खंडुनि मज　बा लक्ष्मणसाचि घाल तोखोतें
भामस्मरहरवर नर　खरतर [2]शरवृष्टि करुनि कुरुसैन्य
मारी सुदूर सारी　चापबळें अचळ कुळ जसें वैन्य[4]　५४
आनाभि बुडति चक्रें　ऐसें क्षितिवरि पळांत पळे सांचे
वाटे खरे विखरिले　रणरंगीं पुष्पराशि पळसांचे　५५
शौरिसख करी सहसा　द्रौणि कृपाचार्य गाढ विद्ध रणीं
बहु कांपवी पतद्गज-　वृंदभरें पार्थ गाढविद्धरणी[***]　५६
वृषवृषसेन धनुष्यें　खंडी भ्रमवी सुयोधनमनातें
मद्रपसूतासि वधी　करिति भयें बहु सुयोध नमनातें
शरवर्षे रथरक्षक　सकळ विकळ करुनि पळविले वधिले
कार्यार्थ सुचों न दिलें　त्या वध्यजयद्रथा मनामधिले ५८
मग घे शर जो होता　अर्चित दुःसह अरीस भास्यांत
वज्रास्त्रें मंत्रुनि बहु　आणी पहिल्या परीस भीं त्यांत ५९
देव ह्मणे ऐक अशी　झाली ह्या जन्मतां नभोवाणी[11]
हें सुत-रत्न निज-कुळा　वृद्धिप्रद जेविं वारिजा[12] पाणी ६०
होईल शूर मानी　बहु संपत्ति प्रसिद्ध जोडील
परि समरांत अलक्षित[13]　अरि याच्या मस्तकाशि तोडील
सुतशोक जसा न तसा　दुःसह संताप भो सखे दैव[14] दे
याचा पिता बृहद्रथ　ऐसें होऊनि तो सखेद वदे　६२

१अर्जुनास, २आकाशातें, ३हर्षातें, ४ वेनराजाचें,　५ नाभिपर्यंत, ६मांस, ७अर्जुन, ८ दृढ, ९ पतनपावणारा हत्तीचा समूह त्याच्याभारें, १० तेज ११ आकाशवाणी, १२ कमलास, १३ अवचित (न पाहतां) १४ वणवा
***गाढ-वित्-धरणी. अतिशयजाणणारीपृथ्वी.

क्षितिवरि जयद्रथाचें पाहिल मस्तकसरोज जो जन हो
शतधा त्याचेंहि फुटो मस्तक तो श्वापदांसि भोजन हो ६३
जपतो तपतो तप तो कीं निज वाचा कधीं न हो वंध्या
संप्रतिस्यमंत पंचक- देशाबाहेर करितसे संध्या ६४
योथें मस्तक याच्या जनकोत्संगीं हळूच पाडावें
कंदुकसें गगनपथीं वरिचेवरि शरकरोंचि तोडावें ६५
अर्जुन म्हणे बहु बरें गांडीव गुणीं स्फबाण तो जोडी
सोडी सणणणणणणण वध्य जयद्रथशिरांबुरुह तोडी ६६
नेलें करें कमळसें शरनिकरें सावरूनियां शिरतें
अंकींच उतरिलें बा हिनचि अहित दैव जेधवां फिरतें ६७
बैसोनि करितहोता जप तुमच्या स्वस्थचित्त तो त्याही
प्रभुयश किति वर्णिल कवि करु आर्या लक्ष कोटि तोंप्याही ६८
अंकीं काय गुरु असें म्हणुनि पहावें परंतु मन भुललें
उठतां जप करुनि पडे क्षितिवरि स्फुतशीर्ष तच्छिरहि उललें ६९
प्रभुनें यापरि तुमचा जांवाई आणि खपविला त्याही
भगवत्क्षोपसें नवकुंश शमविल गरुडाहि न पवि लाव्याही ७०
ब्रम्हादि सर्व भूतें तें पाहुनि अतुल विस्मया वरिती
करिती बहु नर हरिस्तुति तद्ध्यानचि भक्त दृढ मनीं धरिती ७१
अक्षौहिणी खपविल्या या युद्धीं श्वेतवाहनें आठ
कार्मुक वेद हरिहर स्तवराजहि रोज ज्या जैसा पाठ . ७२

---

१होचो, २आतां, ३जयद्रथाचें, ४जनक-उत्संग-बापाच्यामांडीवर, ५चेंडूसारखें, ६ कोमल तृणांकुर, ७लावकपक्ष्यासही, ८कृष्णाचिस्तुति, ९धनुर्वेद, १०हेधृतराष्ट्रा, ११ श्वेतवाहनास (अर्जुनास), + जड.

मग जगदीश सुहृत्तम पुरुषोत्तम त्या तमासि आटोपी
हा टोपी घालिल जल निधिसहि मशका म्हणेल आटोपी ७३
दिनेमणि दिसतां देव-[2] क्यात्मज माया असें तयां उमजे
कपटें जिंकोनि करित होते वृद्धांसमक्ष ही धुंमजे ७४
केलें तव तनयांनीं पाहुनि सैंधव परोक्ष रोदन हो
क्षमद कविमतें स्नेहचि ऐसा सेवनपरा सुरोद न हो ७५
श्रीकृष्णें प्रथमचि मग श्वेताश्वें शंखराज वाजविला
भीमाच्या सिंहरवें कल्पांत-पयोद नाद लाजविला ७६
त्या नादें धर्माला विजयें अरि मर्दिला असें कळलें
टळलें दुस्तर संकट कृष्णपदध्यान जयफळें फळलें ७७
होऊनि जयोन्मत्त द्रोणासि न वचकतीच भट कांहीं
हर्षें बहु विध वाद्यें वाजविलीं धर्मराज-कटकांहीं ७८
गुरु मारावाचि म्हणति पांचाळप्रमुख सकळ वीरमणी
उत्साह-शक्ति योधा श्रम भर्त्या जेविं न कळवी रमणी ७९
अस्तानें रवि जातां जगदेक-यथार्थसंध सितवाजी
निज विजयश्रीस हरी सांपडली पथ चुकोनि कितवाजी ८०

---

## अध्याय.१५

बहु-शरं वर्षति कृप गुरु- सुत घालुनि शक्रसूनुला मध्यें

---

१सूर्य, २ देवकी-आत्मज- माया- कृष्णमाया, ३ भीष्मादिकांसमक्ष, ४ धुंदाई, ५गतप्राण, ६मद्यसागर, ७ होवो, ८ प्रलयकालच्यामेघाच्यानाद९ सत्यप्रतिज्ञ

ज्याच्या धनुला झाली दैत्यांचीं उद्धतें बळें वध्यें १
चित्तीं पार्थ म्हणे कृप गुरु गुरु-सुत हाहि गुरु असामान्य
निष्ठुर कैसें व्हावें द्रोणेतर जन नसे असा मान्य २
शर मंद वेग तो गुरु - वत्सल रक्षावया स्वयश हाणी
परि तन्मति गडबडली स्त्री बहु कार्यांत जेविं न शहाणी ३
त्या विभयुगीं न पडति जहि पार्थ-प्रहित मंद रोपें रितें
गाववित अमृतरुचि शुचि गुणवश यश मेरुमंदरोपरि तें ४
पार्थ शरार्त कृप कृपण- सम समयज्ञहि करून आरडुला
पडला मूर्छित जेसा बहु बाल व्यालदष्ट आरडुला ५
वाटेल तत्तनुपुढें बहु कांटे काय काढिले पणसें
आलें कृपासि पन्नग- पाशीं रघुनायका ढिलेपणसें ६
मेलाचि असें मानुनि सूतें रथ तूर्ण काढिला मागें
केला गुरु-शोक प्रभु- पाशीं त्या अर्जुनें महाभागें ७
गुरु माय बाप ईश्वर तरले गुरुचीच धरुनि नर कास
मजसम मीच कृतघ्न प्रभुजी पावेन मरुनि नरकास ८
स्मरतां कृप-गुरु घालिल मज बहु अभिमन्युपरिस शोकांत
ज्याला गुरुचा वध मत अधमतम असा नसेल लोकांत ९
करितां विलाप दाटे बाष्पांच्या पार्थ कंठ वेगानें
कीं गुरुशोकीं स्रुजना स्वर्गीहि न काल कंठवे गानें १०
तोंचि जयद्रथ-मथन- व्यथित-हृदय कर्ण धांवला कोपें

---

१ कृप आणि अश्वत्थामा यांचे बाई, २ बाण, ३ निफळ, ४ सर्पदंशित, ५ फणस नामक फळानें, ६ मोठा भाग्यवान् अशा, ७ माथ्य, ८ अश्रूंच्या, ९ क्रमवे.

सात्यकि होय पुढें हो पार्थ म्हणे यास हें नव्हे सोपें ११
रथ चालिव वालिवधा-[1] घतुलयशा यादवास रारवावें
सुरभी म्हणेल काय व्याघ्रें स्वसमक्ष वासेरा रवावें १२
देव म्हणे वत्स गमे प्रेमें परि हा निका महर्षभ रे
समयीं गुरुभक्त मनीं दुर्धर-अरि-हानि-काम हर्ष भरे १३
एकचि सात्यकि आहे कर्णाच्या परिभवास पर्याप्त
करिती साहित्य तुझें चक्रत्रातेहि वीरवेर्याप्त १४
घालिंन गांठि करूं दे आधीं हरिदत्तशक्तिचा वेंच
व्याघ्री नागी कृत्या नशि हरिला शक्रशक्ति चावेंच १५
शक्ति दिली देऊं दे न सूतवधें अयश अर्जु नाकेश
सर्वस्व बुडो न तुझा एकहि हो वक्र अर्जुना केश १६
स्वच्छगुणा तूं ठाउक असशी सुरनायका पुरांरीस
प्राकृत जाणेल कसा बा जाणे काय कापुरा रीसे १७
घालिन गांठि वृषासीं त्याच्या येतांचि समय मरणाचा
मग चिंता कां घेइल पथकर जरि दाससम यम रणाचा १८
सात्यकिला विरथ करिल यूपध्वज हें भविष्य जाणोनी
प्रभु कल्पविला दे निज रथ दूरिल दररवेंचि आणोनी १९
त्या अजितरथीं सात्यकि शक्ररथीं रामभद्रसा वेघे
कर्णाप्रवते बहु उर- गाप्रवते जेविं गरुड कावे घे २०

---

१ वालिवधापासून अतुलयश मिळविलेल्या (कृष्णा) २ वत्सातें, ३ मोवाळेल, ४ पुरेसा, ५ वीरश्रेष्ठ असे सुहृत्, ६ इंद्रदत्तशक्तीचा (वासवीशक्तीचा) ७ खर्च, ८ संपादू, ९ नाक-ईश-इंद्र, १० पुर-अरिस-सदाशिवास, ११ ओस्वल, १२ कुर्ण, १३ सिद्ध करविलेला १४ रामचंद्रासारिखा, १५ चढे, + सात्यकिला.

रक्तें न्हाले झाले योग्य सरवे पुष्पिता[1] पलाशनगा
गंधर्व म्हणति एका राघव एका म्हणा पलाशन[2] गा २१
वृषसात्यकिरणसमर्यीं प्रेक्षकनिकरीं न देहभान वसे
दानवसेनापतिसे गमले कीं देवसे न मानवसे २२
विरथ करूनि पळों दे वृष न करी नैकबाणविद्धांत[3]
मुख्य धनुर्धर कृष्णाऽर्जुन सात्यकि हाचि होय सिद्धांत २३
भीमाऽर्जुनभाग म्हणुनि तव[4]-सुत राधेय मारिले नाहीं
लीलेनेंचि निवटिता दुर्घट नव्हतेंचि माधवा कांहीं २४
भूपरथीं जाउनि वृष सोडी अत्युष्ण[+] दीर्घ श्वासकारें
हळुचि म्हणे हा देवा कां केला तपनसुतहि फुसका[5] रे २५
कृतवर्मा गुरुनंदन इतर महारथहि भांडले सर्व
परि एकेंचि धनुष्यें त्यांचा साराहि सारिला गर्व २६
सात्यकि कुरुकटकाचा पवन घनाचा तसा करि भणाण
पुसतां कसें श्रुत असे आपणचि कृपा पुढें तरि म्हणा ण[7] २७
तों दारुका तुजानें सिद्ध करूनि आणिला स्वरथ राया
प्रभुनें तो केला त्या योग्य न शक्रादिहीं स्वर थरा[8]या २८
माधव चढे नवरथीं आज्ञा दे दारुकास मातलिला
जेविं श्रीराम मथुनि खचरचमूला उदंड मातलि[9]ला २९
सात्यक्यवनयशाचा पांघुरवी देव दारुका सेला

---

१ प्रफुल्लितअशापळसाच्याझाडास, २ पल-अशन-मांसभक्षक-राक्षस, ३ न-एक-बाण-विद्ध-अंत-अनेकबाणानेंविद्धजोत्याचा अंत, ४ तुझापुत्र (दुर्योधन), ५ सात्यकीला, ६ जीबळकटीज्यांतअसावीतइहित असा, ७ कृपापुढें ण म्हणजे कृपाण असें म्हणा, ८ टिकाया, ९ फार माजलीतिला. + अति-उष्ण

प्रभु केविं न तारी जड- ही लावुनि देवदारु कासेला ३०
तैसाचि कर्णहि चढे विधिवत्कल्पित-रथीं विमान-समीं
झाले वि[४]मनस्क सकल तत्वज्ञहि जाहलों विमानेस मी ३१
भीमें वधिले दुर्मुख- मुख तव सुत एकतीस म्यां कथिले
भगदत्त-भीष्ममुख बहु- शत विजयें सात्वतें रणीं मथिले ३२
या बहुलक्षजनाला बा हेतु तुझाचि अपनय मराया
बहु काम कोप लोभचि खर न मळयाग्नि तपन यम राया ३३
अनुजाला भीम म्हणे विरथ करुनि गांजिलें मला कर्णें
तें म्यांचि साहिलें बा आइकता नच दुजा भला कर्णें ३४
तूबरका औदरिका मूढा संग्[+]रामकातरा बाळा
ऐसें पुनः पुन्हा मज वृष वदला अर्जुना असत्काळा ३५
ऐसें म्हणेल त्यातें मारावें तत्क्षणीं न सोसावें
हें त्वांचि मत्प्रतिज्ञा- वच दीनापत्यसेंचि पोसावें ३६
जसि आपुली तसि बुडों दे बुध पंकांत गाय न पराची
गानप[१२]टुसखा समयीं सांवरि तो तान गायन[१३]पराची ३७
नेला वृषाकडे रथ कथितां अवमान हा निज ग[१४]दीशें
सोसावी स्वजनाची केवी नव मानहानि जगदीशें ३८
पार्थ म्हणे ऐक वृषा जय अपजय वासवींहि आदळला
नहुष महाराज मदें इंद्रपदाहुनि न काय गा ढळला ३९

---

१ काष्ठविशेष, २ यथाशास्त्र केलेल्या रथीं, ३ विमानसदृश अशा (रथीं) ४ विरसअंतःकरण असे ५ विमनस्क. ६ सात्यकीनें, ७ दुर्नीति, ८ कानानें, ९ उदरपोषका (अधाशी) १० दुष्टाच्याकाळा, ११ दीन-अपत्य-निराश्रितमूलसें, १२ गायनकुशलमित्र, १३ गायनतत्पराची, १४ गदी-ईश-भीमानें, + संग्रामाविषयीं भ्याड.

आतांच कीं न वधिनां सात्यकिनें सोडिलासि हा नीचा<br>
सत्वर पावसिल फळा केल्या स्कुलज-मान-हानीच्या ४०<br>
बहुदां विरथ करुनि तुज भीम न कांहींच बोलिला खोटें<br>
जो टेंक धरुनि भिडला ज्याचें यश वीरमंडळीं मोटें ४१<br>
करुनि यदृच्छेनें त्या आर्यातें एकदां विरथ अकुळा<br>
उपहासिलें कसें त्वां हांसावें काय बहुलें बकुळा ४२<br>
वधिला सौभद्र तुम्हीं बहु तांहीं मत्तकरिसमानाहीं<br>
कर्में सुदुर्जरें खर- गररसपानाहिपरिस माना हीं ४३<br>
गणिले जेणें वैरी व्याघ्रें विपिनीं विशाळ वृषसेन<br>
तो अभिमन्यु जसा प्रिय मज तुज जो प्रिय नसाचि वृषसेन<br>
कथितों यथार्थ करितों शपथ स्पर्शोनि आयुधा त्यातें<br>
वधिन तुजपुढें दुर्मिळ यश देतां नवहि आयु धात्यातें ४४<br>
आधीं स्रुतशोकास्य प्रेक्षीं मग दूर काय कालास्य<br>
करितील शिवा चुंबुनि तुज भवत्या जेविं बायका लास्य<br>
उरकुनि घे कार्य उचित ठेवाया न वृषसेनजनका जें<br>
आमरण कष्ट न स्फुटति बहु परवश न वृषसेनजनकार्जें<br>
प्रकटे महा प्रतिज्ञा सर्वत्रहि कुरुबळांत झटकरि ती<br>
भट करिती हा हा कीं न करिल निरस देवदैत्य कटक रिती ४८<br>
रवि मावळला वाटे गेला देशांतरीं धरुनि शोक<br>
कोक वरडति न रडतिल तेजस्व्याश्रयलयीं कवण लोक ४९

---

१ आपलेइच्छेनें, २ भीमातें, ३ कुलहीना, ४ बाबळीनें, ५ नामविशेष (कर्णपुत्र) ६ वृषसेनातें, ७ विधीतें, ८ कोल्ह्या, ९ नृत्य, १० हें वृषसेनाच्यापित्या (कर्णा) ११ कार्ययोगानें (जेजनबैलासारखे तें परतंत्र नाहींतअसें नाहीं) १२ तेजस्वी-आश्रय-लय.

जे स्मरव स्मरवमूर्ति बरी देऊनि विजयासि सुपरिरंभातें
नच वरिती ज्ञान-वत्सर शुकवश झाल्याहि उपरि रंभा तें ५०
भगवान् म्हणे प्रिय-सरव्या जीतें तरलासि तूं प्रतिज्ञा ती
इतराला न तरवती झाले गतगर्व संप्रति ज्ञाती ५१
मोठीं मोठींहि बळें लवतिल तुजला न कां बळेंशाला
जरिहि लांबरूंद बळकट होतिल सम काय कांबळे शाला ५२
मज तो तरा दिसेना जो एकाकी धसेल या कटकीं
त्वत्तुल्य त्वदधिकही बहु मेळविले सुयोधनें भट कीं ५३
हें कर्म कराया जरि शक्राचें सैन्य एक कट करितें
होतें भिडतां यासीं सर्पासीं जेविं भेककंटक रितें ५४
हें भुजयुगकौतुक करिल अणिकहि पावेल कर्ण विलयाला
भाट करुनि मज याचा जय याहुनि अधिक वर्णविल याला
पार्थ म्हणे न विसरवे पळ तव पदनीरजाप्रति ज्ञात्या
देवा सुफळा करितें हें करिती धीर ज्या प्रतिज्ञा त्या ५६
केला धन्य त्रिजगीं तुझिया हा वांसवि प्रसादानें
संतानें जन्म सुदु र्गतिचा आवास विप्रसा दानें ५७
तूं ज्याचा नाथ नया जरि जय तरि काय नवल वणव्या
पाला त्या अरिजीवन किति सागर काय नव लवण व्याला
जे त्वच्चरणाश्रित ते गरुडचि शमन-करवाल कालाही
शिर दूर बळें त्याच्या लाविल यम न कर वाले कालाही ५

१उत्कृष्ट आलिंगनातें, २बळवंताला, ३घोंगड्या, ४मंडूकसेना (बेडुकांचा समुदाय), ५कौतुक, ६पार्थाला, ७अर्जुन, ८कल्पवृक्षानें, ९गृह (राहाण्याचें स्थान) १०यमाचा खड्ग, ११कृष्णसर्प १२केशालाही, + त्वत्पादकमल.

झाले कृतार्थ तरले    अगणित या पादपल्लवध्यानें
व्यर्थ फुगविले नगणुनि    तुज जगदीशासि गल्ल वध्यानें    ६०
शत कोटि मिळविले जरि    शतकोटिकरहि सुयोध नव धरणी
वरिलचि तव प्रसादें    धर्मा होइल सुयोधनवध रणीं    ६१
जयहि प्रभावहि तुझा    प्रेष्या-[4]दीनास मानदा[5] मौनें[6]
गौरविसि घेतलें त्वां    बांधुनि दीनासमान दामानें[7]    ६२
प्रभु हास्य करुनि हरुनि    श्रितताप परतवी रथा राया
न शकति जयापुढें खल-    संगति पापरत वीर थोराया[8]    ६३
समरांजिरांत[9] हय करि    नर-वर बहु-लक्ष मारिले होते
जेणें त्यासि मुकुंदें    दाखविले सर्व तारिले हो ते    ६४
स्वकरक्ष समीप जाउनि    जगदीशें पांचजन्य वाजविला
आज विलापें राया    त्वां शोक नसाचि हर्ष माजविला    ६५
धर्म धणी[+] ब्रम्हाच्या    बहु घे घालुनि उडी सुखेंवेंची
यज्ञीनार्थ[11] महाजन    सर्वस्वासह कुडी[12] सुखें वेंची[13]    ६६
धर्में दोघे कृष्णा    प्रेमें आलिंगिले जसे तातें
तत्स्पर्श[14] तन्मनानें    बहु सुखवी जेविं मेघ स्नेनातें    ६७
आनंदाश्रु-परिप्लुत[15]    होय प्रभुचें पुसी वदन पदरें
जेणें रमाधराहुनि    शबरीचीं मानिलीं मधुर बोरें[16]    ६८
मग तें पुशिलें ज्यातें    देखुनि शतदा वदे अचलकन्या[17]

१ गाल, २ वधार्ह- वधासयोग्यजोत्यानें, ३ कज्जधरहि, ४ दासा, ५ मानदेणाऱ्या, ६ मानानें, ७ दोव्यानें, ८ स्थिरव्हाया, ९ समरांगणांत, १० उत्तमआलिंगनाची, ११ यत्-ज्ञान-अर्थ-ज्याच्याज्ञानार्थ, १२ देह, १३ खर्ची, १४ त्याउभयतांचास्पर्श, १५ आनंदाश्रूनेंभरलेलेंअसें, १६ बोरें, १७ पार्वती, + तृप्ति.

पाहे हें पुत्रमुखीं स्त्री जी सर्व स्त्रियांत ती धन्या ६९
मम्मुरिम्हणे बधिला कीं अधम नराकार पाप रासभ जो
ह्माया कृतघ्न विसरुनि तुज न स्वप्नींहि हो परास भजो ७०
येणेंचि सिद्धि कळली जाणति एकेंहि बायका शीतें
सद्यः परमार्थद हे पाय न लाजविति काय काशीतें ७१
बा बाळमीन येतां छायेंत सुखें म्हणेल बक राहो
देइल पाय हरिशिरीं होतां तुमचा प्रसाद बकरा हो ७२
स्वपदीं पांडव बसतिल करुनि अरीतें परासु वास वसे
शिशुपशूहित ह्या लोकीं पदपद्माचा बरा सुवास वसे ७३
शक्रहि जयद्रथातें आजि असा पण करूनि न खपविता
वरिली तव दृष्टीतें वरितें झालेंचि हेंहि नख पविता ७४
कृष्ण म्हणे धर्मा तूं सिद्ध कपिल साचि करुनि सुतपातें
क्षोभविलासि खळांनीं स्वांतार्थ प्राणतुल्य रुतपातें ७५
तुझिया वधिला सैंधव बहु अपराधी म्हणोन कोपानें
सत्पुरुषलंघनें मी कां गरळाची म्हणोनको पानें ७६
त्वत्क्षोभा साहेसें केंचें सामर्थ्य सैंधवीं अस्त्रीं
कल्पीं रविसा पडला इच्छामरणहि नदीज शरतल्पीं ७७
करिल क्षोभ तुझा बा धर्मा उरल्याहि खळजना भसित
हें न चुकेलचि होइल जरि हि शिव घननील जळजनाभ सित

१ गाढव, २ हामी, ३ सिंहशिरीं, ४ दृष्टीनें, ५ वज्रपणा, ६ उत्तम तपातें, ७ अभिमन्युच्या पतनानें, ८ कल्पांतीं, ९ भीष्म, १० भस्म, ११ मेघासारिखा काळा, १२ विष्णू, + खनाशार्थ.

तों नमिति भीम सात्यकि त्या दोघां जेविं नर्मदा[1] यादां[2]
प्रभुची पदयुगली दे कीं जैशी माय शर्म[3] दायादां[4] ७९
तातापरि धर्म प्रभु बहु. त्या क्षतविग्रहांसि[5] कुरवाळी
बोले सत्य मनोहर साधु न अमधुर जसा चिकुर[6] बाळी ८०
आले कुरुबलजलधि- स्थयशोमौक्तिक हरूनि हे मकर
शुभ हो वेष्टावें धन रुचिनीं जेसे वदान्य[7]-हेम-कर ८१
ऐसें प्रेमें गद्गद बोलत आलिंगिले सुचिर दोघे
वाटे भुजंग[8] भोगें[+] वेष्टुनि त्या चंदनासि सुख तो घे ८२
यश भीम माधवांचें वर्णी घे धर्म भाटपण साचें
प्रकटी अंग तयांचें तें कंटक जेविं दाट पणसाचें ८३
मुक्त अजगरापासुनि केला कृष्णेंचि तो जसा नंद
धर्मेहि महाधि[9]पासुनि सोडवितां होय साप्त[10] सानंद[*] ८४
रडला कुरुराज गळां अभिमानें शोक घोर पडला हो
कोण म्हणेल चतुर नर प्रकरें[11] रणीं विजय घोरपड[12] लाहो ८५
हाय म्हणत दुर्योधन जाय द्रोणाकडे म्हणे गुरुजी
पार्थें खरी प्रतिज्ञा केली कीं आजि ती तशी गुरु[13] जी ८६
अक्षौहिणी सितहयें[14] नेल्या कीं सात आठ विलयाला
हे क्षिति जो म्यां केला हा बहुजनघात आठवि लयाला ८७
सुस्तव[15]भाजन हा जन दुःसह धिक्कार यास हा वेना

१ नर्मदानदी, २ जलजंतूस, ३ सुख, ४ पुत्रांस, ५ ज्यांच्या शरीरावर क्षतें पडलीं आहेत अशांस, ६ अविचारी, ७ दानशूर. ८ सर्प. + देहें. ९ मोठी अंतःकरणास होणारी व्यथा, १० सआप्त आपुल्या मित्रासह. *: सआनंद हर्षयुक्त. ११ सुसरी च्या युद्धांत, १२ प्राणिविशेष, १३ मोठी, १४ अर्जुनें, १५ उत्तम स्तुतीचें पात्र.

मारी क्षणांत कीं उप- द्रासा हिक्कोरया सहावेना ८८
केला शरतल्पांगी- कार बळें काळदुर्जयें भीष्में
परिभव वरिला त्यांहीं परसेनासिंधुजीवनग्रीष्में ८९
जरि न करिता उपेक्षा माझी सर्वस्व हानि कां होती
साधूंस मता समता सत्कीर्ति उपेक्षिलीन कां हो ती ९०
प्रिय पार्थ न मी देतां परिभव तिंदो कशास हा याला
द्या मरणाज्ञा अनुचित सुकुळजनिंदा कशा सहायाला ९१
द्रोण म्हणे वागिषुमीं कां मातें पीडितोसि विंधून
वदलों प्रथमचि अर्जुन दुर्जय दुस्तर नव्हेचि सिंधू न+ ९२
करुनि निमित्त शिखंडी भीष्ममहाराज अर्जुनें मथिला
या कर्में उमजावें कीं पार्थ अजय्य मज खरा कथिला ९३
जें देवदनुज दुर्जय॰ देवव्रत-देव पावला पतन
कळलें सर्व बुडालों न करिल ईश्वरहि आपणा जतन ९४
संप्रति झाले पविरवि- सम समरीं पार्थबाण ते फांसे
ज्यां शेवटवरिहि शकुनि- मामा टाळूनि खदखदां हांसे ९५
त्वां कां न ऐकिलें जें विदुर वदे सूक्त अनय न करा तें
तो च्युतचि डोळसान्ध्या जो झिडकारील अनयन करातें ९६
भरतसभेंत सती त्वां आणविली करुनि हानि रीतीची
वृद्धांसमक्ष फरफर फेडविलि दुराग्रहा निरी तीची ९७

---

१ उचकीचा वेग, २ सत्कीर्ती, ३ तीनदां (सर्वदा) ५ वाक्-इषु-वाक्बाणांनीं, + सिंधु-ऊन-सागराहून उणा, ६ सू-उक्त-चांगलें भाषण, ७ आंधळा.

त्याचें हें फळ केलें न सुटे म्हणती सुरर्षिमुख सुकवी
असतें प्रथम सुविकसित परि बहु केला अधर्म सुख सुकेती
जे नित्य पुत्र-धर्मी रत. त्यांचा द्रोह करील बा कोण
ब्राम्हण आपण ऐसें बोलोनि दहांत जो नव्हे द्रोण ९९
होता अश्वत्थामा कृप मद्रप तूं तुझा सखा कर्ण
म्हणसि उडविलें पार्थे शिर बाणें जेविं वाळलें पर्ण १००
मानी कीं तूं श्रितवध कथितां आम्हांस कां न लाजशि रे
द्यूतींच कशी ध्याया विदुरसदुक्तीस कांन लाज शिरे १०१
असतां सजीव सायुध सन्निधसोत्साह शूर सावध रे
राव धरेश्वर बहु शत केला एकेंचि ना कसा वध रे १०२
ज्यापासुनि कनकध्वज रवि-भीष्माचा न कुरुबळीं झळके
जळके नगसे झालों आम्ही अपकीर्तिकज्जलें मळके १०३
भीष्मामागें न दिसे मज कोण्ही जो तरेल उर्वरितें
हीं गंधर्वपुरेंसीं दिसती करकें उगीच उर्वरितें १०४
कुरुबलकलेवरांचा परिपालक भीष्म तो खरा जीव
रविदर्शनेंचि पावे तपतांहि ग्रीष्म तोरव राजीव १०५
स्मरतो मज क्षण क्षण धृष्टद्युम्न स्वमृत्यूच्या हेतु
जलधिविलंघन साधन कपिकृतहि न काय जाहला सेतु १०६
त्यासहि सूचीहि गमे अतिदुःसह न करवाळ वीरा ज्या

१ नारदप्रमुख, २ चांगलेंप्रफुल्लित, ३ वाळवी, ४ अभिमानी; ५ जेव्हांपासून, ६ उरु-अरि-महाशत्रूंनें, ७ उरलेलीं, ८ आनंद, ९ कमल.

जरि वाळवी दवशिखा  तसि न तरुप्रकर वाळवी राजा १०७
तूंहि व्याकुळ करिसी  मज हृदयीं शब्दबाण हाणोनि
यास्तव नृपा प्रतिज्ञा  करितों मी ऐक सत्य जाणोनी १०८
मारुनि पांचाल सकल  मी क्रव्यादांसि मांस वाढीन
करिन खरें स्वकवच  हें आंगांतुनि तरीच काढीन १०९
मज न मत अरिवधें यश  अश्वत्थामा न साधु निकेशनें
हित म्हणुनि जदाहि दिला  अश्वत्था मान सोधुनिकशनें ११०
पुत्राला कळवावा  त्वां माझा भाव हा निरोपांनीं
कीं सर्व-सोमकांची  स्पष्ट करावीच हानि रोपांनीं १११
ब्राम्हण बहु मानावे  तुज वारंवार हाचि उपदेश
कीं ब्रम्हक्षोभें अहि  झाला जो नहुष नाकस्रुपदेश ११२
हा जातों हरिशील  प्रकटुनि घ्याया परा शशाकशील
जा तूंहि कराया जरि  पांडुसुतांचा विनाश शाकशील ११३
गेला पांडव-सृंजय  वीरांचें सर्व तेज हरित रणीं
द्रोण परबळांत गमे  मृगकुळतिमिरांत जेविं हरि तरणी ११४

## अध्याय १६

कुरुपति कर्णासि असें  होउनि सैंधववधें सखेद वदे
देतो ताप परिभव  द्विरदा वेढुनि जसा सरवं दैव दे  १

१ कीरकविशेष, २ अरण्याग्नीचीज्वाला, ३ शक्करी, ५ हटानें, ६ समूहानें, ७ अभिप्राय, ८ पांचाळांची, ९ बाणांनीं, १० स्वर्गस्थानाधिपती असा, ११ सिंह, १२ सूर्य; मृगकुळांतसिंह अथवा अंधकारांत सूर्यसारखे, १३ गजास, १४ वणवा, + अश्वत्थाम्याला.

केला जयद्रथाचा कृष्णसहायें बळेंचि घात पहा
झाला दुःसह अर्जुन शरदर्कांचा प्रताप आतप हा २
हांसतिल सर्व नरि जरि सोसुनि हा दाह वेचुना कोय
नाकास लाविला तो मानधना साहवे चुना काय ३
गुरुनेंचि घात केला व्यूहीं प्रिय शिष्य पार्थ शिरकविला
हें काय बरें असतें वचन जसें रक्षणार्ह शिर कविला ४
गुरु अभय सैंधवा दे द्वारव्यूहीं न दंत कालाही
सदनीं शिरल्यावरि कां रोंविल मर्मीं न दंत कालाही ५
सैंधव पार्था पावुनि जेविं दनुज पाकशासना शमला
जाऊं देता याचा तापविता बा कशास नाश मला ६
कर्ण म्हणे न वद असें करितो आचार्यजनककुत्सा जं
यांसचि पशु म्हणति कवि न जरि पुच्छ विषाण घनककुत साजे
बापा प्रवर्तलासी स्वाहित जाणोनि कां गरा खाया
वृद्ध यथाशक्ति समर करितो नेणोंचि आंग राखाया ८
सामर्थ्यें न विलंघिल कां वृद्धा वाडवा युवा राया
वेगीं टिकेल कैसें मोठेंही झाड वायु वागया ९
अत्यद्भुत रथ सारथि चाप ध्वज तूण कवच अधिकरणीं
ज्या साहित्य असे त्या पार्था न म्हणेल कवण अधिकरणी १०
वृद्ध द्रोण ब्राम्हण वाराया अर्जुनासि अक्षम हा

---

१ शरत्-अर्क-शरदृतूंतील सूर्याचा, २ शरीर, ३ संरक्षण करण्यास योग्य, ४ नत्-भं न कालाही (अर्जुनास) ५ दैत्य, ६ इंद्रास, ७ देशांतरास जाण्याविषयीं जयद्रथास आज्ञा देता तर कशास हा संताप देता असा पार्थ, ८ शिंगें, ९ मोठें कोळें, १० द्रोणाचार्य, ११ ब्राम्हणास, १२ तरुण, + ऊन. * निंदा.

आतां कैंचें तें बळ  तरुणपणीं जरिहि युद्धदक्ष महा ११
सुकरोन्मूलन होइल  पहिल्यापरि काय नगे जरा ज्याला
किंबहुना सावरवे  पहिल्यापरि काय न गजराजाला १२
झालें अनुकूल परां  देतें जय संकटांत वागवितें
भागवितें आम्हांला  स्पष्ट प्रतिकूल दैव नागवितें १३
बल भंगे भंगाथा  पटु जें सर्वांसि वासेविसकट तें
जेसें करिकुल येतां  गंधद्विपदानवास विसकटतें १४
अनुकूल दैव असतां  न समर्थ करावयासि हानि यम
होतां तें प्रतिकूल  प्रबलहि दुर्बलचि होय हा नियम १५
अहि डसविले बुडविला  भीम दिलें उग्र विष मरायातें
जतुगृहदाह घूनहि  झालें दैवेंचि विषम राया तें १६
दृढ चित्त करुनि तूं निज  रणधर्मप्रवण हो मरायास
याहुनि दुसरा सुफलद  आवश्यक कवण होम रायास १
मित्राच्या उपदेशें  सोदर सैंधववधें दुरभिमानी
होय मराया सिद्ध  स्वासाधुप्रकृतिला सुरभि मानी १८
पांडवसेनेसि रथी  कुरुपति सर्व प्रजांसि अंतकसा
अभिमानी आमांचा  साहेल असोनि शक्ति अंत कसा १९
भीष्म घटोत्कच सात्यकि  धर्म यम द्रौपदेय ताडून
केले विद्ध सुपुत्र  द्रुपद विराटादि वीर झाडून २०

---

१ सुकर-उन्मूलन-उपटावयास सुलभ, २ वृक्ष, ३ वृद्धपण, ४ देह, ५ अर्जुनासह वर्तमान, ६ मत्तगजाच्या मदाच्या वास, ७ लाक्षागृहांतील दहन, ८ बंधूसारिखा प्रियजो जयद्रथ त्याच्या वधें करून, ९ आपल्या असाधु प्रकृतिला, १० नकुल सहदेव ११ क्षतयुक्त.

कुरुपति बाणत्रासें मोठे मोठेहि वीर कचकेरती
सेना कांपे याचा धरूनि प्रभुचा जराच वचेक रती ॥ २१

धांवे धर्म क्रोधें लक्षुनि दुर्योधनासि कुपितानें
द्याया तुज जें पावे घननादाचा कुलघ्न कुपिता तें ॥ २२

न गणिति सुरासुरांचे भद्रासन-काम इंद्रसे नानें
ध्वज धनु खंडुनि ताडी भाळीं कुरुराज इंद्रसेनानें ॥ २३

भीमाग्रज सज्ज करुनि नवचाप हतोंसि म्हणुनि शर सोडी
तोडीने-पटु भुजगसा तोडी कुरुराजकवच उर फोडी ॥ २४

मूर्च्छा जसीच सहसा झाली मोठी तसीच हाक रणीं
मेला दुष्ट दुरात्मा करिता झाला असीच हा करणी ॥ २५

तों गुरु धांवे परिसुनि पांचाळांच्या रणांत हाकेला
चित्तीं म्हणे वधें तरि नुत किन्नरचारणांत हा केला ॥ २६

येतांचि द्रोण उठे दुर्योधन सुप्तसर्पसा हरिसा
परि सार्थक काय कसें वांचो देतील पोषिले अरि सो ॥ २७

तो तिष्ठ तिष्ठ ऐसें म्हणत रणतमीं करावया धावे
पांचाळ सकळ उठले कीं धर्मा शत्रुशर न बाधावे ॥ २८

पांचाळांवरि सहसा सरसावे द्रोण कुरुप राखाया
कीं गुरुसमक्ष असतां काळहि न शकेल गुरुपरा खाया ॥ २९

उठली आचार्यावरि सारीही एकदांचि अरिसेना

---

१ मागेंसरति, २ शिवाश्वा, ३ भय, ४ कामपत्नी, ५ रागिटास, ६ देवदैत्यांचे अधिपती, ७ धर्माच्यासारथ्यातें, ८ हता असि, ९ उद्धाणकरण्याविषयीं कुशल असा, १० स्तुत, ११ सहा (कामक्रोधादि शत्रु) १२ उभा रहा, १३ दुर्योधन, १४ गुरुत्रास,
+ तें दुःख (इंद्रजिताच्या मरणानें जें दुःख रावणाला झालें तें) तुझ्या मामळ्यांचें अथा भावार्थ.

सात्वत म्हणे यदुकुळीं अरिपासूनि कोण सांग गा ज्याला
यादवशक्ति परला कदलीच्या जेविं सांगे गर्भ्याला ५०
तुजचि सपुत्रास रणीं शस्त्रविनें आज मी विनाशपथ
अनुचित कृष्णा-पद-शपथ परि न दिसे मारितां विना शपथ ५१
तंडायाचीच तुला युद्धांत असेल जरि सवे तंड
परि मज दिसतोसि नरा कौरव्या जेविं हरिस वेतंड ५२
रक्षिति बहु बल घेउनि दुर्योधन शकुनि सोमदत्तातें
रक्षी धृष्टद्युम्नहि सात्यकिते परमयुद्धमत्तातें ५३
प्रथम नवशरांहीं तो सात्यकिला सोमदत्त बा वेधी
कौरव्याची सात्वत- नवबाणांहींच मोह पावे धी ५४
तो सोमदत्त मूर्च्छित पडतांचि पळांत पळविला सूतें
सात्यकिवरि गुरु धांवे बहु चळचळ कांपवीत रणभूतें ५५
द्रोणावरि धर्म उठे घेउनि अमित स्वकार्यघटक बळ
तेव्हां गुरु-शरगणघट- कर्णें गिळिले अनेक-भट-कबळ ५६
पडली दृष्टि जयावरि त्या कौरव-सर्वसैन्य-पाळाची
पडलीच उडी त्यावरि तद्बाणगणा-समेत काळाची ५७
केले द्रोणें बहु भट गरुडानें नेकसर्पसे नाहीं
स्वीकारिलें पलायन धर्माच्या त्यजुनि दर्प सेनांहीं ५८
पार्थ म्हणे पळत्यांतुनि ने माझा क्षिप्र हा रथ बकारे
म्हण करितों गुरुसि तुम्हा ठेउनि साक्षी प्रहार थबकारे ५९

---

१ शस्त्रविहीन, २ गर्भाला, ३ शूरवीर, ४ वाग्वाद करण्याची, ५ सदय, ६ गज, ७ द्रोणशरसमूह हाच कुंभकर्ण त्यानें, ८ अनेक योद्ध्यांचे ग्रास, ९ अनेक सर्परें, १० हांकणारा, ११ उभेरहा.

विजयोक्तें विजयाचा रथ चालविला जसा विशोकानें
भीमोक्तें भीमाचा चालविला रथ तसा विशोकानें ६०
सेना सर्व मिळाल्या धांवुनि अत्यंतशीघ्र दोघांतें
जेशा नदींनी गंगा- यमुनांच्या श्रावणांत ओघांतें ६१
उत्तर[4]-पार्श्वीं भीमें दक्षिणपार्श्वीं सुधांशोसित-वाहें
कुरुकटक घेतलें बा दावयुग गजा तसेंचि कितवा हें ६२
कुरुसेनेनें ग्रासिति ते दोघे दाव जेविं अटवीतें[6]
किंवा श्रीमद्गीता- सप्तशती-मंत्र-पाठ सटवीतें ६३
धांवे प्रायगत-वध- प्रकुपित गुरुपुत्र सात्वतावरि तों
त्यावरि उठे घटोत्कच खचर म्हणे यासि आनतीं परितों ६४
अक्षौहिणि[8]मित तद्भट लोपविते प्रलय-नीरद-रवा जे
दरवाजे काळाचे बा अरिचा ज्यापुढें न दे रवा जे ६५
लोहमय अष्टचक्र त्रिंशन्नल्व[11]प्रमाण रथ मोटा
जो ऋक्षचर्म-परिवृत[12] ज्यांत नसे शस्त्रसंग्रहीं तोटा ६६
त्याचे वाहकें[13] गजसे परि जातीनें नव्हेत गज वाजी
क्षण ज्यांपुढें गगनमणि- रथ-तुरगाच्या नव्हे तग जवाजी ६७
एवं भयंकररथीं पाहुनि रात्रीं रणांत उग्रास
भ्याले कौरव गमले ते त्यां काळापुढील कग्रास ६८

---

१ शोकरहितानें, २ विशोकनामाजोसारथीत्यानें, ३ तथा, ४ डाव्याबाजूस, ५ अर्जुनानें, ६ अरण्यातें, ७ प्रायोपवेशनास बसलेला जो भूरिश्रवा त्याच्या वधानें प्रकुपित, ८ गज २१८७०, रथ २१८७०, घोडे, ६५६१०, पायदळ, १०९३५०, हीं गजादिसंख्या एकत्र झाली असतां त्यास अक्षौहिणी म्हणतात, ९ प्रळयकाळच्या मेघांच्या गर्जनांस, १० शंख, ११ चारशें हात लांबीचें प्रमाण, १२ अस्वलचर्मानें वेष्टित, १३ घोडे.

कटकीं होते वाजी वारण जे काय बहु मदें उतले
ते त्यांपुढें न तगले हगले तात्काळ गर्जतां मुतले ६९
द्रौणि घटोत्कच दोघे न धरिति ते युद्धसमरस त्रास
आरंभिति जोडाया यश लोकीं युद्ध समर[1]-सत्रास ७०
संध्याधिक-बळ राक्षस ते जैसे धूमयोनि करकांहीं
बहु वर्षले शिळांहीं बा वदवेनाचि तो निकर कांहीं ७१
केलें पलायनमनीं धरिला संकोचन तव तन यांहीं
संपादिलें न नाकीं होउनि धर्मासि नत वतन यांहीं ७२
किं बहुना कर्णहि त्या खचर-त्रासें पलायन करी हो
गंधद्विपगंधानें पंगेचि महाबलायन केरी हो ७३
त्या राक्षसासि एक द्रौणि न भी होय रामसा मान्य
केलें घटोत्कच-तनय- मर्दन हें काय काम सामान्य ७४
तो अंजनपर्वाभिध बा अन्य नसा न वीर मायावी
योधीं तद्वधकीर्ति न जेविं समुद्रीं नवी रमा यावी ७५
अंजनपर्वा याचा घननाद जसा दशाननाचा हो
द्रौणिस भीमसूत म्हणे जोडुनि शिशुवध यश न नाचा हे
झालाचि आजि वृद्धा त्या द्रोणा ब्राम्हणासि शोकद हो
यां गुरुधर्म-हितकरा परि म्हणतिल धन्य धन्य लोक दहा ७
द्रोणि म्हणे वत्सा जा इतरांसीं अमरविक्रमा भीड
पुत्रें पिता कदापि न पीडावा सोडुनि क्षमा भीड ७८

---

१ समररूपत्रास, २ मेघ, ३ हस्ती, ४ नामविशेष (घटोत्कचपुत्र) ५ घटोत्कच, ६ शोकदेणारा, ७ अंजनपर्व्यास, ८ गंधघाल, + महाबलाचें स्थान.॥ गाढवी.

न तुझ्या गर्यी माझा रोष असे सर्वदाहि अनुरोग
परि येतां तापवितो व्यापुनि बाहेर आंत तनु राग ७९
नसतो विवेक कांहीं बा घडतो आत्मघातही कुपिंता
सुपिताहि क्रोधाच्या आवेशें करुनि होतसे कुपितो ८०
रात्रिचर म्हणे द्रोणे न पृथक्जनसा रणांत कातर हा
भीमसुत म्हणायाचा शक्राहि उगीच कीर्ति गात रहा ८१
जे समरीं अनिवर्ती पांडव त्यांचा कुमार हा वढिल
आणिल मनांत तरि यम कासरचर्मे स्वदुंदुभी मढिल ८२
असता तरि म्हणता मज पाहुनि रक्षोधिपाशि रावण हा
घंटकर्णाच्या करिता निजचरणप्रणमनें शिरा वणं हा ८३
कठिण रणश्रद्धा-व्रत हें सत्य मनांत चिंतित उजीव
जाणें आयुष्यातें सलिल शरीरा निजा तिलंड जीव ८४
दापी असें दरवडा सार्थाच्या जेविं अक्षमा आल्या
सोडी ज्याज्या बाणा छेदीच द्रौणि अक्षमात्रा त्या ८५
होउनि गुप्त घटोत्कच मायेनें होय तो ग्वरा शिरवरी
वाटे निर्जोंकि करितो घाया स्वजनासि तोग्वरोशि ग्वरी ८६
वर्णूं तो कज्जल-सरव शस्त्र-प्रस्रवण काय पर्वत मी
त्या अतिभयंकरानें वीर बुडविले पळांत सर्व तमी ८७
अतिवर्षी बहुवसे बहु आम्हीं आरडों गरल यातें
नमितें नेता कुरुबल घाला तो आरडोंगर लयातें ८८

१ भीति, २ क्रोध, ३ दुष्टपिता, ४ पामरलोकांसारिखा, ५ भयचकित, ६ माघारांफिरणारे न्हवत असे, ७ ज्येष्ठ, ८ राक्षसाधिपास, ९ घट्टा, १० चाळण, ११ अ[illegible] भक्षा, १२ पर्वत, १३ हर्षातिशय, १४ शस्त्रें प्रसवणारा. + गांगट

भ्याला तो मायानग गुरुनंदन-मुक्तशार-निकर-पविला
त्या ब्राम्हण-प्रताप- ज्वलनें खलपलभुगम करपविला ८९
मग होय नीलतोयद सोडी असि-शूल-शर-गदा-धारा
गेलों शरण गुरुस्रुता सर्व जसे गोप त्या सदाधारा ९०
तो नीलमेघ गुरुस्रुत- योजितवातास्त्र सायकें वितुळे
स्रुरभीच्या सायेसीं यम-महिषीचीहि सायकेविं तुळे ९१
घटजें सिंधूदरसें केलें जीवन हरूनि कटक रितें
नातरि घटोत्कचाचें तें बळ आम्हा पळांत गट करितें ९२
जरि शतसहस्त्र मथिले बहु राक्षस धांवले तरि नवेच
द्रौणि म्हणे न नृपा भी मी यांचा निश्चयें करिन वेंच ९३
कुरुप म्हणे मिरविन या कंठीं तव कीर्ति-रत्नहारा मी
संप्रति तुझ्या भुजीं बा होता पूर्वीं प्रयत्न हा रामीं ९४
रामीं सीतासी दे राहो धर्मींहि न महि सोमा जो
त्या नृप म्हणे तुजपुढें अहितांचा आजि न महिमा माजो ९५
साठसहस्त्र स्यंदन निज लक्ष तुरग मथावया अरि घे
रीघेंचि पांडवकटकीं ग्रीष्मीं कक्षांत जेविं दाव रिघे ९६
षट्युतपत्तिसमेत रुक्माहित्यासि कर्ण पाठवितो
आठविन पराचें अस्र- हरण वस्त्रहरण जसेंचि आठवितो ९७

---

१ खल-पल भुक्-अगम- दुष्टराक्षसरूपीपर्वत (घटोत्कच) २ शास्त्ररूपधारा, ३ सत्-आधार- साधूंसआधारभूत् अशा (श्रीकृष्णाला) ४ तुलनापावेल, ५ अगस्तीनें, ६ सिंधू-उदर, ७ खर्च, ८ पृथ्वी, ९ शकुनिमामा, १० प्रवेशकरच, ११ गवतांत, १२ षट्-अयुत-पत्ति- समेत- साठहजारपत्तींनींयुक्त (पत्तिचेंलक्षण
श्लोक- एकोगजोरथश्चैकोनराःपंचपदातयः त्रयश्चतुरगास्तज्ज्ञैःपत्तिरित्यभिधीयते १
०अर्थ- १ हत्ती, १ रथ, ५ मनुष्यें, ३ घोडे, मिळोनएकपत्तिजाणावी.

द्रोणि-शरांहीं व्याकुळ करितांचि युधिष्ठिरादि-मदशींतें
मारुनि द्यावें सयश मद्धित-निरतें तुवांचि पदरीं तें ९८
गेला धर्मवधा जो हेतु नृपा या इलादि-लोभाचा
जेणें कुबुद्धि कृत्या जी हे रचाया इला दिला भाचा ९९
राक्षेस दश-बाणांनीं विकल करुनि गुरुसुतासि धनु तोडी
द्रोणि नवें धनु घेउनि त्याला जलदासि वातसा झोडी १००
त्रिपुराला रुद्र जसा खचरबळाला तसाचि तो भाजी
जीच स्मरांत हराची याची आम्हांत तीच शोभा जी १०१
स्वबल-विनाश-क्षोभें भीमसुतें रुद्रनिर्मिता अशनी
पाठविली द्रोणिप्रति जी कृत्या दर्शितारिच्या अशनीं १०२
उग्रत्वमदें जीसीं करिल क्षणमात्रही न वाद शनी
तें दाहकत्व न दवीं तक्षकभुजगाचिया न वा दशनीं १०३
ऐशीतेंहि धरी बा तो द्विजवर गरुड जेविं भुजगीतें
ख्यात जगीं स्वयशाच्या त्याचे हरबाहु तेविं भुज गीतें १०४
गुरुपुत्रें खचरावरि तीच अशनि योजिली महावेगा
फिरल्या कृत्येसि तसें तीस न त्या राक्षसा पहावे गा १०५
घाली उडी तळीं तो राक्षस जों तों पडे रथावरि ती
झाली सगरसुतगणीं कपिलाची दृक् जसें तसें करिती १०६
देखुनि जाणत होते अशनीची ख्याति लटिक बरि कवि जे
ते वदले न सखी तूं ईची होसील बटिक बरिक विजे १०७

१मनु-हित-निरत ,२पृथिव्यादिलाभाचा,३घटोत्कच,४अजी (धृतराष्ट्रा) ५ भक्षणीं,
६दातांत,७ कपिलमहामुनीची,८ हे विद्युल्लते.

अज्ञानी क्षितींत शिरली    सूताश्वासह रथासि जाळून
धृष्टद्युम्नरथीं तो    राक्षस बसला स्व-मृत्यु टाळून १०८
विजयश्री पांचाळा    तेसीच निशाचरा गमे घरची
कीं ते शरवृष्टीतें    तेविं उदक वृष्टितें न मेघ[1] रची १०९
गुरुपुत्रें त्या त्या बहु-    कांपविलें जेविं नीर[2]दा वातें
द्विजबळ परप्रतापा    त्या जैसें होय नीर दावातें[3] ११०
तेथें बहु बळ घेउनि    रुत माहित्यासि भीम ये राजा
मुख्या सबळ-त्वत्सुत- हानि हर-मख क्रियाहि येरा ज्यां[4] १११
गुरुसुत वधी घटोत्कच-    भीमार्जुन यां समस्त योतूंतें
बा तत्वतः स्वपर-बल    जें पाठविलें यमक्षया[6] तूं तें ११२
तो विष्णुजिष्णु-देखत    खचरां[5] सकळांहि लोळवि मखरा
वाटे निपट खवळला    प्रळयाग्नीचाचि लोळ विप्र खरा ११३
जाणों हरचि म्हणे हूं    घे बहु फटकाळ कूट हा निकर
कीं हें तेविं खचर-बळ    जेविं निपट काळकूट हानिकर ११४
मारुनि रात्रिंचर-कटक    रुधिर-नदी खळखळाट वाहविली
चळवळ घटोत्कचाची    मर्मीं वेधुनि मुहूर्त राहविली ११५
नाराचानीं पांडव    धृष्टद्युम्ना-समेत सडकून
द्रुपदसुत शरें केला    भस्म दवें जेविं शलभ धडकून[8] ११६
मारुनि त्या सुरथाचे    बहुसुत शत्रुंजयादि झाडून
द्रोणात्मजें[7] श्रुताव्हय-[9]    राजा तेंहि क्षणांत पाडून ११७

---

१ मेघास, २ पाणी, ३ दावानळातें, ४ ज्यास (भीमास), ५ राक्षसांतें, ६ यमगृहास, ७ अश्वत्थामा, ८ पेटून, ९ श्रुतनामक.

पुनरपि यमदंडोपम बाणातें परम तूर्ण सोडून
मूर्च्छित रणीं घटोत्कच केला तत्काळ हृदय फोडून ११८
धृष्टद्युम्न पळनि करि पडतां तो शूर पळ विलापाला
वात्येनें दव-दहना - पुढुनि गमे दूर पळविला पाला ११९
होते युधिष्ठिराच्या कटकीं भीमादि वीर्य-सागर जे
त्यांतें भंगुनि गुरुसुत मोडुनि मत्तेभ सिंहसा गरजे १२०

---

## अध्याय. १७

मारुति पार्षत सात्यकि धर्मादिक वीर विप्र-भावातें
मानवले ग्रहवृंदीं बहु जेविं कवी रविप्रभावातें १
जरि सर्वांगीं केले होते गुरुपुत्र-शरशतें विद्ध
तरि धर्म भीम सात्वत पार्षत युद्धासि जाहले सिद्ध २
पुनरपि बहु युद्ध करी सात्यकिला सोमदत्त माराया
कीं फार खवळला सुत- शोकें तो भरतसत्तमा राया ३
मागें पदहि न येतां सात्यकि शर भीमसेन-परिघ सरे
बसतां उरीं शिरीं ते धैर्यापासूनि धीर परि घसरे ४
बाल्हीक वृद्ध परि बहु- मानी साहेल कां पतन योचें
कांपे कोपें तोंतों जोंजों धरि देह कांप तनयाचें ५
तो काळवर्षि-घनसा सात्यकिवरि तीव्र विशिख वृष्टि करी

---

१ काळदंडासारख्या, २ बाहुटखान, ३ मुलाचें.

भीमालाहि न मानी जेसा हरिला मदांध-दृष्टि केरी
शक्तीतें भीमाच्या वज्रसमोरींहि होय शिरकविता
ती त्याचें कांपवि जसि आपुनि नेभ्रांसि तोये शिर कविता
दृढ हि महाप्रतापी बा नव्हता तो मनुष्यदेव ढिला
त्या भीम गदेनेंचि स्वर्गति न धरुनि धनुष्य दे वढिलो
मस्तक बाल्हीक-महा - राजाचें पांडुसूनु चेंडु करी
न करिल अपत्य-मुख किंट - सम पोषुनि पंकिलें कचें डुकरी
तंव नागदत्त दृढरथ इत्यादि तनूज धांवले दश गा
यश गा तूं परि गमले ते त्या भीमा हरीपुढें शश गा १
मेले ज्या धरुनि खचर- पतिचे त्या नव कुमारदश लीला
लाजविति पृथापुत्र स्वयशें जेसा अमारद शशीला १
भीमानें नव दशसुत दश:बाणांनींच जेविं बा वधिले
पांचांनीं पांच शकुनि- बंधुहि जे शत-महारथां मधिले १
धर्महि बहुकुरुकटक- क्षय करित क्रुद्ध-काळसा स्फटला
तुटला मर्यादावधि कल्पांतीं नीरनिधि जसा फुटला १३
त्यावरि नृपोक्तिनें गुरु कन्येनें जेविं काशिराजाच्या
पाळविला भीष्मावरि अभय- वर दिला निका गिरा ज्याच्या
वायव्य अस्त्र वारुण याम्यहि आग्नेय ऐंद्र गुरु योजी
त्या त्यातें प्रत्यस्त्रें हरुनि म्हणे धर्म अन्यही यो जी १५
ब्रम्हास्त्रानें योजी तो ब्रम्हास्त्रेंचि करुनि विभ्रम या

१ गज, २ वज्रासारख्या कठिनउरांतही, ३ उदक, ४ राजा, ५ वडिलाला, ६ किटलेलें, काळे
७ केशानें, ८ पुत्र, ९ पार्वतीचादंत, १० समुद्र, ११ येवो, + अगाराया.

गर्जे युधिष्ठिर प्रभु   समरीं न धरीच लेश विप्र-भया १६
मग सावित्र त्वाष्ट्र   प्राजापत्यप्रयोग जो केला
त्यानेंही प्रत्यस्त्रें   शमवुनि निष्कंप नृप पुढें ठेला १७
सैनिक-मुख्य स्तविते   झाले गुरुनें तसेचि शिष्यातें
दे ताप तव रुतातें   तो धर्मोत्कर्ष जेविं तिष्यातें १८
गुरु धर्मातें सांडुनि   पांचाळांचेंचि बहुत कदन करी
ते त्यापुढें न मिरविति   गर्व हरिसमक्ष जेविं मद न करी १९
जेसें पांचाळ-कटक-   कदन कलशीसंभवें स्वयें केलें
तैसेंचि कौरवांचें   बळ भीमें अर्जुनें लया नेलें २०
भीमार्जुन शर-निकरें   तिमिरें निद्राभरेंहि मोहातें
पावे भंगे तव बळ   मरणा-आसें म्हणे नमो हातें २१
गुरु-नृप-वचेंहि कुरु बळ   जेविं पवनच्युत अभ्र मुरडेना
सेना किति पति-रक्षा-   क्षम होतां काय अभ्रमु रडेना २२
कुरुपति कर्णासि म्हणे   नाशोंदेतोसि काय गा यश तें
वेढिलि चमू परबळें   जेविं वृकांच्या वनांत गाय शतें २३
दुर्लभ यशःप्रद समय   हा न वृथा मित्रवत्सला जावा
सन्मैत्रीच्या कासे   लागलिया सुरभि-वत्स लाजावा २४
कर्ण म्हणे शक्ति असे   कृष्णा धरिवला स्थला विलापार्थ
जिंकिन रक्षाया जरि   येइल वज्री बलाविला पार्थ २५
देतों तुज जय मारुनि   विजयास अमोघ-शक्तिनें आजि

१ धर्मराजाचा अथवा धर्मकृत्याचा उत्कर्ष, २ कलियुगानें, ३ गज, ४ द्रोणानें, ५ हस्तानें, ६ वातप्रेरित, ७ ऐरावताची स्त्री.

करितों तसीच केली जशि महिष-वधार्थ शक्तिनें आजि २६
अर्जुन मरतां होतिल वश्य तुला दीन होउनि अवशेय
किंवा पुन्हा वनाला जातिल पांडव जटाधर अवश्य २७
असतां कर्ण व्याकुळ कां स्वस्थ त्यजुनि तूं विषाद रहा
पांडव-बळ किति न धरिल पीतांहि हळाहळा विषा हरें हो २८
मज हरिपुढें टिकेल न पळही पांचाळ वाहिनी कुतरी
शिरतां बुडेल मद्बळ- जलधींत समग्र यदु-चमू कुतरी २९
देतां तुलाचि भजतिल पळही पर मानदा न वसुधेतें
बा पावले करुनिही कष्टा परमा न दानव सुधेतें ३०
हसुनि कृप म्हणे कर्णा तूं नाथ म्हणुनि सनाथ हा राजा
तव शब्दचि तेजस्वी तूं यासिच म्हण करा प्रहारा जा ३१
करिसी असें विकत्थन परि न पराक्रम दिसे न फळ कांहीं
तव निटिलीं न विजयलिपि वरिली पांडव-ललाट-फलकांहीं ३२
तेते भंगद झाले पांडु-सुतासीं रणीं समागम जे
जीभ तुझी नृपतिपुढें करिती बहु नववधूसमा गमजे ३३
गंधर्वे प्रभु धरिला तेव्हां आधींच कीं पळालास
तें पाप क्षाळाया तूं दवदहनीं न कां जळालास ३४
कर्णा उगेचि कर्ण- प्रिय बोल वदो नकोच कीरा हे
उचित न वीरास तुझी त्या गोग्रहणीं न कोचकी राहे ३५
जरि कळलें एकाही पार्थाचें तेज नावरींयाचें

१ संग्राम, २ वश्य व्हावयाचे नव्हनते, ३ भय, ४ कर्ण, ५ भग्ननौका, ६ बडबड, ७ कपाळीं, ८ दुर्योधन, ९ पोपटा, १० नआवरायाचें.

तरि सर्व वधिन म्हणासी   बुडवीसिल तेज नांव रायाचें   ३६
शूर भुजांनीं क्षत्रिय   शब्दानीं विप्र पार्थ चापानें
केवळ मनोरथानीं   कर्णा तूं शूर न प्रतापानें   ३७
व्यर्थचि गर्जन करितें   तव मुख हें जेविं शारदाभ्र[1] महा
वाटे अनर्थक बहुत   बडबडसी जें पिशोरद्रा[2] क्रम हा   ३८
अर्जुन वर्जुन गर्जुन   अर्जुन[3] घे क्षण उगेंच थोरपण
जिंकिन बृहस्पति म्हणुनि   करिलचि वा[4]चाट चोट पोर पण ३९
तदधिक कवण स्फुरविला   हर जेणें करुनि अति- समर- यज्ञ
केंचा श्रेष्ठ मग खग   त्रिजगींहि न पक्षि[6]पति-सम खयज्ञ ४०
त्या कृष्णसारथिपुढें   होशिल मूक न जरी[9]क बकें[10]शील
कीं गरुडशील तो[11] तूं   सूता केवळ व[12]राक बकें[13]शील   ४१
कर्ण म्हणे घन गर्जति   समयीं तैसेंचि सर्व योध रणीं
करणी करुनि दाविति   म्हणती ते फलद पर्व यो धरणी ४२
उत्साहें वीरांहीं   करुनि वि[14]कत्थन यथेष्ट गर्जावें
फल न दिसतां बुधांहीं   काय प्रारब्धकर्म वर्जावें   ४३
द्रवतेंचि दैव असतां   निश्चय नसतां मनांत निर्वेद[15]
तूं द्विज आम्हांत तसा   जैसा वैदिकजनांत निर्वेद[16]   ४४
दैवें न पावलें रण-   रंगीं बहु-बळहि काय नास नसे
त्यां पांडव वधिले तरि   यांत तुझें सांग काय नासतसे   ४५

---

१ शरदृतूंतीलमेघ, २ब्राह्मण्यास,३ संपादून, ४ वा चाळ, ५ ठकविणारें, ६ पक्षी, ७ गरुडतुल्य, ८ वेगवान्, ९अत्यहि, १० बडबडशील, ११अर्जुन रूपाशिसदृश, १४जल्पन, १५ कंटाळा, १६ वेदाध्ययनहीन.

न वृथा गर्जति शारद- वारिदसे रणमखांत शूरवर
विप्रा कृपा पहावें ऐसें दवडूनि दृष्टि दूरवर ४६
गर्जति पंडित निज बळ समजुनि तूं वदसि न समजोनीच
वीरा शयासि वीरचि समजे नुमजेचि न समजो नीच ४७
मी मारिन कृष्णार्जुन ऐसा उत्साह मानसीं धरितों
म्हणुनि द्विपयूथपवध- कामुक हरिसाच गर्जना करितों ४८
सानुग सकृष्ण पांडव मारुनि देइन सुयोधना वसुधा
हें गर्जन-फळ पाहें म्हणतिल माझें सुयोध नांव सुधा ४९
गौतम म्हणे तुझे हे न ग्राह्य मनोरथ-प्रलाप मला
गमला कृष्ण प्राकृत धर्महि ज्या स्पष्ट तो पशु प्रमला ५०
कृष्णाश्रितांसि सकळें कल्याणें करुनि देवसे समज
श्रीसी म्हणे जयश्री काय वरिल म्हणुनि देव सेसे मज ५१
श्रीकृष्णार्जुन जेथें तेथें सादर सदैव जय नांदे
राजर्षिधर्म विस्मय देवर्षि-महर्षि-योगि-नयनां दे ५२
भीम नकुळ सहदेव ख्यात सकळ साधु-शूरजन-महित
यांचे संबंधीही शक्रसम द्रुपद-मत्स्यपति-सहित ५३
त्यांतें जिंकाया तूं बहु हुदहुदलासि योग्य अनय न हा
लावूनि सनयनासीं स्पर्धा न म्हणेल काय अनयन हा ५४
कर्ण म्हणे जरि पांडव दुर्जय तरि शक्र-दत्त-शक्तीनें
अर्जुन वधिन न मथिला तो काय तसाहि मत्त शक्तीनें ५५

१ पृथ्वी, २ कृप, ३ कुंकुमाक्षतांचा कपाळीं लेप करितात ती सेस, ४ उत्कंठित झाला स, ५ अंध, ६ हायहाय असा शब्द, ७ महिषासुर.

त्याविण कृष्ण युधिष्ठिर तदनुज सुसमर्थ हि तरि पोकळ तो
न कुरूत्कर्ष तुज रुचे आशय शब्देंचि हितैरिपो कळतो ५६
न रणा तूं योग्य म्हणुनि हा केशवसारथे रडायास
काय भिवविशिल देउनि हा केशवसार घेरडा यास ५७
अप्रिय वदसिल पुनरपि तरि खड्गें करूनि जीभ कापीन
सुकृतचि हें कीं कोण्ही निंदकसा त्रिभुवनांत पापी न ५८
दैवचि कारण भीष्म- प्रमुख-महावीर-देह-पतनाचें
अधमा कृपा नृपाच्या होउनि अहित-स्तवीं न रत नाचें ५९
अश्वत्थामा धांवे कर्णावरि दिव्य खड्ग उपसून
तक्षक जेविं डसाया मर्मीं दंष्ट्रा ससूळ खुपसून ६०
त्यासि म्हणे यो सिंहा बोलावे बोल हे तुवां कोल्या
मारुतिशिं माकडानें दाखविल्या स्वांतहेतु वांकोल्या ६१
वदतां प्रभुपांडवगुण ईश्वरसम वेदसमहि मामातें
निंदिशि सत्पुरुषाचा दुष्टा दूषूनि न महिमा मातें ६२
केला जयद्रथाचा जिंकुनि तुज अर्जुनें वध मघासीं
सन्मान्य तो गणावा दशदर्शी सूत तूं अधम घासीं ६३
युद्ध हरासीं केलें त्वां आयकिलें न काय मत्ता तें
तूं मारिशील त्याला न अतिक्रमिलें जयासि मत्तातें ६४
जें जय जागे त्याचा न ज्ञातांशहि तुज कळे वराकास
घालिसि भस्म कराया पार्थशरें निज कलेवरा कास ६५

१ हितशत्रो, २ जिभेचें छेदन, ३ अश्वत्थाम्याला. ४ स्व-अंत-हेतु आपल्यामरणासकारण अशा, ५ कृपातें, ६ तृणीं, ७ मत्-तात-माझ्यापित्यानें द्रोणानें. ८ अर्जुन, ९ नीचास.
+ कुरु-उत्कर्ष- कौरवांचीवृद्धी,

हिन कथिल्या आम्हाची नीचा म्हणतोसि जीम कापीन
तरि वधिन तुला देइल विष-कामा स्तुरभिचेंहि ओपीन ६६
हा उडवितों तुझी मी बकऱ्याची जेविं शीघ्रतर मुंडी
ऐसें बोलुनि देता- झाला गुरुपुत्र शीघ्र तरमुंडी ६७
हा हां म्हणे सक्रेप कृप नृप कृपण जसें धना तसें धरि त्या
कीं गतसारा सरिता तेविं पडाव्या स्ववाहिनी न रित्या ६८
कर्ण म्हणे सोड नृपा योग्यचि हा होय शास्त्रा सत्य
द्विज-मद-गद शमवु सखा जोडुनि या हो यशास नासत्य ६९
द्रौणि म्हणे कुमति तुला तैसी आम्हासि न क्षमा सोडी
मोडील अर्जुन तुझ्या दक्षाच्या वीरभद्रसा खोडी ७०
भूप म्हणे गुरुपुत्रा क्रोध त्यजुनि प्रसन्न हो पावें
सर्वांहीं एकमतें जोडुनि यश मज तुम्हींच ओपावें ७१
कृपहि विनवितां होउनि मृदु कर्णाला[९] म्हणे तुझा गर्व
सर्व श्वेताश्व हरिल त्या खलरतिजानिचा जसा शर्व[१०] ७२
द्रौणि कृपांतें जोडुनि कर जों यत्नें नरेंद्र समजावी
तों ये युधिष्ठिर-चमू जी लंघुनि सिंधु कीर्तिसम जावी ७३
कर्ण पुढें होय तया पाहुनि ते वीर म्हणति या कलहा
जो हेतु नीच दुर्मति दुर्जन दुर्योधनास तो खल हा[११] ७४
मारा घ्या कोठें हा पाडा तोडूनि हूं करा चूर्ण

१ कास, २ मुसांडी, ३ सदय, ४ निर्जला, ५ अश्वत्थाम्याचागर्वरूपरोग, ६ कर्ण, ७ अश्विनीकुमार, ८ नामविशेष (शिवाच्याजटेपासूनउत्पन्नझालेला) ९ दुष्टमदभावा, १० शिव, ११ कर्ण,

ऐसें गर्जुनि पांडव  सृंजय पांचाळ धांवले तूर्ण ७५
त्यां सर्वांसहि ताडुनि  भग्न करी जेविं वात मेघास
त्या काळमुखीं पडला  पांडवभटसंघ तो गमे घास ७६
अर्जुन धांवे कोपें  रोपें त्यांच्याहि तो करा ताडी
ताडी करूनि विकळा  पळभरि गांडीव चापही पाडी ७७
धरि कोप अजितसारथि  वारे आतांच नागविल याला
गरुडातिक्रम करितां  पावेल कसा न नाग विलयाला ७८
झालें नसोंचि राया  केला विरथ क्षणांत तो मौनी
त्यजिला असतांचि करुनि  नदवेनपण शक्र-सूर्य-सोमानीं ७
कर्ण कृपरथीं चढला  पार्थापासूनि फार तो भ्याला
कीं त्यासि यशाहुनि बहु-  मत जीवित जेविं वित्त लोभ्याला ८०
धांवे धनंजयावरि  दुर्योधन मित्र-परिभव-क्षोभें
तों कृप भाच्याशि म्हणे  प्रभुला रक्षूनि सद्यशें शोभें ८१
आटोपुनि गुरु-पुत्र  प्रभुसि म्हणे ऐक पविकवचन रहा
विजया पुढें म्हणेलचि  अंगीं घालुनिहि पविकवच नर हा ८२
असतां सजीव मी तुज  योग्य नव्हे अर्जुना-सवें युद्ध
वारुनि किरीटिला यश  द्याया तुजलाचि जोडितों शुद्ध ८३
भूप म्हणे शक्ति असे  परि न म्हणसि अर्जुनासि मारीन
स्नेह मनीं आहे तो  न म्हणों दे म्हणुनि म्हणसि वारीन ८४

---

१ तृण, २ अर्जुन, ३ नाशाला, ४ गर्विष्ठ, ५ नन्-अवन-पण- कर्णरक्षणाचांपण, ६ अश्वत्थाम्यास, ७ कल्याणदायकभाषण, ८ वज्रकवच, + गरुड-अतिक्रम- गरुडाचा अपराध.

आचार्य पुत्रवत् परि- रक्षण करितो रणांत मदरींचें
तूंही रांडों देसी पुण्य यशोधन बळेंचि पदरींचें ८५
नकळे करिसी तूं मम- शत्रूपेक्षा रणांत धर्माच्या
प्रेमें कीं कृष्णोच्या कीं मौर्ध्यें आसुच्याचि कर्माच्या ८६
करिते प्रवाह मिळतां गंगा मलिनाहि धोते मीना कीं
सत्संगति श्रिता नसि अर्दीन-रारवी होउ गौतमी नाकीं ८७
द्रौणि म्हणे सत्य वदसि पांडव आम्हास फार आवडती.
सन्मानि गुरुसि बहुमता जेंशी रामेश्वरासि कावड तीं ८८
त्यांसि द्रोण बहु प्रिय जैसा तैसाचि मीहि कुरुपा हें
काय प्रेम वदावें तनु जीवितसे स्तशिष्य गुरु पाहें ८९
परि त्यांहीं आम्हीं त्या प्रेमासि रणांत सोडिलें पाणीं
करितों तुझेंचि जैसें करिती विधिचेंचि शासन प्राणी ९०
कर्णादि सर्व आम्ही नित्य यथाशक्ति करितसों युद्ध
काय करावें दुर्जय धर्म त्रिजगीं तसा नरे शुद्ध ९१
प्रकृतिकुटिल पापाचल खल तूं मानिसि तसेंचि अन्यासी
पाहे जडरूपचि जड तें सर्व ब्रम्हरूप संन्यासी ९२
शिरतों पांडव-कटकीं शिरला एकार्णवीं जसा कौल
जातों युद्ध कराया शत्रुशर बरे न हे तुझे बोल ९३
सृंजय-पांचाळ-कटक आजि स्वरुधिर-नदींत वाहेल
पाहेल धर्म अश्व- त्थाममय सकळ रात्रिंत राहेल ९४

१ निरर्थकपणानें, २ स्वच्छ, ३ आश्रितास, ४ अश्वत्थाम्याची आई, ५ गंगेचीकावड, ६ आज्ञा, ७ वराह.

ऐसें बोलुनि गुरुसुत गांठुनि पांचाळ-सोमकांस वदे
हूं वर्षा शस्त्रांहीं घ्यावें सोडूनि सोम कां सवदे ९५
स्वीकारी घनतेला पर-निकर द्रोणतनय नगतेला
कीं शोभाया अयशा भी स्रुकुलज जेविं जडित नग तेला ९६
परदलनीं द्रौणि गमे घन-निकरीं निकर तो महत् रचितो
कीं करितो शर-दहनीं पांचाळ-त्रिपुर-होम रुद्राचि तो ९७
तो धृष्टद्युम्न म्हणे कथिला तुज धर्म काय हा तातें
दुष्टा दुर्बल-दलनीं फळ आलें सांग काय हाता तें ९८
असशील शूर तरि ये चापीं शर शीघ्र जोडुनी भीड
कविनें कवि-राजाशीं सांगावा वाद सोडुनी भीड ९९
ऐसें बोलुनि हाणी द्रौणिप्रति अतितरोग्ररोपानीं
गुरुसुत म्हणे रहा क्षण पाठवितों मृत्युमार्ग-सोपानीं १००
खरतर-वर शर-विद्ध द्रुपदसुत म्हणे तयासि हा मूढा
कशि आयकिली नाहीं काय मदुत्पत्तिची कथा गूढा १०१
आधीं मी द्रोणाला मग मारावें तुला असें आहे
हा हेत पित्याचा हे भुज पुरवितिल न विलंब या साहे १०२
धर्मीं करिसी द्वेष प्रेमा दुर्योधनीं खळीं अधर्मीं
त्यजिलें स्वकर्म ऐशा भ्रष्टाचा कां करूं नको वध मी १०३
अश्वत्थामा कोपें लक्षीकृत-काम रुद्रसा पाहे

१ मेघपणाला, २ शत्रुसमूह, ३ जडावाचा, ४ अलंकार. ५ गाढ, ६ लाज ७ अतितर-उग्र-रोष-असंत कठिनबाणानीं. ८ मत्-उत्पत्ती-माझ्याउत्पत्तीची, .९ धर्मराजा-वेठापीं, १० मदनावरज्यानेंलक्षधरलें, + पर्वतपणाला.

गमले नरांतिल लक्ष्मण घनरवेसे कां मरुद्रसोपा हे १०४
स्नान क्षनजें झाले आयकिलाही न हा निकर वीरें
पळसें वरिलि वरावी कां न अरुनिहीन हानि करवीरें १०५
त्यां दोघांतें युद्धीं मानवले अर्जुनादि भट सारे
क्रूर वदले दाखवितो रंगांत नटासि नृत्य नटसा रे १०६
एक मुहूर्त महारण झाला मग मोह तो जसा बोधें
क्रोधें केला भग्न द्रोणाचार्यात्मजें महायोधें १०७
केला रथिशनकाचा बाणांच्या एकवेळ विलय शतें
तुमच्या कटकीं ऐसें द्रौणिविना कोण मिळविल यश तें १०८
वधिलें महारथत्रय मग गुरुपुत्रें शरत्रयेंचि रणीं
द्रौणिशरीं तेज अहित- हर रविच्या तिमिरहर जसें किरणीं १०९
केला बहु पांचाळ- क्षय हरिसारथिसमक्ष खवळून
हतशेष बहु पळाले त्या विरथद्रुपदसूनुजवळून ११०

---

## अध्याय.१८

न धरिति भीम धनंजय येतांही द्रोणजवळ लेखा ते
गमले विश्वप्रळयीं काळांतक जेविं खवळले खाते १
गमला शिरतां पांडव- सैन्यसमुद्रांत मत्त मगर मला
सात्यकिशर- दर्शितपथ- सद्गतिशीं सोमदत्त मग रमला २

---

१ मेघनादसे, २ मरुत्-रसा-प-देवांसआणिराजांस, ३ कण्हेरपुष्पानें, ४ अर्जुनास मक्ष, ५ खाणारे, + काळ-अंतक.

कुरुवृद्धवधक्रोधें बहु कौरव-योध धांवले शमना
सात्यकि न स्पर्शों दे तदिषु तसा भीरुभाव-लेश मना ३

शक्राचा रुद्र जसा सात्यकिचा धर्म होय कैवारी
विघ्नें विघ्नेश्वरसा कौरव-कटकें पळांत तें वारी ४

कुरुबळ मथितां धांवे धर्मावरि तो स्वशिष्य-नाकद्रू
प्रसवे तच्चापलता बाणगणा जेविं दुर्जना कद्रू ५

धर्म न साहे समरीं द्रोण स्वध्वजधनुष्य खंडी तें
तो बाण-सहस्रातें योजी देवेश जेविं चंडीतें ६

त्या बाण-सहस्रानें गुरु केला विकळ दोन घटिका हो
सावध होऊनि म्हणे प्रेमा होइल जनांत लटिका हो ७

योजी अजोतरिपुवरि वातास्त्रातें रणांत तो विप्र
याचें स्तंभन धर्म प्रत्यस्त्रें करुनियां करी क्षिप्र ८

तों कृष्ण म्हणे धर्मा गुरुसीं रण तूं करूं नको परत
अपनी मित्य तुला हा स्वद्रुहणीं पण करून कोपरत ९

याचा अंतक धृष्ट- द्युम्न उद्यां यासि तोचि मारील
त्यावांचुनि यासि रणीं साक्षात् पविपाणिही न वारील १०

राजानें राजासीं भांडावें नदितरांस वरजावें
त्वां हे सेना घेउनि राजा धृतराष्ट्र-सूनुवर जावें ११

भीमार्जुन कौरवबळ वधितिल यांला सहाय मी आहें
परकटक मुखीं भरिलें काळाजगरें करूनियां आ हें १२

---

१ उत्तमशिष्यांसकल्पद्रुमअसा, २ सर्पजना, ३ सर्पमाता ४ देव-ईश-इंद्र, ५ धर्मावर, ६ द्रोण,
७ रोध, ८ इंद्रही, ९ तन्- इतर- राजाहूनइतरजेत्यास, १० काळ- अजगर.

ऐसें हित सांगे जो मधु-कैटभ-संकटीं अजा तारी
देउनि मान प्रभुला गेला भीमाकडे अजातारी १३
पूर्वीं जेविं सुरचमू ध्याली पाहोन अंधकारातीं
कौरव-पांडव-सेना भ्रमली पाहोन अंधकारा ती १४
दुर्योधनें विनविले धरिती बहु दीपिका पदात रणीं
गमलें दीप-मिषें स्मृत- मित्रार्थ प्रगटला तदा तरणी १५
नारद-पर्वत-वचनें दिग्देवी अप्सरा भुजग यक्ष
दीप धरिति विद्याधर गंधर्व स्मरर्षिही बहुत लक्ष १६
पांडव-कटकींहि धरिति सर्वहि पादात स्मृजन दीपातें
कोण न देइल समयीं असतां श्रमत्यास भुज नदीपातें १७
दीपक स्मृगंधतेलें क्षिति-गगन-तळीं अनंत पेटविले
स्वभर उणा करित्यांतें स्मृमणि अनंतेंचि काय भेटविले १८
प्रतिगज सप्त प्रतिरथ दश दीप प्रतिहयास एक रणीं
ऐसी अचाट यांची लोकीं कोणासही न ये करणी १९
व्यूह रचुनि बंधूंतें सांगे व्हायास यश सुयोधन हो
यत्नें गुरु रक्षावा द्रुपदस्मृतालाचि वश सुयोध न हो २०
धृष्टद्युम्ना गुरुसुत कर्ण जेंया भस्म करिल रोपांनीं
भीमा मी मर्दिन मग मारावे शेष-शत्रु गोपांनीं २१
गुरुसचि रक्षा म्हणजे विजयश्री निश्चयेंचि मज वरिल
रवि-वरिल घन-पटलसें सर्वहि संकट टळेल मजवरिल २२

१ब्रम्हदेवास. २धर्म. ३ सत्पुरुष, ४ पदाति, ५आपलाभार, ६ शेषानें, ७ धृष्टद्युम्नाला, ८अर्जुनास, ९ गुरास्थानीं, १० माझ्यावरचें.

गुरुचक्रगोप्त होवनि    कृतवर्मा शल्य यत्न द्विमानी
करिती बहु कीं शोभा    सुयशानीं नीं न रत्न-द्वेमानीं २३
धर्महि गुरुलाचि वधा    ऐसी आज्ञा करूनि सैन्यानें
धांवे आपणहि यशीं    जों दे साधारणत्व सैन्यानें २४
कीं तो झाला तुमच्या    तनयाचा विघ्न कारभारी हो
केले तुम्हीं धरुनि पथ    अनयाचा विघ्नकार भारी हो २५
केला धर्म विरथ कृत-    वर्म्यानें खंडिलेंहि कवच रणीं
तें सर्व भस्म करिता    परि त्यांची बहुत भक्ति नव-चरणीं २६
शङ्खें बळेंसा वधिला    सात्यकिनें सोमदत्त-सुत भूरी
त्यांचि करविले स्व परां-    करवीं काळा ऽनळांत हुत भूरी २७
सात्यकिवरि गुरुनंदन    धांवे त्यावरि घटोत्कच पळाशा
झाले रक्तस्नात    द्विज राक्षस जेविं पुष्पित पळाशा २८
मूर्च्छित केला द्रौणि    प्रथम क्षणदाचरें दशाशानीं
वदले पर पक्षहि बरा    कीं व्याघ्राच्या शिरें न शशा रानीं २९
मग सावधान होऊनि    गुरुपुत्रानें धृतोग्रकोपानें
मृतसाचि पाडिला तो    राक्षस एकाचि तीव्रेंरोपानें ३०
मूर्च्छित होतां राक्षस    तो मागें शीघ्र काढिला सूतें
कीं पर्वतना घेउनि    देईं लवचि अशनिला दिला सूतें ३१
भीमें सुयोधनाचें    ध्वज-कार्मुक-खंडन प्रथम केलें

१ चक्ररक्षक, २ सैन्यराजानें, ३ विपरीताचार. ४ यज्ञाकरितां. ५ बहुत. ६ सोमदत्त पुत्र भूरिश्रवस, ८ राक्षसें. ९ धृत-उग्र-कोप-धरिल्या आहे ज्यानें. १० कोधजानें, १० तीक्ष्णबाणानें, ११ सूर्यानें, + धर्मानें.

तच्चाप-पंचक तया  कुरुपतिनें मग अनुक्रमें नेलें ३२

त्यावरि स्वंही त्याच्या  शक्तीतें भूमिप त्रिधा रांजा

पविधाराधिक तीव्रचि  गमल्या खत्पुत्र-पत्रिधारा ज्या ३३

स्वशिरीं फिरवुनि भिरवुनि  रविमंडल भीम ती गदा घाली

कुरुपतिरथीं पडे ती  जेविं गळां तीव्रभोगदा घाली ३४

अश्व उडी घाली क्षिति-  वरि तव रूत मग गदा रथावरि ती

नानारि हय-सूत-रथां-  सह नृपतनु सगरसुत-पथा वरिती ३५

नंदक-रथीं कुरुपति  स्वीकारुनि मान सत्वरा गेला

मेलाचि सर्व वदले  कीं रुद्रसंमान-रस्व रागेला ३६

कर्णे सहदेव विरथ  केला मग खड्ग-चर्मही नाहीं

तद्यत्नांहीं कर्णचि  मेळविला जेविं धर्म दीनाहीं ३७

पूर्वी जी भीमाची  सहदेवाचीहि तीच गति केली

जरि तो परनर-कुंजर-  निकरीं साक्षात् मृगाधिपति केली ३८

बाळांत विशिखांनीं  कोणीहि कधींहि करुनि युद्ध नरे

झाळारि बहु रथेच्या  लाडें भावाचियाहि उद्धत रे ३९

प्राणाचि कुंतीचा तूं  यास्तव केलासि आजि म्यां मुक्त

विष्णुकडे जावें त्वां  अथवा कुंतीकडेचि हें युक्त ४०

ऐसें हांसोनि वदे  कुंतीचें वाक्य आठवी न वधी

कीं सत्यसंध दाता  तो कर्ण महायशा नव्हे नवधी ४१

---

१ बाणधारा, २ तीव्र-भोगद-अघ-आली- तीव्रभोगदाची पातक पंक्ती, ३ सगर राजाच्या पुत्रांच्या मार्गास, स्वर्गपंथास, ४ सहोदर, ५ सिंहासारिरणकीडा करणारा, ६ सत्यवचनी, ७ क्षणिक बुद्धि.

कर्ण शिरे परकटकीं जैसा जलधींत रूत हिमाद्रीचा
मग जन्मेजयनामक- पांचाल्य-रथींच रूतहि माद्रीचा ४२
सहदेव मनिं म्हणे हा जन, तव नुति काय न शिकला पीडा
ऐसी नसो असो मृति पाव प्रणतासि शशिकेलापीडा ४३
गुरुवरि विराट धांवे त्यासि रणीं विरथ मद्रपाळ करी
नदंनुजानि शतानीकहि ये हरिवरि जेविं चपळ बाळकरी ४४
त्याहि शतानीकाला येतांचि रणांत शल्य तो स्वपवी
दे बहु कुरुपतिस जसा असुरवधें शतमरवास तोस पवी ४५
मृतबंधुरथीं बैसे वीरवर विराट हाक दे वर्षे
पर्वत म्हणे न दुर्लभ मोक्षहि या काय नाक देवर्षे ४६
कांपे थरथर रूटतां शल्याचा वज्रसा स्वरोप मही
बसतांचि उरीं झाला मूर्च्छित मत्स्येश तो स्वरोपें मही ४७
सारथि तेथुनि मार्गे त्यासि म्हणत हायहाय काढी गा
शल्य परबळा उडवी पवन जसा कापसाचिया ढीगा ४८
शल्याकडेचि रथवर चाळविला सर्वरवळविलापार्थ
जेणें स्वसम अजित या रूयशें सर्वत्र कळविला पार्थ ४९
वारील न प्रळयिंचा पळही येवोनि आड वारा ज्या
त्यास अलंबुष राक्षस वाराया होय आडवा राजा ५०
विरथ क्षणांत केला गेला तात्काळ कोपला शरण

---

१ मैनाकपर्वत, २ चंद्रशेखरशिवा, ३ शल्य, ४ विराटाचा कनिष्ठबंधु, ५ सिंहावर, ६ गजशिशू, ७ इंद्रास, ८ वज्र, ९ पर्वतनामाकृती, १० देवासारिखा ही, + स्तुति.

रुद्र-प्रतिवीरांसीं करिल तसा काय हो पलाश रण ५१
पळवुनि पलाश पार्थें पवनें तरुसे उदंड लोळविले
बोळविले परलोकीं बहुतांकरवीं स्वहस्त चोळविले ५२
नकुलसुत-शतानीकें तव नंदन चित्रसेन जो चुलता
केला विरथ न जाता कृतवर्म्या शरण निश्चयें डुलता ५३
पाडी वृषसेन उरीं हाणुनि शर वज्रभासुर द्रुपदा
पळवी सूत म्हणे हा कृष्णा श्रितवल्लभा सुरेद्रुपदा ५४
सोमकचमू पळे घन- तिमिरींही गमति हित न दीप तिला
अंधाराळाचि भजति जेविं असुर शक्रजित नदीपतिला ५५
दुःशासनें विरथ जों केला प्रतिविंध्य तों अनुज अवघे
झाले सहाय कलिजित- धर्मा भुज विष्णुचे जसे चवघे ५६
शकुनि करी नकुळाला मूर्छित मग तो नृपा तव श्यालां
पळवी सूत म्हणे हो या काळमुरवीं न पात वश्याला ५७
करिती महारण बळी शतमख शंबर तसे कृप शिखंडी
भैरव वैर वहाती ते जेविं महासरीसृप शिखंडी ५८
कार्मुक-कर्तन-कुपितें त्या आचार्यें कृपें नृपेंद्र-हितें
केला मूढ शिखंडी युद्धीं बहु मानलें सुरांसहि तें ५९
तेव्हां इकडिल तिकडिल झाले बहु युद्धभूमिवर कडबा
केलें त्वां मसण कुरु- क्षेत्र असे शुद्ध भूमि वरकड बा ६०
धृष्टद्युम्न गुरुवरि द्विरदावरि सिंहसा उठे रागें

---

१ राक्षस, २ वज्रप्रतिम, ३ सुर-द्रु-पदा-कल्पतरूच्यास्थाना, ४ समुद्राला, ५ शकुनीला, ६ शंबरासुर, ७ भयंकर, ८ मोठासर्प, ९ मयूर.

पांडव पांचाळ सकळ रक्षाया त्यासि धांवले मागें ६१
द्रोणानें रक्षाया सकळ तुझे पुत्र सर्वही जपले
खपले ते खपलेचि प्रभुजि बहु बरेचि शेषही तपले ६२
सेना समूह गमले अन्योन्य जिगीषु दोन अर्णवसे
धृष्टद्युम्न-समीपचि सात्यकि गुरुच्या समीप कर्ण वसे ६३
प्रथमचि धृष्टद्युम्ना दे सोडुनि बाण विप्र तापातें
कीं खंडी चापातें पापातें जाणवि प्रतापातें ६४
वाटे वधिलचि गुरुला जें कोपें सज्ज तो नव धनु करी
क्षितिसि नखांहीं हेरि जों करिच्या चित्तांत येन वध नुकरी ६५
सोडी घोर शरव्रज बहु भ्याले कुरुप मुख-कळा वदले
समरें द्रोणायास्तु स्वस्ति असें देव दानवहि वदले ६६
कर्णे द्वादशधा तों केला जैसा अही नभोगामी
तें पाहुनि रोमांचित झालों राया अहीनभोगा मी ६७
द्रोण द्रौणि सुयोधन कृतवर्मा शल्य शकुनि हे सारे
युगपत् ताडिति म्हणती हूं मारा दुष्ट सर्प जैसा रे ६८
युगपत् सर्वांचीहि द्रुपदात्मज सकवचें उरें भेदी
आधीं द्रुमसेनाचें मस्तक मग कर्ण कार्मुक च्छेदी ६९
पुत्राचें हरिस तसें धनुचें कर्तन असह्य कर्णास
प्राशिल त्यास गमतो सिंधूच्या जेविं घटज अर्णास ७०

१ मेलेच, २ जिंकिण्याचीइच्छाकरणारे, ३ सिंह, ४ द्रोणाय-अस्तु-स्वस्ति-द्रोणाचार्यांचें कल्याणअसो, ५ बाणसमूह, ६ आकाशगामी, ७ उत्तमभोगभोगणाऱ्या, ८ एककाळीं, ९ रा पणें. १० अगस्त्या, ११ उदकास.

सक्रोध योधमणि तो   शीघ्र करुनि सज्ज कार्मुका सारा[1]
धृष्टद्युम्ना अरिवरि   करि खर शर-वृष्टि वार्मुकासारा[+] ७१
तों सात्यकि कर्णावरि   वासव[2] बळिवरि जसा तसा आला
झाला दारुण रण सम   गमले कोणास कोणहि न भ्याला ७२
अस्त्रें [illegible]सुतांचीं   कर्णाचींही निवारिलीं क्रोधें
वृषसेन पाडिला शर   हाणोनि उरांत त्या महायोधें ७३
सुतशोक-तप्त होउनि   सात्यकिसीं कर्ण करि महायुद्ध
शब्दयशा वृषसेनहि   झाला तितुक्यांत त्या रणीं बुद्ध[3] ७४
सात्यकिला दारवती   ते वृष वृषसेन बाप लेंक बळ
म्हणती काळमुखीं हो   रिपुवपु कीं देह आपलें कवळ[4] ७५
सात्यकिनें सहसा त्या   दोघांचेही सुबाण तोडून
तात्काळ पाडिले हो   हस्तापासाव[5] चाप तोडून ७६
ते सात्यकिनें म्हणती   शर सोडुनि सजुनि चाप नव दोघे
अभिमन्युचा म्हणे मग   कां हाय तुझाचि बाप न वदो घे ७७
सात्यकिसीं रण करितां   ऐकुनि गांडीवनाद कुरुपातें
कर्ण म्हणे हो[6] येतो   जय साधाया स्वकार्य गुरुपातें[7] ७८
त्या सौभद्रापरि हे   सात्यकि पांचाळ वेढिले असती
बहु आम्ही देतों या   दोघांला आजि यमपुरीं वसती ७९
पार्थास कोंडिलें हे   दोघे आम्हीं असें न समजावें
तिकडेचि त्यासि समरीं   रोधाया बळ समुद्र-सम जावें ८०

---

१ श्रेष्ठ, २ इंद्र, ३ सावध, ४ ग्रास, ५ हस्तापासून, ६ अर्जुन, ७ द्रोणाच्यापा-
तानें, + वार्मुक-आसार-घन वृष्टितुल्य.

हें प्रिय हित मित्रवचन परिसुनि नृपशकुनिला म्हणे मामा
नामा अन्वर्थ करा शीघ्र उठा सफळ हो करा कामा ८१
देउनि कांसा पडतां अभिलष्यशकचीसमानहोमामी
जा वासविवर मान्या देवींत शची-समान हो मामी ८२
अयुत गज अयुत रथ घे जे साक्षात् सिंह परमहेभाचे
दुःशासनादिक दिले तुज समर-सहाय परम हे भाचे ८३
स्या पांडुसुतां असुरां हरि सा सोडोनि उग्र शर भाजीं
तीं सत्वें कवण-यशें ख्यातें होतिल वशें न शरभाजीं ८४
या बहुमानें फुगला गेला धांवोनि अर्जुनावरि तो
ज्याच्या स्फुरती मरणा कीं कुरुती शत्रु अर्जुना वरितो ८५
जाउनि धनंजयावरि झाले भट सर्व शलभसे नाहीं
कैसा तरी करावा सिंहाचा भंग कलभ-सेनाहीं ८६
शकुनि विरथ होय बरे वर्ण जपत चारि पुत्रयानींच
भंगिन म्हणे परास न जिंतुनि मनिच्या रिपु-त्रया नीच ८७

---

## अध्याय.१९

रविचा चहुकडुनि तमें मंदप्रभ न कर वेढिला होतो
सात्यकि तसाचि कौरव- कटकाला न करवे ढिला होतो १
अर्जुन तसाचि सात्यकि बहु मारुनि शेष कुरुकटक-पळवी

---

१ अहोमामा, २ मनोरथा, ३ शत्रुरूपगजाचे, ४ इंद्रसा, ५ तृणाला, ६ करिशावकसेनानीं, ७ कायकरूं हे चारवर्ण, ८ किरण.

एक वीर पुढें नउरे सर्वांचींही मुखें रणीं मळवी २
सात्यकिला माराया खातचि धांवे तुझा तनय दांत
परि होय विरथ याचें प्रागल्भ्य तुम्हां अशा अनर्थदांत ३
होउनि विरथ सुयोधन कृतवर्मरथीं चढे कढे कोपें
सोपें द्यूतचि परिभव वीरांचा कठिण संगरीं रोपें ४
क्रोधाविष्ट सुयोधन वदला राधासुतासि परिसा तें
गुरुतेंहि दोष लावी खापर बा परम जेविं परिसातें ५
वधितां विजय जयद्रथ समर तुम्हींच स्वयें प्रवर्तविला
कदन उगेंचि पहातां कां सोत्साह-प्रवाह पर्तविला ६
शक्त असोनि निरखितां निज-कटक-कदन अशक्तसे परसे
चाळवितांहि न पेटां केलें आर्द्रेंधनें जसे परसे ७
समयीं सोडावें मज ऐसें तुमच्या मनांत जरि होतें
जिंकू पांडुसुतांतें ऐसें वदलां कशास तरि हो तें ८
जरि भरंवसा न देतां पडती बुद्धीस भूल काशाला
येतें तुम्हासि भाषण बहु नीरस जेविं [illegible] काशाला ९
जरि ठेवितां कर श्रुति- वरि करितों वेर हें कशाला हो
परिभूति रुचे कवणा बाळहि न म्हणेल वपु कशाला हो १०
करणें नसेल माझा त्याग यशाचि बहु गमेल जरि शुद्ध
तरि व्हा सिद्ध करा निज- शस्त्रास्त्र-पराक्रमानुगुण युद्ध ११

१अन्यायवर्तिजेत्यांत, २बाणानें, ३अर्जुन, ४शत्रुसे, ५पेटनमार्हीं. ६आर्द्र-इंधन-ओल्याकाष्ठानें, ७आगटीं, ८तृणाला, ९चाबुक. + पराभव.

मौनचि धरिलें घ्यावें. उत्तर बाऱ्यास काय काय निद्रीं
न दुरुक्ति मनिं धराव्या स्फजनांहीं जेविं बायका यौनिद्रीं १२
पांडव-कटकीं शिरले क्रोधी गुरु कर्ण करिकुळीं हरिसे
झाले दुःसह सर्वां केवळ ते प्रळय-पावकासरिसे १३
बहु वधिले वीर रणीं बहुत पळविले कुलीन योध रणीं
धर्म म्हणे परतावें जाउं कसा पावली न यां धरणीं १४
विजय म्हणे श्रीकृष्णा भ्याला प्रभु धर्मराज कर्णाला
जेविं महाविष-दृष्टिहि अहि महिवरि देखतां सुपर्णाला १५
मज हा परिभव दुःसह लावियला जेविं पाय सांपाला
ने रथ मी यासि वधिन विषतरुचा प्रभुसि काय सापाला १६
कृष्ण म्हणे बा दीनां माघहि दे कंप न जितका शीतें
तितका देतो यश हा राहो देईल न जिनकाशी तें १७
तूं एक कीं घटोत्कच आम्हांत समर्थ कर्णमद-नाशा
विफळा करो पराशा भीम-तनय जेविं रुद्र मदनाशा १८
कीं प्रिय सरव्या असे त्या- पाशीं ती दिव्य शक्ति माघवनी
कर्ण रणीं कांपवितो बहु मज धृपभासि जेविं मोघ वनीं १९
ते म्हणशी काय तुला गमला हा वासुदेव वेडासा
वाम अकार्यक्षमही भुज भुजग-मुखीं न देववे डासा २०
बा जें स्वयें करावें तें स्फमहत्कार्य तरि स्फतें केलें

१ संन्यासधारण केलें त्यानीं, २ गरुडाला, ३ दरिद्र्यास, ४ माघमासांतहि, ५ जयें करून शोभणारा
६ कर्णाच्या गर्वनाशास, ७ मदनाची इच्छा, ८ वराहापाशीं, ९ नागर्वाशान्ना, १० दा
वा, ११ दंशास.

तरि त्यांत सत्यसंध- त्व स्वयश व्यर्थ काय गा गेलें २१
वत्सा घटोत्कचा ये ऐसें तो पुष्कराक्ष[1] जों बाहे
बाहे नरनारायण- चरणीं मस्तक पुढें उभा राहे २२
हा आलों मज आज्ञा काय असें राक्षसेंद्र वदला हो
कृष्ण म्हणे वत्सा हो कर्णांतक धर्म राज्यपद लाहो २३
शस्त्रास्त्र-राक्षसाऽसुर- माया-बळ-जलधि पुत्र तूं पहिला
कर्णादिरिक्षय करुनि साधुनि दे निज-पित्यासि या महिला २४
जिष्णु म्हणे सत्पुत्रा हो गुहेसा[2] सूतपुत्र[3] नारकसा[4]
आम्हा तूं ज्येष्ठ तुझे प्रतिविंध्याद्यनुज पांच तार कसा २५
राक्षस म्हणे बहु बरें मारीन रणांगणांत कर्णातें
स्फुरवर कवीस म्हणतिल रक्षः[5]कृत कर्ण-कदन वर्णा तें २६
आज्ञा घाल तुम्हीं तरि देइल गुरुलाहि हा निधन[6] दास
रात्रौ मजसीं भिडतां होईल प्राप्त हानि धनदास[7] २७
ऐसें वदतां त्यांतें कर्णावरि कृष्ण पाठवी राया
देती भिवोनि कौरव- सेना समरांत पाठ वीरा या २८
त्यावरि अलंबुष खचर कुरु[8]राजें धाडिला जटासुरज[9]
त्यासि घटोत्कच मारी त्या वायुपुढें[10] महाभटासु[11] रजें[12] २९
कुरुपति-रथीं अलंबुष शिर ठेवुनि भीमसूनु पाय नमी
विनयें म्हणे पहाया आलों आणूनि हें उपायन[13] मी ३०

१ कमलनयन (कृष्ण) २ कार्तिकेयसा, ३ कर्ण, ४ नारकासुरसा, ५ घटोत्कच्यानेकेलेलें, ६ मरण, ७ कुबेरास, ८ दुर्योधनें, ९ जटासुरपुत्र. १० घटोत्कचरूपवायूपुढें, ११ महा-भट-असु-महायोध्यांचे प्राण, १२ मृत्तिकाकण, १३ भेट.

वर्षे दुर्जा अलायुध रात्रिचर महोपलायुधग्रामा
पीडी भीमासहि घन- नाद जसा खळबळायुधग्रामा ३१
कृष्णें घटोत्कच रणीं रक्षाया भीमसेन आठविला
रामें घननादावरि लक्ष्मणसा तो बलाऽब्धि पाठविला ३२
वैद्युत-पावक तरुला तैसा तो त्या अलायुधा कवळी
लावी बहु कुरुकटका त्याचें नाशूनि बलायु धाक बळी ३३
त्याचेंहि शिर तसेंचि त्वन्नन याच्या रथींच तो पाडी
एका कर्णावांचुनि सर्वांचा शौर्य-धैर्य-मद झाडी ३४
प्रकटी बहु शत दुस्तर माया तो वीर्यमत्त मायावी
कुरु म्हणति यापुढें तों न मयेश्री देवसत्तमा यावी ३५
शंबर शंभरहि उणे वाटे कांहींच न मय मायावी
अत्युग्रता कधींहि न भीमाच्या सूनुसम यमा यावी ३६
कौरव कर्णासि म्हणति राक्षस हा स्पष्ट कल्पनटशील
किति भुज-बळें तराया दुस्तर-गर-सागरासि झटशील ३७
नेणे कांहींच असा माया-शस्त्रास्त्र-बळ-विलास मय
बा शेवटील येणें आम्हां सर्वांसि कळविला समय ३८
बहु मारिले पहा हा मारिल उरल्या बळा समस्तातें
केला अशेष अंधचि आम्हां डोळस हि यास मस्तातें ३९
ती ईश्वरें जशी त्या महिषावरि योजिली महाशक्ती

---

१ महा-उपल-आयुध-ग्राम - महापाषाणरूप आयुधसमूहा, २ मेघनाद (इंद्रजित), ३ खल-बल-आयु-धक्क-राम-शत्रु सैन्याचें आयुष्य जाळणा-यारामास, ४ विद्युत्संबंधी अग्नी, ५ बल आणि आयुध, ६ मयासुर शोभा, ७ शंबरासुर, ८ कल्यांनीं नर्तन करणारा त्यांस सा रिखा, ९ विषसमुद्रास, १० देवी.

त्यां या घटोत्कचावरि योजावी वासवी महाशक्ती ४०
भीम धनंजय करतिल काय न तो मानुषाद मायावी
हा वीर वधिल जो त्या विजयश्री निश्चयेंसि वा यावी ४१
त्या भीताभयदाच्या हे भीत-प्रार्थना मना आली
झाली कल्पलतेची सद्गीतिकरूनि कामना ओली ४२
खचरशतघ्नीनें हयं वधिले होते नशांत रूचवीलें
तें भगवत्संकल्पें कोपेंही तन्मनास रूचवीलें ४३
कर्णें शक्तीस जसा रूरराजें घालितांचि कर पविला
गिरिसा गुरु कठिनहि तो खचर त्रासें मनांत करपविला ४४
क्षिप्र पळे विंध्याकृति होय भरे भीम खचर तो खांत
तद्धृदयीं शक्ति शिरे कौरव-बल-चित्तवृत्ति तोखांत ४५
राक्षस-वक्ष विदारुनि मागें नाहींच शक्ति ती फिरली
उर्ध्वपथीं परमप्रिय तें स्वर्मीला कथावया शिरली ४६
मरतांहि पांडवप्रिय अद्भुत केलें घटोत्कचें परिसा
सन्मस्तक होलें सें पितृ-हित न करील पुत्र तो अरिसा[११] ४७
पितृ-हित किमपि न घडलें धरुनि मनामाजि भाव हाचि रडे
करुनि बृहद्देह[१२] पडे तें कुरुकटकैकदेश वा चिरडे ४८
गुरुशव[१३]भारें कौरव- सेना अक्षौहिणीच तो खपवी
तेजस्वी रूत जनका दे जेविं हरिस न तेविं तोरव पवी[१४] ४९

१ मनुष्यभक्षणारा (राक्षस) २ भिणाऱ्यास अभय देणाऱ्या अशा कर्णाच्या. ३ खग्वी. ४ शक्तीनें, ५ शिरें, ६ भयंकर, ७ घटोत्कच, ८ आकाशांत, ९ हर्षांत, १० इंद्राला, ११ शत्रुतुल्य, १२ बृहत्-देह-विशाल शरीर, १३ विशाळ प्रेताच्या भारानें, १४ वज्र.

शक्र जसा वृत्रवधीं सुर-सिद्ध-महर्षि-साध्य-धीरांहीं
स्तविला घटोत्कच-वधीं कर्ण तसा कौरवादि-वीरांहीं ५०
बसूनि नृपरथीं स्वबळीं गेला कांपविन कर्ण वसुधेतें
साधुनि सुकीर्ति तें सुर- पति जेविं मथूनि अर्णव सुधेतें ५१
दुंदुभि-पणव-प्रमुखें वाजविती जे प्रवीण ते वाद्यें
श्रित हर्षविले कर्णें जैसे रामें समस्त देवाद्यें ५२

---

## अध्याय. २०

पांडव घटोत्कच-वधें अति-दुस्तर-शोक-सागरीं पडले
अभिमन्यु-वधीं जैसे सोडुनि धृतिला तसेचि ते रडले १
भेटे जयासि हसतां दिसति नभीं जो मयूख दशनांचे
हरि सा गर्जे होउनि आनंदाच्या भरासि वश नाचे २
निर्धन निधिच्या जैसा पावे अत्यंत हर्ष लाभानें
वाटे तसाचि भगवान् त्यजिला अत्यंत हर्षला भानें ३
पार्थ म्हणे गोविंदा कारण या कोण हर्ष-हास्याला
धृतराष्ट्राच्या व्हावा अस्मच्छोकांत हर्ष हा स्याला ४
भगवान् वदे प्रियसख्या शक्ति अमोघा घटोत्कचीं पडली
जी कधिंही न घडावी जी सुमहत्कार्य-सिद्धि ती घडली ५
वर कवच-कुंडलार्पण करूनि महाशक्ति जोडिली होती

---

१ वाद्यविशेष, २ घे यांला. ३ अर्जुनाला, ४ किरण, ५ दंतांचे, ६ स्मृतीनें, ७ अस्मत्-शोकां त, ८ मेहुण्याला ' शकुनीला.)

'अर्जुन जी न तुम्हावरि अत्याविषयींच सोडिली हो ती ६
याच्या अंगीं असतें कवच झळकतीं सकुंडलें कानीं
तरि हरिलें असतें धृत- राष्ट्राच्या अमृत-कुंड लेंकानीं ७
कर्ण निमालाचि असें जाण सख्या निश्चयेंचि तूं जरि हा
असता शक्तिकर दुजा अरि हा स्वामीच म्हणविना तरि हा ८
शक्र यम वरुण धनपति जिंकुनि तत्कीर्ति कर्ण वरिता हो
केला शिवप्रसादें हा घटजें जेविं अर्णव रिता हो ९
असता सकवच-कुंडल तरि कर्ण सख्या जगत्त्रयीं अमर
तूं गांडीवें मीहि न चक्रें शकतों करावया समर १०
हत-कवच-कुंडलासहि पाहुनि समरीं भ्रमेल वासवधी
सत्य शपथ करितों तो न त्वदितर जो स्फवीर यास वधी ११
जेव्हां चक्र बुडेल श्वभ्रीं बहु संकटीं वृष पडेल
होइल असावध तुला याचा तेव्हांचि बा वध घडेल १२
मागध चैद्यहि वधिला म्यां योगें कीं न हो तुज विषाद
व्यंगुष्ठ करविला म्यां गुरुकर कीं एकलव्यहि निषाद १३
योगबळें म्यांचि सख्या आजि अलायुध घटोत्कचहि वधिले
पूर्वी हिडिंब-बक-मुख बहु हे गर शरचि काळिजा मधिले १४
दुर्योधनासि मिळते मगधपति-प्रमुख वीर-वर जरि ते
धरितें बळ रण करिते अरितेज समस्त सर्वथा हरितें १५
काळें राहु गिळाया योजावा वीर सत्तमा रविला

---

१ अगस्तीनें २ त्वन्- इतर, ३ भूरंध्रीं, ४ युक्तीनें, ५ अंगुष्ठहीन, ६ नामविशेष, ७ राक्षस.

तेविं वृषावरि योजुनि म्यां राक्षस वीर मत्त मारविला १६
कर्ण न वधिता तरि मज मारावा लागताचि हा चक्रें
कीं ब्रम्हमरव-द्वेष्टा वधिला जाता न संगरीं शक्रें १७
आजिवरि तुम्हांकरितां म्यां हा राक्षस उपेक्षिला होता
हो तारक या तुमचें दास्य रणमरवींहि जाहला होता १८
धर्मद्वेषि-वधाची रक्षिलि नाहीं जरि प्रतिज्ञा ते
ध्यातिल गातिल नमतिल शमितिलक न मज हरिप्रति ज्ञाते १९
न धरिं विषादा वसविन नाकीं मेले रूयोध नव-धामीं
कथिन उपाय वृष-वधा तुज भीमासहि सुयोधन-वधा मी २०
परलक्ष लब्ध झाले हे हरिसे गर्जतानि सितवाहा
हीं पळतानि स्वबळें चाल म्हणायास लाव कितवा हा २१
धृतराष्ट्र म्हणे कोण्ही पुत्राला हित नसेचि सांगाया
पार्थीं शक्ति-प्रेरण कथिलें नाहीं तुवांहि कां गा या २२
पार्थांरितां रण-मरवीं जावें हें व्रत नव्हे वृथा ज्याचें
प्रथमाचि हटकुनि केलें कां न वृषें भस्म त्या पर्थाजाचें २३
साधाया स्वार्थातें करितो मानूनि जन कपट हितसें
ईश्वर होउनि लोकीं आचरतो केविं कृष्ण कपटहि नसें २४
शबरा-हरणीं जेसा श्वपचींला लाभ निश्चयें आहे
कृष्ण तसा स्वार्थातें राक्षस-राधेय- संगरीं पाहे २५
संजय म्हणे पृथेच्या वृष करिता भस्म आज तनयाला

१ हवनकर्ता, २ सुनिश्रेष्ठ, ३ नव्यागृहीं, ४ हेअर्जुना, ५ दुष्टदुर्योधना, ६ हायहाय, ७ कर्णास, ८ अर्जुनाचें, ९ कृष्णही, १० अंत्यजाला.

लोभी निधिला जैसा प्रभु करितो बहुत वा जतन याला २६
पार्थी शक्ति-विमोक्षण कथिलें नाहीं तुवांहि कां गा या
म्हणतां तरि कर्णाला चुकलों नाहींच मीहि सांगाया २७
कर्णासि रात्रिं शिबिरीं दुःशासन शकुनि नृपहि विनवीती
जी जयवध-प्रतिज्ञा सांगावी काय नित्यहि नवी ती २८
कर्ण म्हणे वर देउनि मग मागें काय मी कवि सरेन
शक्ति उद्यां पार्थावरि टाकीनचि निश्चयें न विसरेन २९
जय न वधावा कृष्णाचि त्याविण ते सर्व काय पांगूळ
हेंचि बहु सरस अमृत त्यजुनि रसिक वरिल काय पां गूळ ३०
चवघांत करिल अजितचि त्यास सखित्वें जयास वरिल हरी
तोचि अमर अमृताचा निधि सोडिल ज्या परासुवरि लहरी ३१
तस्मात् प्रातःकाळीं कृष्णाचि सोडुनि शक्ति मारावा
यूथप वधितां हरिच्या कैसें माहेल यूथ आरावा ३२
ऐसा दृढतरनिश्चय शिबिरीं व्हावाजसापदीं सवड
तरणीं हे पाहे पारावारा तसापदीं सवड ३३
वध-बुद्धि युद्ध-काळीं मोहेचि न सावधान राहे ती
कृष्ण हृषीकेश धरू देईल कसा वधा नरा हेती ३४
योजी इतर म्हणे जय अरि-दृष्टिपुढें न सर्वथा राहो
ऐसें सख्यास रक्षी प्रभुवर होऊनि सर्व थारा हो ३५
ऐसा श्रित-रक्षण-पटु जो म्हणतो सेंद्रनाक थारा ज्या

१ अर्जुनवधाची प्रतिज्ञा, २ अजिंक, ३ समुद्र, ४ शूरावरि, ५ गजसमुदाय, ६ गर्जनेला, ७ कृष्ण, ८ अर्जुन, ९ आश्रय, १० स-इंद्र-नाक- इंद्रासह वर्तमान जो स्वर्ग तो.

त्या चक्रधर-प्रभुच्या हननाची काय गा कथा राजा ३६
सात्यकि कृष्णासि म्हणे प्रभुला विज्ञापना असी मोजी
पार्थी न टाकिली कां शक्ति वृषें धरि बळा असीमा जी। ३७
कृष्ण म्हणे शैनेया म्यां कर्ण भ्रमविला वृकासुरसा
भक्ता मी बहु जपतों जपतो शनभैरव जसा क्षुधा-रुरसा ३८
पथकेरिलें चालविलें आपण हें वचन या न गरवावें
त्या उग्र-शक्तिनें या कुंतीच्या न तनया नरा रवावें ३९
वसुदेव देवकी बल- देवादि तुम्ही समस्त मत्प्राण
जाण प्रिय पार्थ जसा न तसा कोणही खरें तुझी आण ४०
व्यसनीं रक्षिन बुडतां आधीं पार्था तसा न भवेना मीं
या मित्रीं मत्प्रेमा निश्चळ उपमन्यु जेविं भव नामीं[6] ४१
झाला सजीव हा[7] व्यसु[8] होऊनि लाभासि या नसे जोडा
मज वाटे प्रद्युम्न- प्रत्यागमन-प्रहर्ष तो थोडा ४२
अर्जुन मूर्धा[9] याच्या नाशीं होईल आपुला घात
बा तत्काळ घटोत्कच हा म्यां केला पराःपुढें हात ४३
यापरि सात्यकि-केशव- संवाद श्रवण करुनि समुदा[10] या
सूतासि बोल लावी नृपे[12] निंदी सुतमुखा:ख-समुदाया ४४
होतों कृतार्थ जरि ती गोविंदीं शक्ति सोडली असती
गेली कीं हातींची सर्वस्वं जेविं जोडिली असे[13]ती ४५
सूत म्हणे स्वामीचें जें मत ऐसेंचि आमुचें परि तें

१ फाशी, २ द्वंद्व, ३ पत्कारलें. ४ अर्जुनास, ५ गृहाला, ६ शिवनामीं, ७ अर्जुन, ८ गतप्राण, ९ मस्तक, १० महर्षा, ११ संजयासि, १२ धृतराष्ट्र, १३ जारिणी.

झालें विफळ कपाळ प्रभुजी तुमचेंचि घात हें करितें ४६
भल्त्या कृष्णीं टाकिन शक्ति असा वृषविचार करि शक्र
नित्य म्हणे सिंहोऽस्मि श्व-स्त्वं-गंतासि कृष्णकरिप क्र ४७
योजावें तें समयीं आम्हां कोण्हा न आठवावें हो
देव प्रभु अष्टांऽगुल जें त्यासि म्हणेल आठ-वावें हो ४८
गत-शोक कशास पुरे होउनि सावध पुढील परिसा हो
गुरुवध-वृत्त सदुःसह बहु तुमचें हृदय मृदुल परि साहो ४९
भीमाला जय-मत्त- द्वेषि-कटक-मर्दनासि पाठवुनी
राजा रडे घटोत्कच- कृत बहु सेवोपकार आठवुनी ५०
कृष्ण म्हणे विकलत्वा अनुचित तूं धरि शक्र समयज्ञ
सोडुनि शोक करावा समर नसे श्रेष्ठ युद्धसम यज्ञ ५१
धर्म म्हणे बहु दुःसह सदपत्य-वियोग विषम हा देवा
मज वाटे न गिळेलचि सदऽपत्य-वियोग-विष महादेवा ५२
कसें घटोत्कचें बहु केलें होउनि वनांत नत दास्य
गुरुवत्सलांत ख्याती झाली या त्रिभुवनांत न तदास्य ५३
जी सहदेवीं तीच प्रीति मुकुंदा घटोत्कचीं माझी
बा जीवदान दिधलें विजयासि मरोनि शर्वरीं आजी ५४
आम्हीं तुम्हीहि नव्हतों अरिनीं अभिमन्यु मारितां जवळ
जिष्णु-समक्ष कसा हा झाला त्या शक्तिच्या मुखीं कवळ ५५

---

१ सिंहः-अस्मि-मी सिंह आहें- कृष्णाकरिप-त्वं-श्वः-क्व-गंतासि- हे कृष्णरूपहस्तिंघेशा तूं उद्यां कोठें जाशील, २ कृष्ण, ३ धर्म, ४ सेवा-उपकार, ५ तत्-आस्य-त्याचें मुख. + माझी

अभिमन्यु-घात-कारण    ते मुख्य द्रोण कर्ण सोडून
काय मिळविलें त्वत्या    ऽगस्कृत-सैंधव-शिरासि तोडून ५६
न बहु मम प्रिय केलें    मारूनि जयद्रथा अधन्या या
कर्णाचा कीं गुरुचा    करितां तरि मानता वध न्याया ५७
ते हे प्रवर्तले वृष    गुरु अहि शर-गर वमून भाजाया
कैसें साहों पाहों    कीं भर्त्ता मी चमू न भाजा या ५८
पाठविला भीम मथुनि    बळ गुरुलाही रणीं मथिल आजी
मी कर्णावरि जातों    तो मृत कीं हो तुम्हां कथिल आजी ५९
ऐसें बोलुनि कोपें    कर्णावरि नीट धांवला राजा
मागुनि हरि हरि हांकी    तों झाला प्रकट त्यापुढें आजा ६०
व्यास म्हणे बा धर्मा    क्रोध सितार्शवा करूं नको परत
सावध हो बा व्यसनीं    पडतो साहस करून कोपरत ६१
जरि कर्णार्जुन भिडते    तरि समरीं सकल योजिते शस्त्रें
परमास्त्रज्ञ धनंजय    राधेयाचीं निवारिता अस्त्रें ६२
त्या शक्रशक्तिनें जरि    पार्थीं वृष टाकिता कसें होतें
व्यसन तरंडक भंगे    होय समुद्रीं जसें तसें होतें ६३
सर्वस्वांत चुकविला    जेणें तो कां नको पलाशांत
हें किनि गा बा वधितां    शतभैंतनोकां न कोपला शांत ६४
काळें वधिला राक्षस    ती शक्ति निमित्त मात्र हें साचें
भावंड बुद्बुदाचें    वपु अति-निःसार मित्र फेंसाचें ६५

१शररूपविष, २भार्या, ३घटोत्कच, ४धर्म, ५संग्राम, ६घोडे, ७व्यास, ८क्रोधवश, ९पला-
श-अंत-घटोत्कचाचा नाश, १०शंभरपुत्रांना, ११वसिष्ठऋषी, १२पाण्यावरील बुडबुड्याचें,
नरांडें, (झाज)

विकळत्वें यश पात्र- च्छिद्रें पीयूषसें न सांडावें
मांडावें निज-धर्मा- ऽनुष्ठान तुवां असेंचि भांडावें ६६
पंचम-दिवसीं धर्मा होइल सकळाहि हे तुझी वसुधा
लोकत्रयीं बहु-मता कीर्तिहि बहु तृप्तिहेतु जीव सुधा ६७
सांगुनि हित अंतर्हित[1] झाला तो वेद-खग-नभ व्यास
ज्याच्या पद-रेणुपुटें पटु द्याया देवनग न भव्यास[4] ६८
मग सफळ हो पितृ-मनो- रथ पंचमवेद[5] पाठ वीरा ज्या
ऐसें म्हणोनि गुरुवरि धृष्टद्युम्नासि पाठवी राजा ६९
तैसेंचि परबळातें विजयाद्यऽखिलांसि पाठवी रगडी
आम्हां कडीलहि सकळ देती न रिपूंसि पाठ वीर गडी ७०
रात्रि परम दारुण तें मेले बहु लक्ष योध यामाजी[6]
झाली जरि त्रियामा तरि अति-घोर सहस्र-यामा जी ७१
झाले निद्रांध सकळ भट न वधिति शत्रु जवळ राहुनि जे
अत्यद्भुत तें वाटे मिळतांहि सुधांशु-कवळ राहु निजे ७२
पार्थ स्वभटांसि म्हणे स्वस्थ निजावें तुम्हीं न पेंगावें
मग यश शशि-प्रकाशीं जोडावें जें महातपें गावें ७३
त्या अभिमत-वरदानें पार्थासि स्व पर सर्व मानवले
दुष्काळीं क्षुधितांतें जाणो दिधले यथेष्ट कानवले ७४
अश्वीं रथीं गजीं जे जेथें होते तसेचि ते निजले
म्हणजे जय साधुत्व प्राप्त प्रेमाऽश्रु-जळ-भरें भिजले ७५

---

१ गुप्त, २ वेदरूपपक्ष्यांस आकाशरूप असा, ३ कल्पतरू, ४ कल्याणास ५ धनुर्वेद,
६ युद्धामध्यें, ७ पक्वान्नविशेष (करंज्या)

शोभे बळ जेविं लिही चित्र पटीं रंग अर्जुन चितारी
व्यसनीं स्वपरांसहि सम तो सर्थीरंग अर्जुनचि मारी ७६
रथी-कुवलीन तरुणसे क्षत्रिय गजकुंभलीन ते गमले
रमले मुहूर्त-परिमित निद्रेसीं सर्व जीव विश्रमले ७७
मग भगवान् विधु उगवे पळवी देऊनि काय निमिगसी
खोट्याला तेजस्वी नांदो देईल कां पति मिरासी ७८
करिति पुन्हा रुखवाया शक्रसुखा सृष्टिया रणाऽरंभा
पावे पराक्रमि पुरुष पति पाहुनि दृष्टि-पारणा रंभा ७९
चंद्रोदय झाल्यावरि कुरुपति गुरुला म्हणे बहु श्रमले
पांडव पांचाळ रणीं होउनि निद्रांध केवळ भ्रमले ८०
केसे निजों दिले बा आले होतेचि आयते हातीं
म्हणतचि होतीं शस्त्रें भ्रमतां धरणार राय ते हातीं ८१
गुरुजी प्रियार्थ तुमच्या हें आम्हीं साहिलें गरळ गिळिलें
स्वापत्याचें नरडें व्याघ्रीनें मात्र ऐकतो पिळिलें ८२
शस्त्रास्त्रज्ञ त्रिजगीं स्पष्ट तुम्हासम तुम्हा तदपि त्याचें
लंघन करवें सहातां कळलें कीं गुरुकडे पद पित्याचें ८३
ते मीहि शिष्य तुल्यचि परि तिकडे प्रेम न इकडे कां जी
हत-भाग्या ये धावुनि जातां पीयूषनइकडे कांजी ८४
ऐसें द्रोणाला बहु वदला जें काय राय तें नाकीं
नहुषचारितसें दुःसह झालें कीं जेविं मघवतें नाकीं ८५

१ मिळवून, २ मिरासदार (वतनदार) ३ लोकपालांस. मोठ्याकडे, ५ नाकांत.

कोपें द्रोण म्हणे मी वृद्ध तरि तरुण-सहस्त्र-सम झटतों
मजसम कदर्कीं टिकता न दिसे भीष्माविना इतर भट तों ८६
शक्त्यधिक यत्न करितों जरि सर्व स्वपरबल मळा गातें
परि वृद्ध-भार मीसा तूं एकचि मानिसी न लोगातें ८७
धर्म असा मानावा अस्त्रें ज्या विदित अस्त्र तें जाचें
न विदित त्या न वधावें मग टूनि रणांत अस्त्र तेजाचें ८८
परि अस्त्रें मी परबळ जाळिन काटीन नरिच हें वर्म
कर्म क्रूर करिन कीं लेशहि लुब्ध-श्रितीं नुरे धर्म ८९
हें युद्ध काय रुद्रें- हि न नारायण-सखा नर थकविला
रविच्या रथाहुनि उणा तेजें याचा गमे न रथ कविला ९०
न हरि न निवात कवच न षष्टि सहस्त्रहि हिरण्यपुर-वासी
शकले ज्याच्या धनुच्या सोसाया संगरांत स्मरवासी ९१
ऐसा बहु तेजस्वी नरमूर्ति न होय कां महा काळ
पळनांहि त्यापुढें हय मग केंसे हंतुकाम हाकाल ९२
गंधर्व-गर्व सर्वहि हरुनि हरी तुमचि याहि बंधातें
श्रुत राहो अनुभूतहि न स्मरसी वीर्य संपदंधा तें ९३
प्रत्यक्ष नव बलक्षय करितो सर्वहि उदंड जरि झटतों
भट तो विजयचि आम्ही जिंकाया ईश्वरापुढें नटतों ९४
कुपित नृप म्हणे गुरुजी पार्थ-गुणाचें पुरे करा कथन
करुनि द्विधा बळ करूं आम्ही चवघोचि जिष्णुचें मथन ९५

---

१ गोल्हाळातें, २ कवच, ३ द्वारकावासी, ४ उन्मत्तशब्दास, ५ कामहंता.मदनारि. (शिव.)

द्रोण म्हणे स्वस्ति असो हरिला मारिन म्हणेल कोण ससा
तूं धन्य बा गरुडसा जय त्या स्वाईन म्हणसि घोणसगा ९६
वदसी भलतेंचि कसें जें हास्यावह वदेल बालिश तें
एकें काय पराभव रामाचा न घडताचि बालिशतें ९७
प्राणाधिक बहु मत जो श्रीकृष्णा गोपलोकपाळाला
करिल मृषा अमरांच्या येतां क्षण कोप तो कपाळाला ९८
मूळ अनर्थाचें तूं कां क्षत्रिय निरपराध मारविशी
जा विजय-शरें मरतां भेदुनि जासिल नराऽधमा रविशी ९९
दुःशासनाहि मारिल मारिल कर्णाहि त्याहि कितवा हा
हित वाहा मित्र सम रू- गतिदा देवा तसेंचि मितवाहा १००
मी दुःशासन तिसरा कर्ण तिघे पांडवांसि माराया
आहों समर्थ युद्धचि व्हावें चिंता नसेचि बा राया १०१
ऐसें त्या अंधाला सांगत होतासि सर्वदा साचें
तें व्हावें तुज काम- क्रोध-कपट-लोभ-गर्वदासाचें १०२
तो पार्थ विशंक पुढें आहे जा गांठि घाल बापा हूं
कर्तव्य सर्व केलें कैसें करितोसि युद्ध बा पाहूं १०३
जिष्णुशरें तुज मरण श्लाघ्यचि शेवट नृपा करीं गोड
सोड स्वजीवनाशा लौंड करीं धैर्य-शर गुणीं जोड १०४
अद्भुत ऐश्वर्य बळें मेळविलें भोगिलें दिल्हें उरलें
स्फुरलें बरें रणमरण तेज तुझें श्रेय सर्वही पुरलें १०५

---

१ सिंहाला, २ सर्पविशेष, ३ दैवाला, ४ देकणा.

ऐसें वदोनि गेला गुरु-हरि पर-गज-घटेकडे नीट[1]
धीट द्विधा करुनि बळ करिति समर धरुनि जीवितीं नीट १०६

---

## अध्याय.२१

नसतांही शस्त्र करीं चवथ्या यामांत घात लाग रणीं
दैवें स्व-पर-विवेचन जें या कामांत घातला तरणीं १
वाटे स्वकरसहस्रें करुनि द्रव दिव्य कनक सारवितो
शुचि करि हरुनि तमोमल होय जगदपत्य जनकसा रवि तो २
संध्या-विधि संपादिति जपती जोडूनि अंजलीला हो
भट धरिती क्षण आक्षण करितां संफुल्ल-कंज-लीला हो ३
करि जो परांसि विजया- नुमतें तो दैव सांत्वनपर सव्य
करवी बळेंचि दूरुनि हाका मारूनि भीम अपसव्य ४
डावविले भीमानें आज्ञेनें अर्जुनें वृषद्रोण
न करिल समयीं रुझें सूचविले धर्म धर्मपर कोण ५
दीप्त-दवा जेविं समे शकले कोणही जया न वाराया
स्वबळें अधिक विकळ करी शमनेपरा ज्वर जसा नवा राया ६
दुर्योधन कर्ण शकुनि शस्त्रांच्या शीघ्र वर्षती व्रातें
तप्तस्नेहा जळसें त्या क्षोभवि शस्त्रवर्ष तीव्रा तें ७

---

१ सारखा, २ सूर्य ( स्वकीय परकीय यांचा शोध लावण्याचें काम रवीस सांगितलें म्हणून तो आला ) ३ कृष्ण, ४ यादवपति, ५ एकीकडे सोडलें, ६ औषधानें ज्वर शमन करणारा, ७ तरुण ८ तापलेल्या तेलास.

त्यां सर्वांसहि दशदश- बाणांहीं तो महातपा वेधी
भीति-नदींत कुरूंची बहु मोहातें वहान पावे धी ८
पार्थ प्रलय-जलदसा दे दृष्टि करूनि हर्ष तिमिरासी
वंचक पुनरपि जैसे बहु परतां ग्राम हर्षनि मिरासी ९
अकुळीं श्रीविद्याशा समरीं शर वृष्टि घनरजोवृष्टि
असतांहि करिति सहसा नाहींच तसें भरूनियां दृष्टि १०
तो व्यामोहक संगर संसारचि त्यांत सर्वही भ्रमला
भ्रमला न गुरुचि दूर त्यागुनि गेला विरक्तसा गमला ११
उत्तर-देशीं होता द्रोण रणांतुनि निघोनि एकिकडे
बा त्याकडे न पाहों शकले पर सर्प जेविं केकिकडे १२
द्रुपद विराट तयांवरि गेले तत्तेज परम राया तें
द्रोण म्हणे योग्य रणीं हे दोघे वृद्ध पर मरायातें १३
द्रुपदाचे पौत्र तिघे तीं-बाणानीं पळांत लोळविले
स्वर्गासि चेदि केकय सृंजय वीर क्षणांत बोळविले १४
वृद्ध तरुणसे झटले समयीं कर्तव्य किमपि न विसरले
द्रोणें शिर हरितांहि न मागें ते एक पदहि काविं सरले १५
द्रुपदें धरितां प्रकुपित- सिंहाऽतिक्रमण-कर-करीश-पथ
क्रोधें धृष्टद्युम्न द्रोण-वधाकारणें करी शपथ १६
मग खगपति-गति धांवे पांडव-पांचाळ-वीर-सहित रणीं
तो धृष्टद्युम्न गमे साक्षात् महिराहु विंम महिमेरंणी १७

---

१ वतनदार, २ दाटधुळीची वृष्टी, ३ मोहकारक, ४ मयूराकडे, ५ द्रोणावर, ६ नातू, ७ कोपलेल्यासिंहाचेंउल्लंघनकरणारा जोकरींद्र त्याचामार्ग, ८ पृथ्वीवरचाराहु, ९ द्रोण, १० पृथ्वीवरचा सूर्य.

कर्ण शकुनि दुर्योधन तदनुज जे मुख्य मुख्य ते ज्यातें
रक्षित होते त्यांच्या कैसे पर साहतील तेजातें १८
वध केंचा न दुरूनहि पांचाळां गुरुकडे पहावेना
ते पळती भीमाला हृदयींचें शल्यसें सहावेना १९
भीम म्हणे रे धृष्ट- द्युम्ना फळलासि आज पोकळसा
वचनासि कुलज न शिरा स्ववरासि न देवता जपो कळसा २०
पितृकृत-मारण जें तूं तें जसि शिखीसमान साहसि तें
मरणाधिक दुःख तुझ्या होइल वांचोनि मानसा हसितें २१
तूं मजकडे तरि पहा जरि तुज त्या अरिकडे पहावेना
जातों मीच मला तो सोसूनि स्वजन-वध रहावेना २२
द्रोणबळांत वृकोदर शिरला हो बळि-बळांत मघवासा
तें त्यो बहु भी हरि-पद- तुळसीच्या जेविं सर्व अघ वासा २३
धृष्टद्युम्नहि देहीं ज्वरसा कुरुगुरु-बलांत शिरला हो
निकट भिडोनि म्हणे अरि माझा मत्तात-शत्रु-शिर लाहो २४
अपसव्य करूनि नकुळें तेव्हां कुरुपति रणीं विमुख केला
सहदेवें दुःशासन- सूत नकळतां यमालया नेला २५
भीमाची कर्णानें शरनिकरें फिरविली गदा मागें
ध्वज मथुनि सूत मूर्च्छित करि क्रुत्या जेविं मुरडली रागें २६
होउनि विरथ वृकोदर नकुल-रथावरि चढे कदे कोपें
द्रोणार्जुनरणाहि परिस ज्याचें कथनहि नृपा नव्हे सोपें २७

---

१अग्नीसारिखा, २ द्रोणाकडे, ३ बळीच्यासैन्यांत, ४इंद्रासारिखा, ५सैन्य, ६ भीमा, ७रस्त्र, ८ मागेंफिरली;

गगनांत आमिषार्थ[1] श्येनाचें युद्ध नरवरा होतें
तेविं म्हणावें तरि हा दृष्टांतीं शब्द न रवं राहो तें २८
करिवर हरि शरभाहि पक्ष अक्षचि निशाचर तसेच दानवही
यांसम हे यांच्या गुण- लिपिसि पुरेल न मही-समान वही २९
कौरव-पांडव-कटकें झालीं जैसीं पटाऽर्पितें चित्रें
गुरुनें जैसीं केलीं कुतुकें तैसींच विष्णुच्या मित्रें ३०
शिष्याला गुरु गुरुला शिष्यहि त्या रणमरवांत आटेना
दाटे नारद-कंठहि युद्ध पुरेसें कदापि वाटेना ३१
शिष्यें निवारिलीं बहु ऐंद्र-प्रमुखेंहि वाडवेशास्त्रें[2]
म्हणती सच्छिष्या तों तिलमात्र उणें न पाडवें शास्त्रें ३२
पार्था-पुढें न चाले यत्न परि न सगुरु तो असुख पावे
झालों मी धन्य म्हणे यासीं भिडतां रणीं असें खपावें ३३
स्वगुरुसि म्हणे यशें तुज- सम सचिर विभो टिको परम हर्षे
पितृमन लागुनि दे प्रिय- शिशचा सुखकोटि कोंपर महर्षे ३४
जरि आपणासि आपण कल्पुनि रुद्र द्विधा करिल समर
तरि उपमा होय असें म्हणती शक्रादि सर्वही अमर ३५
सुर नर करीत होते मानुनि परमेश्वरा-सम स्तवन
ते चंद्र सूर्य जाणों जलजांचें कटकनें समस्त वन ३६
मग भगवान् द्रोण करी ब्रम्हास्त्राचा प्रयोग बा राजा
असमर्थ सहायाला बहु तेजस्वीहि अर्क बाण[3] ज्या ३७

---

१ मांसार्थ, २ वाडव-ईश-अस्त्र; द्रोणाचीं अस्त्रें, ३ बाण.

लोक गडबडे जैसा    निरुदक-देशीं दवा१ नळीं सार्थ
शमवी ब्रम्हास्त्रेंचि    ब्रम्हास्त्रातें प्रबुद्धी पार्थ ३८
तों दुःशासन धांवे    वाराया द्रुपदराज तनयातें
त्यास रणीं विमुख करी    तो धर्मन्याय जेविं अनयातें ३९
कृतवर्मा एक निघे    तव कृत हे वीर कोपले चवघे
दोघे नकुळें दोघे    सहदेवें२ खरिन वारिले अवघे ४०
पाहुनि प्रात नगाभीं    तैसे भट रोधिले निज येमानीं
धांवे दुर्योधन ये    मध्यें साधावया विजय मानीं ४१
हरिवरि हरिसा उठला    कोपें सात्यकि सुयोधनावरि तो
समयीं दाता हाता    ताता त्राता सुयोध नावैरि तो ४२
सात्यकिला दुर्योधन    पाहुनि हांसे म्हणे सख्या सुकवी
शक्र वीतमोह चुकवी    भोगा घरुजचि पयोधिला सुकवी ४३
बाल्यापासूनि तुज मज    सहवासें परम सूख करें गा तें
सख्य जिरालें क्षत्रा    ६ चारला सुकवि-मुख करें गानें ४४
शर धरुनि यदु म्हणे कुरु- गुरु-सदनीं सख्य आमुचें होतें
तेथेंचि स्वस्थ असो    आणावें संगरांत कां हो तें ४५
भूप म्हणे कोठें ती    कोठें ही प्राण घातक क्रीडा
दुरतिक्रम काळ उरे    धनलोभें प्रीति नीति न व्रीडा ४६
सात्यकि म्हणे कुरुवरा    ऐसाचि क्षत्रधर्म हा क्रूर
दूर स्नेह त्यागुनि    हाणिति गुरुतेंहि संगरीं शूर ४७

---

१ पांथस्थ. २ नकुलसहदेवाचीं, ३ आवरीतनाहीं ,४ गतमोह, ५ शत्रुकरी, ६ सात्यकि, ७ लज्जा.

जरि मी प्रिय तुज तरि तूं    भेदाया शिर उर प्रहार करीं
धरिल मज वराया गैति    बा खां धरितां क्षरम हार करीं ४८
जरि वधिशिल या समरीं    तरि मी पावेन सुकृत-लोकांतें
मजला न देखवे प्रिय-    मित्र-स्वजन-प्रणाश-शोकातें ४९
झालें प्रेमें भाषण    मग त्यांसीं युद्ध परम कोपानें
रचिती बहु शरपटलें    जाणों ते स्वर्गमार्ग-सोपानें ५०
सात्यकिचें धनु कुरुपति    कुरुपतिचें धन्व सात्यकी छेदी
भेदी मर्मे रविसा    पाहोंही आपणाकडे नेदी ५१
भंगे भूप निघे मग    सावध होउनि पुन्हाहि करि लगट
तों तद्रक्षणार्थ धांवे    कर्ण म्हणे शत्रु यासि करिल गट ५२
त्यावरि भीम उठे तों    कर्ण तयाच्या शरांसि तोडून
छेदी धनु-सूतातें    विकल करी विशिख-जाल सोडून ५३
दुःसह गदा-प्रहारें    ध्वज-कार्मुक-सूत-कनकरथचक्रें
मर्दुनि भीमें व्याकुळ    केला क्षण कर्ण बल जसा शक्रें ५४
रथ एकचक्र रविचा    जैसा शोभे तसाचि कर्णाचा
स्वर्णाचा मद तुरवी    होताचि असा प्रकर्ष-वर्णाचा ५५
तो धर्म भटांसि म्हणे    लिहिलें न चळेचि आयु धात्यानें
जेणें हस्तीं धरिलें    सफळ करावेंचि आयुधा त्यानें ५६
जे आमुचे प्रिय परम    सर्वस्व प्राण शिर अहो भट हो
ते अडकले अरि-बळीं    धांवा रे काय पाहतां फटे हो ५७

---

१सुगति, २हातीं, ३पुण्यलोकांतें, ४आकाशमार्गाच्यापायऱ्या, ५धनुष्य, ६न देई, ७त्याच्यारक्षणार्थ, ८शरसमूह, ९सुवर्णाचा, १० ब्रम्हदेवानें, ११मार्ग, १२होवो.

मेलों कीर्ति-धनाचा    जरि करितां सोस वेचुना नाकीं
सोसे कुळजा मृत्यु न    अयशाचा सोसवे चुना नोकीं ५८
या धर्माच्या बोधें    गेले पांचाळ मत्स्य गुरु-वरते
कीं निज-धर्मापासुनि    मिळती जेजे अभीष्ट गुरु वर ते ५९
येम भीम म्हणति हाका    मारुनि ये धांव अर्जुना क्षिप्र
त्वां कुरु मर्दावे मग    माराया सांपडेल हा विप्र    ६०
त्या समयीं द्रोणानें    प्रकट करुनियां महास्त्र कोपानें
केला बहु-शत्रु-बळ-    क्षय पूर्वी जेविं रुद्र-रोपानें    ६१
गुरुशर-निकर-दवाऽनल    सृंजय पांचाळ भासले शरभ
बलभद्राऽनुजनि म्हणे    हा सिंहचि सर्व यापुढें कलभ ६२
अति तूर्ण जयाविषयीं    योग करा त्यजुनि धर्म पांडव हो
या विप्ररूप-दहनीं    तुमचें न समग्र सैन्य खांडव हो ६३
जों आहे चाप करीं    तों हा ब्राम्हण न आवरायाचा
जाईल यापुढें बा    त्या देवांच्याहि आव रायाचा    ६४
होइल मनुष्य-वध्य    द्विजवर जरि करिल आयुधन्यास
या जेव्हां सोडिल धनु    सोडिल तेव्हांचि आयु धन्यास ६५
जरि तो मरेल अश्व-    त्थामा हा तरिच शस्त्र सोडील
हें न घडतां शिरें या    सर्वांचींही रणांत तोडील    ६६
अश्वत्थामा मेला    हें मिथ्या म्हणुनि हाय सांगावें
अनृत बहुमत व्यसनीं    जाया प्रेतत्व वायासां गावें ६७

१ नाकावर, २ नकुलसहदेव, ३ द्रोण, ४ कीटकविशेष (टोळ), ५ बलभद्र-अनुजनि-कृष्ण, ६ गजछावे, ७ युक्ति, ८ इंद्राचा, ९ शस्त्रत्याग, + होवू,

हाचि उपाय प्राण- व्यसनीं सर्वांसि आज तारील
वारील शक्रहि न या सर्वांसहि संगरांत मारील ६८
बाल्यापासूनि बहु गुरु- वत्सल जो गुरुसि तोकसा[1] मान्य
होइल अर्जुन तादृश- घातोपायासि तो करा मान्य ६९
भीमादि सुखें वळले म्हणति जयोपाय हा असामान्य
हित-कर न जगीं कोण्हीं आम्हां या कृष्णाजीअसा मान्य ७०
कष्टें धर्म झाला बहु हिक्को[2]ऽर्तासि लशुनसा मान्य
कीं त्रिजग द्रुरुवर-वच जो न करिल तोचि पशु न सामान्य
शत्रु-प्रदीप ज्याच्या लीला-श्वासेंचि मालवे शतदा
तो कदन करित होता पांडव-कटकांत मौलवेश[3] तदा ७२
तन्नामें इंद्रवर्मा अश्वत्थामा तदीय-नागाचें[4]
त्याचें भीमें केलें पक्षिवरें कदन जेविं नागाचें[5] ७३
मेला अश्वत्थामा हें ऐकविलें गुरूसि मग राजा
तो भी कृत-शोका कीं नच तरले दशरथादि मगरा+ ज्या ७४
श्रवणीं शिरतां प्रथमचि ती द्रोणा होय शोकदा[6] वार्ता
कृतवीर्य-विचार-सखा- घन निववी शीघ्र शोकदावार्ता ७५
लटकी वार्ता ऐसा निश्चय चित्तीं करूनि जो जवळ
भिडला होता द्रौपद[7] त्याचा पाहे करावया कवळ ७६
ध्वज धनु खंडुनि मारी तो तात्काळ स्वमृत्यु[8]सूतातें
त्या अहितातें न गणी हरि-सेवक जेविं काळ-दूतातें ७७

---

१ अपत्यसा, २ उचकीनें पीडित झाल्यास, ३ मालवदेशाधिपती, ४ गजाचें, ५ सर्पाचें, ६ शोकरूप अरण्याग्नीनें पीडित अशा द्रोणास, ७ धृष्टद्युम्न, ८ स्वमृत्यु जो धृष्टद्युम्न त्याच्या सूतातें, + सुसरीला (कृतशोकरूप मगरानें दशरथादिकांस गिळून टाकिलें तसें मला गिळील असा भाव.)

दुसरेंहि खंडिलें धनु    जें हस्तीं शस्त्र शत्रुनें धरिलें
तें तें सर्व द्रोणें    दुर्दैवें वस्तु-मात्रसें हरिलें    ७८

धृष्टद्युम्न स्वहय    द्रोण-हयांमाजि होय शिरकविता
त्याची मिठी सकळ बळ    कंपित करि जेविं तर्ज्ञ-शिर कविता

तत्काळ द्रोण प्रभु    ईषा रथचक्रबंधनें तोडी
धृष्टद्युम्न तयावरि    गरगर फिरउनि महागदा सोडी    ८०

विप्र क्षिप्र गदेतें    खंडी दंडीं जसाचि आशांतें.
पसरिति त्याच्या विजया    कटकें जैसीं घनासि आशीतें    ८१

मग खड्ग चर्म घेउनि    यत्न करी श्येनसाचि झडपाया
वाटे त्यास स्वतनु-    प्रासादाचा नसेचि झडपा या    ८२

रथ शक्तिनें पद तुरग    वधुनि करी स्वहय मोकळे विप्र
विप्रतिमद्विष खंडी    तेव्हां वैतस्ति केंचुनी क्षिप्र    ८३

विरथ विशस्त्र करूनि त्या    द्रुपद-सुत-वधार्थ बाण जो सोडी
त्यातें दश विशिखांहीं    शिनिपुंगव बहु पराक्रमें तोडी    ८४

तें पाहुनि पार्थ म्हणे    पीतपटा परमपूरुषा पाहें
कर्ण-द्रोण-कृपांत    स्वस्थ कसा सात्यकी नवल बा हें    ८५

सत्कवि निज वाचेला    म्हणतिल बहु मधुर-वाणि-मैने या
रामा कृष्णा मग गा    आधीं तूं तत्प्रियाचि शैनेया    ८६

कर्ण-द्रोण-कृपांत    द्विरदांत विशंक सिंहसा राजे
लाजविले ते धन्वी    म्हणवुनि घेतें जगन्निवासा जे    ८७

---

१ कवितारसज्ञ, २ धूर, ३ संन्यासी, ४ पक्षिविशेष, ५ आपले शरीररूप राजवाड्याचा, ६ दरवाजा, ७ प्रतिमारहित, ८ वीतस्तीत लांबीच्या बाणांनीं, ९ सात्यकि, १० हे कृष्णा, ११ वाणीरूप मैनेला. १२ सात्यकिला.

तेज न नव प्रसादें कोणांतहि सात्यकिस लया नेतें
येणें दृष्टि-सुख दिलें द्यावें त्वत्पाद-किसलयानें तें ८८
इतुक्यांत सुयोधन-मुख नव सुत कृप कर्ण अन्यही योध
क्रोध-मदांध चहुंकडुनि करिती शिनिसूनुचा रणीं रोध ८९
यम भीम धर्म समरीं बहुतचि शैनेय-रक्षणीं जपले
तपले परि पर पक्ष ते यदुपति-पक्षपतिपुढें प्रचुर खपले ९०
वदले सुर देवासुर- सम त्या आयोधना शपथ करुनी
न तुम्ही किमपि गिळविलें ऐसा हा योधनाश पथकरुनी ९१
धर्म म्हणे क्षत्रिय हो यत्न करा कुंभयोनिला वेढा
जाणा पार्षत-तेजें गिळिलाचि बुभुक्षितें जसा पेढा ९२
आज्ञा होतांचि सकळ पांचाळ-प्रमुख वीर बलजलधी
बुडवाया धांवे परि तो घटज तसाचि हाहि निश्चल-धी ९३
गुरु परबळें बळकरग जेविं न करिजेल लग्न हळदीनें
पीतिमगुणें शुचिकनक- रुचि कीं लज्जेंत मग्न हळदीनें ९४
धांवे रणार्थ गुरु तों तद्वामाक्षि स्फुरे पडे उल्का
समजुनि म्हणे बरावी सुगति समर्पूनि जीविना शुल्का ९५
योजुनि तो ब्रम्हास्त्र क्षत्रिय विंशति-सहस्त्र बा मारी
अन्य दशाऽयुत मर्दुनि ठाके निःशंक जेविं कामारी ९६
सुविषण्ण विरथ पार्षत परमोपद्रुस्त पाहिला भीमें
धांवोनि स्व-रथीं तो बा जेविं स्कंद वाहिला भीमें ९७

१ तुझ्या पादपल्लवानें, २ सात्यकीच्या, ३ पुष्कळ, ४ युद्धास, ५ द्रोणाला, ६ धृष्टद्युम्नाच्यातेजानें, ७ स्थिरबुद्धी, ८ तत्-वाम-अक्षि-त्याचा डावा डोळा, ९ मोला, १० खिन्न, ११ परम-आपत्-ग्रस्त-महाविपत्तीनें ग्रासलेला, १२ शिवानें, + बळरामाच्या हातांतील, ∗ नागर, ✱ निर्बळपुरुषें.

त्या अभिभव-विकळाला स्वस्यंदन चाप धीर दे हातें
थापटुनि पृष्ठ-देशीं कुरवाळुनि तो स्वधीर दे हातें ९८
अन्य-[1]दुर्वह हा गुरु- वध-भार शिरीं तुझ्याचि आजि असे
[2]बाहु न तुटतां व्हावें निर्विण्ण न आदरूनि आजि असे ९९
धं[3]तां भीम-कृत असा उत्साहविवृद्धि-हेतु बोध मनें
होय अधिक तेजस्वी जाणों नररूप वन्हि तो धमनें १००
द्रुपद[4]कृत गुरुसि गांठुनि झांकी इषुनीं हुताश-विष-कटुनीं
कैकय शिबि बाल्हिक कौरव-कटकें क्षणांत विसकटुनी १०१
कार्ये पाठविला द्विज मारावा हा निरोप ज्याला तें
धनु खंडुनि गुरुनें त्याहि दिली हानि रोप[5]-जालानें १०२.
तेव्हां पांचालांहीं कांहीं मागें पुढें न पाहून
गुरु गांठिलाचि जाणुनि रण-मरण अधिक जप-तपाहून १०३
धूम-जालें रवि गगनीं क्षण नाहींसाचि लोपला होतो
गुरुहि तसाचि पर-शर- व्रातें मग फार कोपला होतो १०४
पर सर्व धैर्य-पर्वत गमला गुरु [6]हरि नदीय विशिख [7]पवी
कीं सकळाला लीला- लेशें कुरवाळुनीहि शिर खपवी १०५
वधिले पांचाळ अयुत- युग सृंजय षट् सहस्र समरांत
गज अयुत हय अयुत तें कर्म करी प्रकट कंप अमरांत १०६
जे मत्स्य वीर मथिले गमले ते मर्त्य न रवि पन्नास
प्रेमें कां [8]गति-नवरी न वरील द्रोण-शर-[9]विपन्नास १०७

---

१राहे, २ बाहूंचें विशेषण, ३ फुंकण्यानें, ४ अग्नि आणि विष यांसारिखे तीक्ष्ण अशा ५ बाणसमूहानें, ६ इंद्र, ७ वज्र, ८ गतिरूप नवरी, ९ द्रोणशरांनीं विपन्न (मृत) जे त्यांस.

क्षत्र-विनाशीं द्रोण श्री-भार्गवसा प्रवर्ततां क्षिप्र
तेथें धांवुनि आले विश्वामित्रादि जे महा विप्र १०८
भृगु अंगिरा मरीचि पृश्नि सिकत वालखिल्य हे राया
अग्नि पुढें करुनि वदति कीं शकति मुखाकडे न हेराया १०९
बा हा तव निधनसमय चाल कसा ब्रम्हलोकवास करीं
यावा नित्य कुशाचा या बाणाचा कधीं न वास करीं ११०
ये उत्तम-लोका यो म्हणती घात कवि लोक-वासासी
विनविति नयनातें कीं विप्र न घातक विलोकया सोसी १११
त्वां ब्रम्हास्त्रें केले दग्ध अनस्त्रज्ञ नर न हा धर्म
शर्म समस्तां जीवां जेणें उचित द्विजांसि तें कर्म ११२
घडला अधर्म आतां शीघ्र करावाचि आयुध-न्यास
जेणें भूतहित नव्हे न रुचे तें पळहि आयु धन्यास ११३
भीम मुनि-वचन परिसुनि पाहुनि वध-सिद्ध रिपु पुरोवर्ती
द्रोण म्हणे आयूची सरलीच पुरेल तों पुरो वेर्ती ११४
सुत मृत कीं न मृत असें जावें धर्मासि तरि पुसायास
कीं एक सत्यवादी हो भासे रिपुहि न रिपुसा ग्यास ११५
मिळतां त्रिभुवन-राज्यहि अैनृत न बोलेल धर्म-स्कत लेश
हा सत्य-संध जाणे जैसा तो सत्य-धर्म स्कतलेश ११६
ठावी मज प्रतिज्ञा वत्साची सत्यशी लहानपणीं
बाळांत खेळतां तिळ- भरि चळला सत्यशील हा न पणीं ११७

---

१पहाण्यारा,२हातीं, ३ मृत्युलोकवासास,४दाखवा,५स-असि-सखड्ग,६अस्त्रनजाणते,७ शस्त्रत्याग,८भयंकर,९समीपभागींरहाणारा,१०वान ,११धर्मास,१२खोटें,१३ यमपुत्र (युधिष्ठिर),१४स्कतल-ईश- बळी.

गुरु होय असें योजुनि जों सिद्ध युधिष्ठिरा विचाराया
जाणे त्रिजगत्साक्षी कृष्ण द्रोणाचिया विचारा या ११८
अश्वत्थामा मेला कीं आहे गुरु असें पुसे धर्मा
तों कृष्ण म्हणे मेला म्हण कवि अनृतेंहि जोडिती धर्मा ११९
दिवसार्ध होय तों जरि युद्ध करिल वधिल सकळही सैन्य
दैन्यद होइल कार्मुक- तेजें भूभृत्-कुळा जसा वैन्य १२०
प्राणात्ययप्रसंगीं अनृत वदावें स्मरवें असें आहे
तुज जीवनदा मेघा चातकसे सर्व पसरिती आ हे १२१
आम्हां सर्वांतें गुरु- काळापासूनि आजि वांचीव
बहु-लक्ष-जीवजीवन- दानामित-सुकृत-सुवस्तु सांचीव १२२
भीम म्हणे गुरुवर-हरि- वचन अहो धर्मराज परिसा हो
दुःसह विषसेंचि अनृत हरिसा युष्मत्प्रताप परि साहो १२३
अश्वत्थामा मेला तुच्चारुनि मालवेंद्र-वर्म-करी
म्यां कथिलें परि सत्य प्रत्यय मद्वचन तन्मनीं न करी १२४
त्यजिल गुरु धैर्य धनुसह तुमच्याचि असे नयास विश्वास
कीं धर्म सत्यवादी हे आहे कीर्ति विदित विश्वास १२५
वळला प्रभु भीमोक्तें धर्महि कीं अचुक अर्थ तो भावी
क्षुद्र-पदीं लोभ धरी यन्मति न स्वःपदींहि लोभावी १२६
तों धर्मराज होउनि अनृत-भय-जलधि- मग्न जय-सक्त
अश्वत्थामा मेला व्यक्त म्हणे गज असेंहि अव्यक्त १२७

---

१ राजकुलास, २ प्राण-अत्यय-प्रसंग-प्राणनाशसमयीं, ३ तुमचा प्रताप, ४ मालवेंद्र नामक राजाचा गज, ५ जगास, ६ भीम-उक्त-भीमाच्या बोलण्यानें, ७ स्वर्गपदीं, ८ लोभयुक्त व्हावी, ९ स्पष्ट, १० अस्पष्ट, + धर्माला.

रथ भूवरि चतुरंगुळ  उच्छ्रित त्या धर्मसूनुचा चाले
झाले ऐसें वदतां  भूस्पर्शक प्राकृतपणासि हय आले  १२८

अश्वत्थामा मेला  हें ऐकुनि धर्मवाक्य तो कानें
जीवित-निराश झाला  गुरु होउनि तप्त पुत्र-शोकानें  १२९

पांडव साधु तयांचा  आपण केवळ कृतघ्न अपराधी
ऐशी त्या ऋषि-वाक्यें  झाली नाहींच त्यास अपराधी १३०

त्या धृष्टद्युम्नासहि  पाहुनि उद्विग्न होय परम रणीं
गेला सरवाहि सोडुनि  तो जो उत्साह-हेतु पर-मरणीं  १३१

तों पार्षत दिव्य-विशिख  तक्षकसा जैत्र-कार्मुकीं योजी
आपणचि गुरु विनाशीं  कारण तुमच्या मनीं असें योजी १३२

त्याच्या निवारणीं करि  यत्न परि न योग्य राहिलें शस्त्र
त्या समयीं एकहि वा  कुरु-गुरु-हृदयांत न स्फुरे अस्त्र १३३

चारि दिवस एक निशा  पंचमदिवस त्रिभागपर्यंत
पुरले शर सरले मग  गुरुला कैसा घडेल अर्यंत  १३४

द्रुपदसुतें सोडावा  शर तों गुरुनिकट भीम ये राजा
बोले उक्ति वदवतिल  न कधींहि तशा समीप येरा ज्या १३५

गुरुजी स्वभक्षय कां  होता जरि न करितां तुम्ही युद्ध
शूद्र स्वधर्म सोडुनि  परधर्मी न प्रवर्तले शूद्र  १३६

धर्म अहिंसा त्याचें  मूल ब्राह्मण तुम्हींच हें कथिलें
रजतापुढें कसें जी  शिखावें तेज आपुलें कथिलें  १३७

---

१उंच, २पृथ्वीस्पर्शकरणारे, ३द्रोण, ४अश्वत्थामा, ५जयनशील अशा धनुष्यीं, ६येवूं, ७अरि-अंत-शत्रुनाश, ८इतरास, ९रुप्यापुढें, १० कथिलानें (धातुविशेष)

करितां काय ब्राम्हण मुख्य तुम्हीं ब्रम्हवित्तम[1] रणातें
मेळवितां पुत्राच्या परिसूनि काशास वित्त मरणातें १३८
पर-धर्मस्थ तुम्ही कां निज-धर्मस्था जनांसि बुडवीतां
जे चरणा शरणागत सांष्टांग-प्रणत त्यांसि तुडवीतां १३९
ज्या एका पुत्रास्तव अर्थ अनयही[2] करूनि जोडावा
तो मेला फळ झालें आजुनि तरि हा अधर्म सोडावा १४०
कोणही सुतादि-नाश- व्यसनीं न करूनि अनय न बुडाला
हाटुनि अमृतघटा च्या नुकेरिल[3] भवदन्य[4] अनयन बुडाला[5] १४१
ज्याच्या वचनीं धरिती बहु सर्वहि सुज्ञ लोक विश्वास
अनृत वदेल कसा तो सोडीना व्यर्थ जो कवि[6] श्वास १४२
त्या धर्माच्या वचनीं तुमचा नाहींच लेश विश्वास
हेंहि अधर्माचें फळ पाहे स्वसमचि खलेश[*] विश्वास १४३
एवंविध भीम-वचन परिसूनि सुनिराश जीवितीं होय
तो यज्ञसेन-सुत-भय धनु सोडी जीवितासही तोय[8] १४४
गुरु मग म्हणे अहो कृप नृप कर्ण समस्त वीर हो हा मी
शस्त्रास्त्रांतें त्यजितों विटलों अत्यंत जीवितीं धामीं १४५
पांडु-सुतांपासूनि स्वस्ति तुम्हांकारणें असो भटहो
सखा मार्कंडेया दैव रणेकार्णवांतरीं[9] वट हो १४६
करि हा अश्वत्थामन् सत्पुत्र असें म्हणोनि आक्रोश
त्या सुत-मृति-व्रजा[10] जसि[+] मोडी क्षण तीं पडोनि सों[‡] कोश १४७

१ ब्रम्हज्ञश्रेष्ठ. २ अन्याय, ३ नउकरिल, ४ अंध, ५ अमृतघटाच्याबुडाला, (तळास) ६ जगास, ७ धृष्टद्युम्नाचें भय, ८ पाणी, ९ रणहाच कोणीएक अर्णव (समुद्र) त्यांत, १० गोकुळाला. * खल-ईश-दुर्योधन, + पूतना, ‡ सहा.

करुनि परांतें योजुनि परमास्त्र[1]विधी सभल्ल भल्ल रणीं
शस्त्रें सोडुनि झाला निरत श्री-प्राणवल्लभ-स्मरणीं १४८
तों धनु ठेउनि पार्षत धांवे घेऊनि असि वधा त्याच्या
आलें मनासि अरिच्या किंवा तें कर्म अशिव[4] धात्याच्या १४९
कौरव-कटकीं हा हा पांडवकटकींहि होय बहु हा हा
हा हा दश-दिग्भागीं म्हणति वध न योग्य रुक्मवाहा हा १५०
निज-योग-धारणेनें द्रोणमुनि करी शरीर-संन्यास
त्याचें त्याला किंवा तज्ज्ञाला तें कळे न अन्यास १५१
ज्योतिर्भूत[6] द्रोण व्योमीं दुसरा द्युदीपसा[7] गमला
तो ब्रम्हलोक-गामी दुष्टा दुर्दर्श पार्षत भ्रमला १५२
अश्वत्थामा अर्जुन कृष्ण युधिष्ठिरहि तेज तें पाहे
आहे प्रसाद मुनिंचा तद्दर्शन म्हणुनि दास हा त्याहे १५३
धांवे न्यस्तायुध[10] शिर कापाया धरुनि मनि कुडी लीजों
नेणे पार्षत गुरुच्या तो नव्हता स्पर्शला कुडाला जों १५४
पार्थ रथावरुनि उडी टाकुनि धांवूनि शीघ्र नर वारी
तन्हि लाविलीच दुष्टें कंठीं कच धरुनि शीघ्र तरवारी १५५
न वधावें न वधावें ऐसें म्हणतांहि तो महा पापी
कापी गुरुचें मस्तक तच्छोकसरांस ही बहु व्यापी १५६
तें कौरवांकडे शिर बहु गर्जुनि पार्षतें उडविलें हो
यश सर्व बुडविलें हो गमलें पंकज पदें तुडविलें हो १५७

१ ब्रम्हास्त्रादिकांचें विधान, २ लंपट, ३ श्रीकृष्णस्मरणीं, ४ निंद्य, ५ धृष्टद्युम्ना, ६ तेजोरूपी, ७ स्वर्गस्थदीपसा, ८ व्यासाचा, ९ संजय, १० शस्त्ररहित, ११ दुष्टमति, १२ लज्जितव्हायास,

भीम प्रळय-जलदसा गर्जे पार्षत-गळां मिठी घाली
भ्याली बहु कुरुसेना शीघ्र पलायन-परायणा झाली १५८
भीम तसा जैसा हरि हरिनें वधितांचि कनककशिपु निवे
पार्षतचमू म्हणे निज- पतिंच म्हणसि हर्षजनक कशि पुनिवे
दुःशासन कर्ण शकुनि कृप कृतवर्मा सुयोधनहि मानी
सर्वहि विरे नृपा ज्या- परि परितापें सुयोध न हिमानी १६०
न कळ+ पडे सकळ पडे व्यसनीं पाहे सुयोध न हित रणीं
झाला गुरु-पात-महा- भय-राहु-मुखीं सुयोधनहि तरणी १६१
सुटतां पळ बळ देउनि वाजो बळजलधि आवरायाचा
कुरुप-गुरुपतन होतां प्रथमचि त्यो जाय आव रायाचा १६२
कौरव-बळ सकळ पळे त्यांत तुझा पुत्र ही असीमकर
तों ये अश्वत्थामा वीर स्रोतोभिमुख जसा मकर १६३
करुनि शिखंडी-प्रमुख- प्रबळ-भटांसीं महासमर सुटला
स्फुट लाजवुनि परांला आला तों कुरुबळाब्धि हा फुटला १६४
कुरुपतिस पुसे कां हो पळतां पळत्यांचियाचि सांगातें
ऐशा पलायनार्थें जें काय निमित्त तूर्ण सांगा तें १६५
गुरु-शोकें गहिंवरला महिंवर लाजे स्वयें कथायास
पाहे कृपाकडे तों सांगे गुरु-हानिची कथा यास १६६
वृत्त सविस्तर सर्व श्रवण करुनि परशुरामसा खवळे
कीं मंतुकेरा तक्षक सर्प कराया डसोनि राख वळे १६७

---

१ पलायनतत्परा, २ इंद्र, ३ हिरण्यकशिपु, ४ आपला स्वामी (चंद्र) ५ अत्यंत थंडी, ६ दुर्योधनाचा, ७ संधी न करणारा, ८ उदक प्रवाहाकडे मुख करून, ९ ग्राह, सुसर, १० स्पष्ट, ११ भूपति, १२ अश्वत्थाम्यास, १३ अपराधकर्त्यास, + विश्रांती.

## अध्याय. २२

द्रौणि म्हणे मदधिक जें केलें वात्सल्य नित्य मन्नातें
रे धर्मा रे भीमा कैसा रे विसरलासि मन्ना तें १
गोपीजन ठकवाया खाया नवनीत साय कनकपटें
च्याळों देइल माझ्या शिरतां अवनींत सायक न कपटें २
गुरुच्या सफळ कसा रे होइल तव राज्य-काम हा घातें
हा मंदा संपादुनि इत्सावें राज्य का महाघातें ३
शिवशिव कोण कुळज नर कपटें गुरुच्या करिल अहितातें
पांडव न शिष्य पाजुनि पय केले पुष्ट दुष्ट अहि नातें ४
परमास्त्ररहस्य नृपा आहे उपदेशिलें मला तातें
पांडव काय भजे स्मर- हर नयना तेज जें अलाता तें ५
समुपेक्षिलें ठकविलें पूतनामहिमानका पित्या सहसा
त्यां मारावे खळ ते कृतनामहि मानकापित्यासह सा ६
नारायणाऽस्त्र योजुनि करितों अहितांसि आजि भस्म रहा
कुतुक पहा म्हणतिल स्मर जग खातों काळ परम घस्मर हा ७
ऐसी महा प्रतिज्ञा परिसुनि कुरुकटक सर्वही परते
गर्जे सिंह-रवें तों धर्मादि समस्त वन्चकले पर ते ८
धर्म पुसे विजयातें सर्व पळाले भिवोनि गुरुपातें
गर्जति कां हे झाला बा कोण सहाय वीर कुरुपातें ९

---

१ वात्सल्य, २ अग्निकष्ठों, ३ सर्प, ४ ज्वलितकाष्ठास, ५ पूतना- महिमा- आनक- सेनेंचा महिमा कळविण्याविषयीं नोबदीसारिखा अशा, ६ पांडव आणि धृष्टद्युम्न, ७ कौतुक, ८ भक्षक, ९ भ्याले.

हा रव कोणाचा गा दर-दुंदुभि-सिंहनाद लोपवितो
वाटे सहाय त्याला झाला धरितो सदैव जो पवि तो[2] १०
जिष्णु म्हणे पळ परबळ - सागर जेणें गमे अनोद[3] रिता
हा गुरुसुत-रव जैसा भास्कर तेजोवरा[4] अनादरिता[5] ११
कुपित गुरुसुत सकळ पर- [6]दाराच्या आजि हरिल टिकल्याला[7]
जें करिवर-मदहर तें साहजिक न तेज हरि लटिक त्याला १२.
अनृत सुत-मरण सांगुनि गुरुकरवीं[8] त्वां धनुष्य सोडविलें
पार्षत-करें पितृशाना ऽधिक-गुरुचें शिर रणांत तोडविलें १३.
त्यां वधुनि घेतलें यश गति व्हाया कां न देशिकाकरवीं
जरि हंस काक सत्या ऽनृत तरि तूं कांन देशि काकरवीं[9] १४
स्वर्गपद ब्रम्हपदहि किंबहुना मोक्षपदहि सोडावें
श्रीगुरु-पदचि म्हणति कवि सर्वस्वार्पण करूनि जोडावें १५
राज्यपद अनर्थास्पद[10] केवळ त्याच्या धरूनि लोभातें
गुरुपद गमाविलें कीं गेलें घेऊनि सत्य शोभा तें १६
वालि-वधीं रामाचें द्रोण-वधीं हें तुझें अयश राजा
तो व्यर्थ असोनि सुरवी सत्य नरा ज्या नसे अयं[11] शरा ज्या
पक्षांत हळुच शिरला जेविं भरतनायका पिलें शिरतें
सद्गुरुचें निष्करुणें वाळुकसें होय कापिलें शिर तें १८
गुरुघातकासि आतां रक्षीं सामात्य तूं अजातारी

---

१ वज्र, २ इंद्र, ३ नादरहित, ४ तेजःश्रेष्ठ, ५ अपमानकर्ता, ६ शत्रूच्यास्त्रियांच्या, ७ कुंकुमतिलकाला, ८ गुरूकडून, ९ काकशब्दीं (अनृतीं), १० अनर्थाचेंस्थान, ११ लोहाग्र.

नच पर/नर-कुंजर जो    त्या हरिपासूनियां अजा नारी १९
बहु वय सरलें उरलें    थोडें तों काय कर्म बोडवलें
सिंधु बहु तरुनि शेपीं    कैसें बा सत्व-उडुप फोडवलें २०
हाहा उपेक्षिला गुरु    या पापें पावलोंचि नरका मी
बुडतो सर्व बुडवितो    लोभी क्रोधी तसाचि नर कामी २१
सर्वहि उगेचि होते    ऐसा गुरुशोक अर्जुनें करितां
वरितां उदासपण बहु    चापलता त्यजुनि मृदुलता धरितां २२
भीम म्हणे चालविला    वर्षे संन्यासि-धर्म हा तेरा
क्षत्रिय धरिति कराया    समरीं ऐसेंचि कर्म होतेरा २३
सर्वस्व, हरुनि कपटें    स्त्रीचीही सोडिली निरी हातें
क्षमिलें खलकृत-धर्षण    दुःसह कपिलें अशा निरीहातें २४
समय न विलंघिला तरि    जीवनहि हरावया झगडतात
सुज्ञहि उगाचि आम्हां-    विषयीं झाला खरा दगड तात २५
त्वदनुमतें या हिततम-    कृष्णाऽनुमतेंचि धर्म वर्ततसे
नहि खल अति-दुस्तर हे    तिमिरीं पथ सर्पगर्भगर्त तसे २६
सर्व यथाशक्ति रणीं    झटतों विजयार्थ धरुनियां सदेसी
त्या आम्हां अति दुःसह    जेविं क्षार क्षतीं असें वदसी २७
वर्णुनि गुरु सत भिववसि    मज खल-बल-व्रात-भयावहा काय
आहे गदा सहाय    द्रोणिपुढें धरिल दर न हा काय २८
व्यसनीं मद्धृदयातें    ऐसें बोलों नको विदाराया

१सत्वरूपनौका, २ शत्यास, ३ नामविशेष, (ऋषि) ४निरिच्छातें, ५सर्पआहेतज्यांचे पोटींअसेखळगे, ६सत्-असि, ७व्रणांत, ८ भीती, ९ देह.

व्यसनीं दुखविसि निष्ठुर केसें बोलोन कोविदा राया २९
द्रौणि किती द्रोणाचल यों[2] भस्मचि करिन तो गदाघातें
भगवत्स्मरणें भगवत्- भक्त जसा नरकभोगदा[3] घातें ३०
त्यजुनि भय स्वस्थ रहा म्हणवी धर्मा हतासि हा नर वा
हा नर-[4]वासव देइल न सलोकप-मृत्युच्याहि मान रवा ३१
थ्यालासि कृष्ण सारथि असतां वद सत्य पांडवा खातो
नरकीं नग पाहे लचि जरि गिळिलहि सत्य पांड वारवातो ३२
पार्थतहि म्हणे होता षट्कर्मी निरत काय हा नियमें
केली जेविं करावी बहु-जीवनिकाय-काय- हानि यमें ३३
त्यजुनि स्वधर्म झाला पर-धर्माऽश्रित अशांत जरि पिकेला
हा ब्राम्हण-[6]ब्रुव ध्रुव धन घेउनि कौरवां स्वयें विकला ३४
क्षत्रिय-धर्महि उत्तम परि त्यातें नीट चालवीना कीं
यन्निष्ठा पुरुषातें स्वर्गश्री नित्य पाळवी नाकीं ३५
मह्लांधवच्च खपविले इतरांसि नसेचि अवधि लेखाया
यां अधमापरि वाटे त्या घट[9]कर्णेंहि न वधिले खाया ३६
यावा कनककशिपुचा जैसा तैसाचि हा वध मनातें
कैंचा द्विज कैंचा गुरु दुरितें[10] करुनि बुडवितो अधम नातें ३७
अर्जुनजी स्मृत नव्हे अरि अति दारुण असा वधाना नें
खल सावधान न मरे तरि मारावें असावधानातें ३८
केला तन्नीतेंही ग्याया तांबूल- कवल आ ज्यास

---

१ आणत्या, २ येवो, ३ नरक भोगदेणाऱ्यापापातें, ४ नरेंद्र, ५ इंद्र, ६ ब्राम्हणम्हणविणारा, ७ बोलावी, ८ द्रोण, ९ कुंभकर्णें, १० पाप, ११ पांडुनेंही.

शर-शयनीं न निजविलें काय तुवां त्या तशाहि आर्य्यास ३९
बापाचा परम सखा जो नृप भगदत्त बापसा मान्य
पोटीं पाडुनि कपटें वधिला तें काय पाप सामान्य ४०
गेलें काय तुझें त्यां जरि पितृघातक हरूनि मद वधिला
खल जो मवर्तला जन सकळ वधाया करूनि मदें वधिला ४१
भगिनी-भाच्या-करितां आवरुनी चाप रोषें हा साहो
द्रुपदसुत-भुज स्तवना योग्य न नीचा परोपहासा हो ४२
रामें रावणसा हा त्यांचि वधावा रणीं असें होतें
याजोपयाज-मुनि-कृत होइल लटिकें तुम्हां कसें हो तें ४३
धर्माकडे मजकडे नाहींच अधर्म-लेश हा कांहीं
शिष्यद्रोहें मेला गेला परतेल काय हा कांहीं ४४
पार्षत-कृत गुरु-दूषण बहुतचि मज सर्व वर्णवेना तें
धिक् धिक् सकळहि म्हणती त्यासम जे सर्व वर्ण वेनातें ४५
अश्रु-परिप्लुत-नयनें धृष्टद्युम्नाकडे विजय पाहे
राहे धर्म अधोमुख भीमहि कोण्हासही न तें साहे ४६
शैनेय म्हणे कैसें वदतो जाणों नव्हेचि पापीसा
नाहीं कोणी येथें याची जिव्हा समूळ कापीसा ४७
सत्य रसज्ञा म्हणतों गुरुनिंदा बोलतां तडकलीला
करितील दर्शनार्थ प्रियसख हे बोल तांतड कलीला ४८

---

१ भीष्मास, २ भगदत्त वृद्ध झाल्यानें त्याच्या डोळ्यांच्या पापण्याचे केश फार लांब झाले होते म्हणून तो त्या पापण्यास रेशीम बांधून मुकुटास बांधित असे, ३ मनुष्य वधि-माझ्या मर्यादेला, ४ बाणाविशेष, ५ पर-उपहास- शत्रूनीं केलेल्या निंदेस, ६ नामविशेष (ऋषि) ७ सात्यकी, ८ जिव्हा. + रोदनोदकयुक्त नेत्रानें.

जीभ चिरावी शतधा शिरहि उलावें खळा भुज गळावे
श्वपच[1]-गृहाला पथिक द्विजसे सोडुनि तुला असू पळावे ४९
हितशत्रु कामसुख हे नरकीं म्हणती अपत्रपा[‡] पड सा[+]
पाप डसाया लाविल अहि वृश्चिक भाजशील पापडसा ५०
त्वां सम अवैर[2] पर जे त्यांतें नरकांत घातलें कानें
परि रूनि म्हणेल पौर्षत[3] केला द्रोणें न घात लेंकानें ५१
भीष्में महानुभावें आदरिला तो तसा स्वयें स्वांत[4]
तूं जोंवि कृतघ्न तसें मानी शूद्रासही[∗∗] तुझें स्वांतें[5] ५२
भीष्म-वधींहि शिखंडी कारण उत्पादिला तुझ्या बापें
कोण तुम्हां द्रुपद-सुतां- वांचुनि जोडील हीं महापापें ५३
ब्रम्हघ्ना जन पाहे तुज सहसा आजि पाहुनि रवीला
द्विज-राजघ्ना[6] बहुधा विधिनें तुजलाचि राहु निरवीला ५४
सरलें आयुष्य तरिच निंदिसि तूं मत्समक्ष गुरुगुरुतें[7]
मांजर वांचेल कसें करिल व्याघ्रा-समीप गुरुगुरु तें ५५
नाहीं उपयोग तुझा कटकीं पळमात्रही नसावास
श्वेत[8]-तुरग मृग-मदसा[9] तूं अस्तुति-पात्र हीनसा वास ५६
साहेन तुझे शत मी एकचि माझा गदा-प्रहार सहा
पापा पळों नको घे अमृतरस असा नसे महारस हा ५७
पार्षत म्हणे वदेल न दुर्वचनें मत्त अशुभ-जन कां हीं
नेणे क्षमा-रत्नांचें त्वत्तुल्य मनुष्य-पशु भजन कांहीं ५८

१ चांडाळगृहाला, २ आलिकडचे, ३ द्रुपद, ४ स्व-अंत-आपलें मरण, ५ अंतःकरण, ६ हे द्रोणास मारणाऱ्या-पक्षीं चंद्रास ग्रासणाऱ्या, ७ अर्जुनगुरूतें, ८ अर्जुन, ९ कस्तूरीसारिखा, + सहा, ∗∗ उत्पन्न केला, ‡ निर्लज्जा.

हृदयीं क्षमा असावी सर्वत्र सदा असों नये पण ती
म्हणती क्षमितां दुर्बळ न क्षमितां करिति दुर्जन म्हणती ५९
गिळिलासि महादुरितें दुष्टा करिशील काय वध मोजा
पाहों नये तुजकडे माझ्या दृष्टी-पुढोनि अधमा जा ६०
जो घोळशी तुज जसा स्मरतीं अति कामरस कलत्रांस
पाहोनि पावले ज्या नरसिंहा सोमर सकल त्रास ६१
भूरिश्रवा सिताश्व- च्छिन्नभुज प्रायगत महातेजा
बहु धन्य म्हणत होते अमरसम रसिक बुध पहाते ज्या
त्यातें वधुनि न लाजसि नरकफळा वरुनि वीरहा नीच्या
मिरविशि पुरुषार्थ म्हणसि लोकीं आपणाचि वीर हा नीच्या ६३
केवळ चांडाळचि तूं झालासि प्रायगत स्वजन-घातें
पाप्या तुलाचि घडलें कर्म तसें नच घडेल अनघातें ६४
त्या नसतां छिन्न-भुज प्राय-गत द्रोण मारिला मंदरी
बंदरी निवेल विप्रा धम-शमनें सर्व-शांत-धाम-दरी ६५
द्रोण-शिर कापिलें तें नाक तुझें काय जेविं घटकर्ण
तैसाचि रणीं मर तूं येणेंचि फिटेल आप्त-कटकर्ण ६६
दुर्वाक्य पुन्हा वदतां द्रोण-शिर तसें तुझेंहि कापीन
न मथितिल खळा तरि हे भुज केले व्यर्थ काय गा पीन ६७
मूढा केवळ धर्में राज्य-व्यवहार चालतो काय
न करी अधर्म ऐसा जो एक तुम्हीं रचाल तो काय ६८
दुर्योधनें अधर्में द्यूत-क्रीडेंत वंचिला पार्थ

---

१ माझा, २ स्त्रियेस, ३ देवासह वर्तमान, ४ द्रोणास, ५ निस्तेज, ६ पातकरहित ातें, ७ आ
प्तआणि कटकत्यांचे ऋण, ८ पुष्ट, ९ देह, + प्राणनिरोध केलेला असा, ‡ माझा शत्रु (द्रोण)
‡ बदरिकाश्रम, ‡‡ सात्विक तपस्व्यांचें स्थान.

लुटिला कुटिलानें हा चोर-समूहें वनीं जसा सार्थ ६९
छळिली सती अधर्में होता फेडीत पापजन चोसा

पाठविले वल्कल-धर करुनि अधर्मेंचि सर्व वनवासा ७०
धांवोनि येत होता जो मद्रप एक भट कळवळून

नेला पुजुनि अधर्में व्हाया याचेंचि फटकळ वळून ७१
वधिला बाळ अधर्में कोंडुनि विपिनीं जसा शशक सारे

झटले वृकसे नाहीं- तरि होता त्यांसि तो वश कसा रे ७२
भीष्म-प्रमुख्या पातें घडलाचि अधर्म धर्वलतुरगाही

पूस खरें कीं खोटें देतिल देवर्षि सिद्ध सुर गोही ७३
भूरिश्रवा अधर्में संहरिला त्यांहि पंडितंमन्यें

देवद्रुम दुर्दैवें जेविं मदांऽधें करीश्वरें वन्यें ७४
त्यांहीं तसाचि यांहीं केला आहे अधर्म हा कांहीं

हा कांहीं म्हणति बळें होईल तुझ्याहि काय हा कांहीं ७५
जें धर्माधर्माचें तत्व कळेनाच बालिशमना तें

मातें नेणुनि निंदिशि तूं पामर जेविं वालि-शमनातें ७६
पूस परांचे पथं तूं पांचाळा-ऱ्याचि सोंड गावांचे

अजे-शश-मृगांतचि बळी पळहि हरिपुढें न लांडगा वांचे ७७
कोपें सात्यकि लेउनि शर कार्मुक घे महा-भुज गदे तो

वाटे गरुडासि शिव्या बहु चक्षुर्विष महाभुजग देतो ७८
त्यावरि सात्यकि धांवे पार्षत टाकी उडी रथावरुनी

गमले ते अंतकसे अन्योन्य-क्षय-करा पथा वरुनी ७९

---

१स-अर्थ-द्रव्यवान्, २वस्त्रास. ३विषम. ८विपरीत. ४अभिमन्यु, ५अरण्यांत, ६ससा, ७पतनानें, ८अर्जुनाडाही, ९साक्ष, १०आपल्यासपंडितअसेंमानणाराअशा, ११कल्पतरु, १२कौरवांनीं, १३पांडवांनीं, १४सैन्यें, १५रामातें, १६मेंढा, + अरण्यासंबंधींअशा.

प्रभु-वचनें द्रुत धांवे भीम बळें माधवारि कवटाळी
यमुना-ह्रद गरुडाची वृष्णि-[3]वराची नसीच कैंव टाळी ८०
आवरितां आटोपी त्यासि पदीं भीमसेन तो सोव्या
त्यातें सहदेव म्हणे आम्हां करितां दुरुक्ति सोसाव्या ८१
पांचाल्य म्हणे सोडा सोडा धरितां कशास भावोजी
खल-दहनें हर्षों द्या देत्ये राघवयशा सभा वो जी ८२
येवूं द्या हो मजवरि हा सात्यकि सत्य वात पर्वत मी
तुरवीन या वराकीं तुरवी रवि जेविं तिळहि गर्व तमीं ८३
हे कौरव आले कीं यांचेंही मथन हें महाकार्य
आम्हीं मुदित करावा सर्वांनीं मथुनि ओहित हा आर्य ८४
अथवा याच्या कांहीं नाहीं पार्था महातपा लेखा
म्हणतो काळा दावुनि अरि जेविं गजा महात पाले रवा ८५
जो छिन्न-बाहु वधिला कौरव्य[9] मला नयापरि समजला
वाटे अधिक शतगुणें तेजस्वि अलात[10] यापरिस मजला ८६
तेजस्वी धरवेना कळलारि स्पष्ट तूंचि फुसका रे
हें परिसुनि मारुति-भुज-[11] धृत सात्यकि सर्पसाचि फुसकारे
भीम भुजांतुनि न सुटे संसारांतुनि जसाचि संसारी
त्यातें धांवुनि यत्नें समजाविति धर्मराज कंसारी ८८
कोपी ऐकुनि कुरुवर त्यांवरि ते शीघ्र नरवरा गेले
तैसे हरि परिसुनियां मत्तगजांचाहि न रव रागेले ८९
क्रुद्ध व्याघ्रचि सात्वत पार्षत ते भीमसोदर[13] ससे
पर गमले तदिशुहि असृ-गास्वादन-लब्ध-मोद राक्षससे ९०

१ सत्वर, २ सात्यकीस, ३ सात्यकीची, ४ झडप, ५ धृष्टद्युम्न, ६ शत्रु, ७ धर्मराज, ८ गणना, ९ भूरिश्रवा, १० कोलीत, ११ भीमाच्याभुजानीं धरलेला, १२ धृष्टद्युम्नावर, १३ मंगळाचेवं [illegible]

## अध्याय-२३

पडले गळांचि धांवुनि सेवुनि बहु रुट्[1]-भरा भरथ ढकले
अभिमान-डिकें न फुटति कुरु पांडु जसे भराऽभर थडकले १
नारायणाऽस्त्र योजी गुरुपुत्र पराः बैला-विलापार्थ[2]
वाटे त्या असुरांच्या दुर्दैवें तो वलाविला पार्थ २
वृष्टि विविध-शस्त्रांची बहु होऊं लागली असह्या[3] ती
कलि-लीलेला बुधसे नच वीरांचे तिला असू सहाती ३
जाळी पर-कटकातें ग्रीष्मीं दव-दहन जेविं कक्षातें[4]
कोणाचीही चालों नेदी नारायणाऽस्त्र कक्षा[5] तें ४
येरें अधिकचि जोंजों वाराया करिति यत्न ते जन गा
नावी परा जसें रवि-[6] कांताच्या दिवसरत्न[7]-तेज नगा ५
धर्म म्हणे क्षत्रिय हो करितां काशास काय-होमातें
मी मंद-भाग्य केवळ पापी नाराल काय हो यातें ६
धृष्टद्युम्ना उरलें बळ रक्षावें वृथा न भाजावें
बा विहंगांहीं[+] सोडुनि दव-परिवृत-पादपा[8] नभा जावें ७
जा शैनेया माझें मामातें सांग नमन मामीतें
जें केलें साह्य तुवां शत-जन्में आठवीन बा मी तें ८
आहे सुज्ञ समर्थ स्व-श्रेय करील हा यदुपदेश[9]
विपदब्धि[✱]-सेतु होउनि लोकाला तारतो यदुपदेश[10] ९
सानुज मी या अस्त्र- ज्वलनीं शिरतों अरे अहीन-कुला
सहदेवा मेलाही तो धन्य चि जो न मी अहीं नकुला[11] १०

---

१ क्रोधरूपमय, २ शत्रुस्त्रियांच्याविलापार्थ, ३ दुःसहा, ४ गवताने, ५ कोटी, ६ सूर्यकांताच्या, ७ सूर्यतेज, ८ दावानलानें वेष्टित अशा वृक्षास, ९ यदु-पद-ईश- कृष्ण, १० यत्-उपदेश- ज्याचाउपदेश, ११ मुंगसाला, + पक्ष्यांनीं, ✱ विपत्-अब्धि-सेतु-विपत्तिरूपसमुद्रावरचा सेतु.

जननीस शोक बाधे पुत्राच्या वेंचतां वृथा काय
रण-मरणें हर्षेल प्राकृत-माता तसी पृथा काय ११
भीष्म-द्रोण-समुद्रीं तरलों या द्रौणि-गोष्पदीं बुडतों
अचल प्रकंपना जें तें व्यजनें तुच्छ तूलसें उडतों १२
जिष्णु-मनीं गुरु पुत्रें पांडव पांचाल शेष आहेत
हे मारुनि पुरवावा गुरुचा वधिले न सर्व हा हेत १३
अभिमन्यु बाळ जेणें करुनि वधाचा उपाय मारविला
लाजविलें उग्रत्वें दुष्प्रेक्षत्वें-गुणें यमा रविला १४
स्मरतें जेणें पुसतां धर्म-धूतांत वदन वासून
कृष्णा उपेक्षिली हे हर्ष नसुनि नित्य पद नवा सून १५
जेणें जयद्रथातें त्या व्यसन-महाऽर्णवांत ताराया
लेववुनि कवच केला क्षम कुरुपति अर्जुनासि माराया १६
पांचाल सत्यजित्मुख जे होते मज्जयार्थ झटत रणीं
ब्रम्हाऽस्त्र राहु करवीं जेणें ते गिळविले स्वभट-तरणी १७
द्यावया आम्हां सर्वां स्वर्ग-निवास प्रवर्तला होता
कल्याण-वृत्त-गुरु त्यां मारविला सुहृ-बन्धुंचा होतां १८
अस्त्राऽग्नींत जळावें हें प्रायश्चित्त सर्वथा युक्त
उक्त प्रकार जेजे त्यांत बरा शीघ्र करिल हा मुक्त १९
प्रभु भुज उभारुनि म्हणे सैनिक हो शीघ्र आयुधें सोडा
यानावरूनि उतरा कर या अस्त्रासि सर्वही जोडा २०
भस्म करिल योध-जना वहुतां शरणागताविना शम हो

१ देह, २ कुंती, ३ महावातास, ४ विंजण्यानें, ५ कापसाप्रमाणें, ६ पसरून, ७ द्रौपदी, ८ समर्थ ९ मत्-जय-अर्थ-माझ्याजयासाठीं, १० हवनकर्ता. ११ ब्रम्हास्त्रानल.

म धरिल उरविल कोणा  न हुताश रणागता विनाश महा २१
तों भीम म्हणे कथितो  हा हितहि तमाळेनील परि सारे
मानधन कुलज-जन हो  मन हो न अस्त वाक्य परिसा रे २२
सोडावें कुळजांहीं  जीवित समरीं न शस्त्र सोडावें
मोडावें आप्त-वचन  अयश शरीराऽर्थ केविं जोडावें २३
धरितों मी या अस्त्रीं  न उराया तिळहि उर गदा हातें
रे गरुड-संश्रिताच्या  विष-दहनें करिल उरग दाहातें २४
पावेल मजपुढें हा  घेउनियां होर विप्र तापातें
भेटुनि रघुरामा भृगु-  राम कसा हारवि प्रतापातें २५
रे जिष्णो त्वां समरीं  भिउनि परां सत्व बळ न सोडावें
करपद्म तुझें उजवें  विशर विगांडीव पळ नसो डावें २६
जिष्णु म्हणे आर्या मी  न करिन अन्यत्र कार्मुक-न्यास
नारायणाऽस्त्र-गो-द्विज-  तेजा द्यावा न मान अन्यास २७
तेंजस-वच परिसुनि तो  अत्यद्भुतमान-सत्व रागेला
घनसाचि द्रौणिवरि  स्वीकारुनि मान सत्वरा गेला २८
हास्य करुनि गुरु-नंदन  ताडी अस्त्राऽभिमंत्रित-शरानीं
वाटे दाव-ग्रस्तीं  शिरला तो द्विरद काल-वश रानीं २९
भीमाऽचलावरिच बा  अस्त्र-जलद-पटल तें सकळ वळलें
कटक कळवळे बहु परि  हृदय पवन-सूनुचें न कळवळलें ३०
क्षितिवरि उतरुनि सर्वहि  करिती तत्काळ आयुध-न्यास
म्हणती स्मर नराहि असो  देवा या विपुल आयु धन्यास ३१

१ श्रीकृष्ण, २ जिंकणारा, ३ अर्जुना, ४ करकमल, ५ बाणरहित, ६ अर्जुनवचन, ७ भीमरूपपर्वतावर, ८ भीमाचें, ९ शस्त्रत्याग.

जेंवि आच्छादी भीमा अस्त्र-ज्वलनांत वारुणें-अस्त्रें
केशव-कृपाचि झांकी त्या बाळा त्या महातपीं वस्त्रें ३२
दहनीं मिळोनि कळवी कीं दहन-समान वेगळा मी न
मजहि गमे तो अस्त्रा प्रथम जसा मानवे गळा मीन ३३
वारुण-परिस्मृत म्हणवुनि भस्म न करि दहन-राशि शिरस्याला
स्वरदचि पर-प्रतापा ऽतप त्या जो हरि-दया शिशिर त्याला ३४
भीमा वधार्थ धांवे ब्रम्ह करी जें चिराऽयु धात्यातें
पद-धावन बहु यश दे विस्रस्तपटा निरायुधा त्यांतें ३५
दीप्ताऽलयांत शिरवी जेविं कृपण-धनिक-मानवास वही
प्रभुशि नसा अस्त्रीं तो पावेना भक्त-मान वासवही ३६
दोघे नर-नारायण गांठिति भीमासि धरुनि स्वरथातें
जरि हा असा दुराऽग्रह वदले बहु धन्य वरुनि सुर यातें ३७
झोंबति ते भीमाच्या जेसे याचक करास दात्याच्या
वंदन दुराग्रहा स्व-दु- राग्रह जाया करा सदा त्याच्या ३८
घे धनु धनंजय नृपा शौरि शरातें बळेंचि झोंबोनि
ओढिति रथावरुनि मग घालूनि मिठी भुजांसि लोंबोनि ३९
तों तों गर्जे भीम प्रभु जोंजों बल करूनि आकर्षी
नारायणाऽस्त्र खवळे भ्याले बहु नारदादि नाकर्षी ४०
कृष्ण म्हणे हें काय त्यज आग्रह या न उचित हें कविला
उतर रथावरुनि क्षण अभिमानें कोणकोण न ठकविला ४१
युद्धें निवारितें तरि कां आम्ही सर्व न करितों युद्ध

१ अर्जुन, २ पर्जन्यास्त्रानें, ३ भासा, ४ शत्रुप्रतापरूपसूर्य, ५ शीतल, ६ दीर्घायु, ७ ब्रम्ह्यातें, ८ पायानीं धांवणें, ९ कृष्णास, १० उत्तमवेगानें, ११ नाक-ऋषि- स्वर्गस्थ ऋषि, १२ दुराग्रह, + उधाराची वही, ∗ गेलें आहे वस्त्र ज्याचें असा.

क्रुद्ध नको होऊं बा  या अस्त्र-शमीं[1] उपाय हा शुद्ध  ४२
शस्त्र-न्यास करूनि हे  वीर तुझे उतरले पहा सारे
या रेवती-धवा[2]ऽनुज-  वचना दे मान मानदा बा रे  ४३
दुर्योधन-दुर्दैवें  प्रभुकरवीं तो बळेंचि उतरविला
कीं देणार पवन-सुत  शोक तुला[3] जेविं शक्र-सुत[4] रविला ४४
ज्या स्मरतां कामाद्यरि-  षट्कऽहंकार सर्व हरपावे
भीम बळें बहु-कष्टें  पूर्वी त्या प्रभुसि जेविं हर पावे ४५
भीम-प्रेम-बळेंचि न  पावुनि नारायणा[5]ऽस्त्र-दर वळला
त्या सुयशें जेविं तसा  सुर-तरु-कुसुमें[6] न नाक दरवळला ४६
नारायणाऽस्त्र शमलें  जेव्हां तो वायुचा तनय शमला.
प्रभुनेंसें प्रभु[7]च्यांचें  सांगों दे कुसरि मात न यश मला ४७
पुनरपि पर[8] प्रमुदित  प्रेक्षुनि गौरव[9]पती असुरव पावे
+त्यासि म्हणे उरल्यांचे  याचि महाऽस्त्रानलें असु रवपावे ४८
द्रौणि म्हणे मृत्यु परिस  भंग अधिक शत-गुणें असे आहे
मृत-मा[10]रण नीचों[11]चित  होते पसरीत कीं पदर आ हे ४९
अस्त्र-प्रदीप म्हणसी  उजळीं तुरवावयासि पर-[12]तेल
योजूं नये तुम्हा हें  योजिन तरि मजवरीच परतेल ५०
मज-हरिपुढें उगावें  न पळभरिहि शत्रुकंटक-कोळि[13]विटें
केला दिव्यास्त्र प्रति-  घात स्वरा गोपदार-[14]बोळविटें ५१
नृप म्हणे न जय श्री  देशिल तूं बा परंतु कामातें
देतो सुबं[15]धू साधुनि  यत्नें प्रभु बाप रंतु[16]कामातें ५२

१ अस्त्रशांतीविषयीं, २ कृष्णवचना, ३ धृतराष्ट्राला, ४ अर्जुन, ५ नारायणास्त्राचें भय, ६ सुवासितझाला: ७ भक्तांचें, ८ शत्रु, ९ दुर्योधन, १० मेलेल्यासमारणें, ११ नीच-उचित-नीचलायोग्य, १२ शत्रुरूपतेल, १३ हरणानें, १४ कृष्णानें १५ उत्तमस्त्री, १६ क्रीडाकरणाऱ्यातें,
+ अश्वत्थाम्यास.

त्र्यंबक भरवीं कीं तूं न पळों देसील पदहि स्कन्दोम्या
तुजवरि गुरुघ्न-वध हा भार दिला फार न गुरु तुम्हा त्यां ५३
नृप गुरु-सुता स्तवें पटु जेविं हया तापवी भतोदानें
धांवे परासि घाया चिंतुनि तें पाप विप्र तो दानें ५४
शरभ जसा सिंहातें गांठुनि करि भग्न पार्षता राया
सात्यकि भेदे त्रसनीं त्या भोत्या जेविं औषधें तारा या ५५
द्रौणि म्हणे शैनेया रक्षिसिल न आपणाहि आपण जा
रक्षिल न शक्र याला जरि बा आजाहि करिल आपणजा ५६
पांचाळ सर्व वधिल्या- वांचुनि पावेल कोप उपशम न
वेंचुनि वादविसिल तूं ज्वलनाचें करिल काय तुप शमन ५७
ऐसें गर्जुन अर्जुन- समजो समजोनि करुनि पाठ कवी
पाठक विख्यात जगीं तैशास्त्रहि तो महातपा वकवी ५८
एकेंचि शरें भेदुनि कवच उर क्षतेज ओकवी राया
सात्यकिला लोळवितां भ्याले बहु सर्व लोक धीरा या ५९
गमला झाला तो गुण- सद्गलाचा उबा परंत रणीं
वदला असेलचि धरुनि तेजाची चाड बा धरे तरणी ६०
सूतें शीघ्र पळविला सात्यकि तो त्यजुनि समरंमहि मागें
ज्या शक्रचि गुणा म्हणावें स्व शिरीं तूं शंभुसम रम हिमागें ६१
पाडी द्रुपद-सुता शर हाणुनि जें विप्र भोवयांमाजी
पाहे दृष्टि परा दिवे- भीतां जेविं भमो वयां माजी ६२
पांचाळ-चमू खवळे स्वर्गाप्रति शीघ्र बोळवी तीतें

---

१ इंद्रास, २ स्तुतीनें, ३ चाबुकानें, ४ वाल्मिकि रामायण, ५ शांति, ६ रक्त, ७ अश्वत्थाम्यास, ८ मृत, ९ मृतोत्थापन मंत्रविशेष, १० युद्धभूमि, ११ हिमाचलानें, १२ दिवांधास (घुबडांस,) १३ ब्राह्मी.

रण-मृत्यु नच रुचे जरि बहु हित तरि जेविं बोल वीतीनें ६३
भीम धनंजय मालव पौरव युवराजनाम चेदिपती
हे पांच धांवले ज्यां डोळे पाहोनि आमचे दिपती ६४
वधिला युवराज पळें पौरवहि पळें पळेंचि मालव तो
त्या गुरु-सुतापुढें पर घायुपुढें जेविं दीप मालवतो ६५
नंदावरि हरि बुडवुनि निज मरव करितां जसा पर-मरव वळे
शर वृष्टि गुरु-सुतावरि भीम तसा बहु करी परम रववळे ६६
तेज पर-हृदय-कंपद राम तसें द्रोणिही किमपि त्याला
उचितचि जरि हरिणींच्या येइल वृक-दर्शनें हिंव पित्याला ६७
एक जगत्प्राणाऽत्मज एक महाऽथर्वराज-कायज गा
ते क्रुद्ध युद्ध करितां कल्पांत-भ्रम न होय काय जगा ६८
समर-मखीं कोपविला प्रथमचि आचार्य-पुत्र तो धनुतें
खंडुनि मुहूर्त मूर्छित केला भीमें समस्त-योध-नुतें ६९
नभ त्याच्या शर-जाळें कोंदे वाहों शके न वात रणीं
एक कुपित रुद्र गमे एक प्रळयीं जसा नवा तरणी ७०
भीमाचेंहि द्रोणि छेदी कोदंड दीनदां देवा
वाटे गजा महागजें भंग महानदचि तो नदा दे वा ७१
सूतासि अलिक भेदुनि पाडी प्रकटूनि अस्त्र-मायेतें
जेसें दैणें धृतितें गुरु-पुत्रीं नुरवि शस्त्र, मायेतें ७२
अश्व स्वैर उधळले मूर्छित होतांचि रश्मि-ओंवरिता
पडला भीम गुरु-सुत- क्षोभें समयीं असोनि आव रिता ७३

१ बाळंतिणीतें, २ रुद्र, ३ हिंव, ४ वायुपुत्र, ५ द्रोणपुत्र, ६ अथवा, ७ ललाट, ८ अत्यास कपटानें, ९ कर्ण, १० धैर्यानें, ११ सारथि

जैसा करिता झाला दैत्यांशीं धरुनि शक्र संगर[1] जी
तैसा गुरु-सुत पांडव- पांचालांसीं असीम-संगर जी[2] ७४
गेली द्रुपद-सुताला पांचाल-चमू तिलाहि सोडुन भा[3]
तपन-मनाप-समयीं न म्हणति कोणीहि सेंदु[4] सोडु[5] नभा ७५
द्रौणि-पर-चमू मर्दी देखूनि भय-व्यथा पिटी कांहीं
मूल[6]-महत्त्व न हारिते मोठ्या झाल्या तथापि टीकांहीं[7] ७६
केले भग्न बहुत परि न मनीं तो अजित-सारथि-वर मला
त्या कटकांत न कोणी आढळला अजि तसा रथि-वर मला ७७
होउनि गुरु-सूनुपुढें श्वेताश्व म्हणे त्यजूनि भीड अरे+
उद्धत[8] अबलांतें[9] कां वधिसी गजसवेंचि भीडें[10] अरे[11] ७८
हारितों मी तव दर्पा त्याही ज्या माजलासि भांडवलें[12]
या मागें बहु निष्ठुर होउनि तुजसीं मला न भांडवलें ७९
आम्हांवरि जो द्वेष प्रीति तुझी जी सुयोधनावरि ती
शक्तिहि दावीं समयीं निज-तेजानें सुयोध नावरिती ८०
नाशिल सर्व तुझा हा मद तोचि द्रोण-घातकर[13] हातें
सोडुनि साहंकारा अन्य-जनीं कोण पातक रहातें ८१
पुससि कसें अति अप्रिय गुरु-सुत-कोपार्थ अर्जुन वदे हें
कापुरुषत्व असें जरि अर्जिल[14] तो पार्थ अर्जु नव-देहें ८२
तरि परुष[15]-भाषणाचीं कथि तों तुज कारणें नृपा[16] परिस
बहु गुरु-पुत्रीं पार्थ- प्रेमा गुरुपरिस त्या कृपापरिस ८३

१ प्रतिज्ञा. २ ऊर्जी. ३ कांती, ४ स-इंदु-चंद्रान्वित, ५ स-उडु-तारान्वित, ६ मूळग्रंथाचें महत्व, ७ व्याख्यांहीं, ८ दांडग्या, ९ निर्बळांतें, १० युद्धकर, ११ शत्रो, १२ द्रव्यानें, १३ धृष्टद्युम्न, १४ संपादील, १५ कठोर भाषणाचीं. १६ हे धृतराष्ट्रा, + संबोधनार्थ अव्यय.

पार्थाचा विनय कृपीं द्रोणीं भीष्मीं युधिष्ठिरीं विदुरीं
तोचि गुरु-सुतीं लोभाहि बहुताचि वा जेविं जिष्णुचा भिदुरीं ८४
परि भवदनयें पडला विघड तशाही सख्यांत हा राजा
अहित अहि नसा झाला उचित गळीं-विहार रत्न-हारा ज्या ८५
वधिले मालव पौरव युवराज सुकीर्ति-भाजन तिघे ते
सात्वत पार्षत मारुति दमिले जे वीरराज नति घेते ८६
पडले होते हृदया धर्मोक्तें धिरडियासि जेविं घरें
कीं उदकें ढेंकुळसें परुषें वचनें पळांत जें विघरें ८७
देवें पार्षत सात्यकि यांत कली भेद घातला खोटा
तो उकलिला मनें जो करिता धृति-दृष्टि-घात लाखोटा ८८
यास्तव अभूत-पूर्व क्रोध श्वेताऽश्व-मानसीं पेटे
कक्षीं जेविं दवाऽनळ बळज्याला घावया सखा भेटे ८९
झाला गुरु-सुत-हृदयीं तो बहु कटु परुष-वाद शर भाला
निद्रेंत लाविला मृग-राजानें काय पाद शरभाला ९०
कोपे बहु तो वाटे उन्मूलिल कृष्णा-युग्म रोपें कीं
हरसा हरयाऽहरथा ऽहित-गण-दाहार्थ सिद्ध रोपें करीं ९१
परमाऽन्यस्त्रें सकळहि शत्रु कराया परासु रोपाऽस्या
करुनि मर्दास सोडी तृण मानुनि त्या परी सुरोपाऽस्या ९२
अस्त्र प्रकटी ज्वाला-मालाऽकुळ शर अनंत राया तें
करि सांतराय योगी-श्वर-योगांतें अनंतरायातें ९३

---

१ इंद्राचा. २ वज्रावर, ३ भवत्- अनय-तुमच्याअन्यायानें, ४ विरोध, ५ हतवीर्य केले, ६ नमस्कार, ७ कठोरअशा, ८ कलह, ९ पूर्वींनझालेला, १० गवतांत, ११ वाळहृस्स, १२ गज, १३ बाण, १४ मृत, १५ बाणसुरवास, १६ कृष्णासे, १७ सुर-उपास्य-देवाससेव्यअशा, + कंठ व्यांठायींक्रीडा.

त्यजिती जलौशया[1] गुरु  गंभीराही नदी नदा यादें
गुरुच्या पर-बळ केलें  क्षणमात्रें हीन दीन दायादें[2] ९४
अहि बाहेर निघाले  सोडुनि बहु तापतां महि बिळाला
कोणासहि अभय-प्रद  आश्रय त्या संकटांत न मिळाला ९५
त्या अग्न्यस्त्रें सहसा  सेना अक्षौहिणी-मित जळाली
बहुत न हुत होणारी  जी तीच स्फुटोनि तेथुनि पळाली ९६
ऐसा करिता झाला  एकचि सोडून बाण विप्र लया.
रुद्राऽधिक गमला तो  कीं नसतां समय जाणवि प्रलया ९७
धरि पर-चमू धृति जसी  श्रुत-सिंह-रवा दवाऽवृता न गजी
पार्थें सर्वास्त्र-प्रति-  पक्ष ब्रम्हास्त्र योजिलें मग जी ९८
घन शस्त्र-वर्ष शमलें  शमतां अग्न्यस्त्र सर्व तमही तें
स्फुर म्हणति मुख्य कृष्णाचि[3]  हे धरति न शेष पर्वत महीतें ९९
मेलेचि कृष्ण ऐसें  वा सर्वांनीहि मानिलें होतें
अक्षत[4] शस्त्र-प्रशमीं  पाहुनि बहु तेज मानिलें हो तें १००
घन-पटल-मुक्त रवि-शशि-  निभ-कृष्णांहीं स्व शंख वाजविले
गाजविले लोक सकळ  तावक[5] कुरु-नंदनादि लाजविले १०१
शोक-ध्यान-परायण  अश्वत्थामा कराऽगुळी मोडी
जोडी हस्त श्वसिला  दीर्घोष्ण-श्वास चापही सोडी १०२
तो[6] धिक्धिक् सर्वमिदं  मिथ्या ऐसें म्हणे रथावरुनी
टाकुनि उडी पळे हो  शीघ्र तपोयोग्य-वन-पथा वरुनी १०३
तों ज्याच्या उपदेशें  बहु जनि[7]-मरणाद्यऽनर्थ चुकतात

---

१ जलाधार अशा २ पुत्रें, ३ कृष्णाऽर्जुन, ४ नाशरहित, ५ तुझे, ६ अश्वत्थामा,
७ जन्मरणादिरूप अनर्थ.

तो भेटे भर्गात्मज भगवान् भव्य-प्रभाव शक्र-तात १०४
व्हावें धन्य जयाच्चें तीर्थांचें तीर्थ पद नमुनि पतितें
त्या संदी तो चिंता- शोक-परिम्लान-वदन मुनिपतितें १०५
सविनय पुसे अहो म्यां आग्नेयास्त्र-प्रयोग हा केला
रुद्रेंहि न पावावें यद्रीतें-गुहाचियाहि हाकेला १०६
सर्व चमू भजळाली कृष्णाऽर्जुन वांचले कसे या हे
जे हर-चक्रासि त्यांची प्याले कीं आंच लेकसे वाहे १०७
हे माया कीं काळें केलें विपरीत पूर्व कीं चुकलों
सांगा कां गायत्री- जप-पर मी मंत्र-सिद्धिला मुकलों १०८
व्यास म्हणे नारायण होऊनि कार्यार्थ धर्म-रुत पाला
जळहि न सेवुनि पूर्वी करि मैनाकीं अविघ्न रुतपाला १०९
सासष्ट-सहस्र समा धृत-यम-नियमासि सर्वदा जपला
नितु केंचि पुन्हा जप तो ऊर्ध्व-भुज स्थाणु वात-भुक् तपला ११०
तो ब्रम्हभूत जेव्हां प्रभुची तेव्हांचि पूर्ण होय दया
मग दर्शन भगवान् दे भव हर सेवक-मयूर तोयद या १११
प्रेमें स्पितीं निवविती शशिशत-मद-दलन देव देव-रद
नमितीं शिरीं कर स्तुति करितां श्रुति चित्त दे वदे वरद ११२
मद्भक्त मत्प्रसादें हो तूं मत्तुल्य मदधिकहि समरीं
त्वदधिक तेज यश नसो कोणा ही योगि-मुनि-जनीं अमरीं ११३
त्या नारिसील वधिसिल म्हणसील ज्याज्यासि नारिन वधीन
शस्त्रास्त्रांपासूनि भय तुज किमपि नसो असो जय अधीन ११

---

१ शिवसदृश. २ त्यांस. ३ ज्या अस्त्रापासून त्यातेजी कार्तिकस्वामीच्याच्या, ४ मैनाक नामक पर्वती. ५ वर्षे, ६ स्वाधीन, + मेघ, * कर्ण.

विश्वेश असे पुष्कळ होउनि परम प्रसन्न देवर ज्या
तो हा यदुपति याच्या नमिति पदाच्या समस्त देव रजा ११५
याच्याचि तपापासूनि झाला यासमचि नर महातेजा
तो हा अर्जुन नारा- यणचि म्हणति कवि वरे पहाते ज्या ११६
रक्षिति युगीं युगीं हे साधूंतें आदरें अवतरून
यांचा पद-पद्म-रजः कणाहि न होइल शर्वाधिवेतरून ११७
श्रीकृष्णा रुद्र-संभव पूजितसे शंकरासि हा लिंगीं
अहि चंदना तसा तूं मनिं तरि कृष्णा- ह्यासि आलिंगीं ११८
तूंही रौद्र तपस्वी तेजस्वी रुद्र-भक्त पूर्वींचा
ईश्वर-वर-प्रसादें झालासि आसक्त सर्वपूर्वींचा ११९
इत्यादि तत्व ऐकुनि तो कुरुगुरुच्या कुमार बहु मानी
श्रीशंभुकारणें नति करुनि श्रीकेशवासि बहु मानी १२०
ह्यापरि व्यासानें पंढुनि अर्धेहार शीघ्र तो करवी
आचारि बीसां स्वर्करां निबाधा जेविं सर्वलोक रवी १२१

---

## अध्याय. २५

अर्जुन निज विजयावह योतें आश्चर्य किमपि पाहोनि
पाहोनि विस्मय-भर ध्यानीं होता तटस्थ राहोनि १
तों व्यासातें पाहे नमुनि म्हणे करुनि आ नपेंच्या शी
पुसतों सांगा म तुम्हीं उरधाळ तमासि आतप स्वामी २

---

१शार्थान्धव-प्रकृ-कन्न-इंद्र्-तरु (कल्पतरु) हूनअणा, २अभिमानी, ३सेव्यतमारोप, ४आपल्याकिरणात, ५तपी रूपधना.

जेव्हां जेव्हां करितों   जिकडे जिकडे शिरोनि परम रणा
तिकडे तिकडे दिसतो   दिव्य पुरुष तोचि हेतु पर-मरणा ३
वर्णें कृष्ण भयंकर   बहु चालतसे त्यजूनि तो धरणी
मरती तच्छूलोत्थित-   शूल-सहस्रेंचि सर्व योध रणीं ४
दीप-पुरोवर्ति तिमिर   वायु-पुरोवर्ति घन-पटल फाटे
तैसें तयांपुढें पर-   बल तें पाहुनि मला नवल वाटे ५
मागुनि मी आधीं रवि-[1]   शत-संभ्रम बल-समुद्र अनवधि[2] तो
शूल-विनिःसृत-शूल-   प्रकरें मच्छत्रु-योधजन वधितो ६
जन मानितसे वधितो   पार्थ शरांचीं शरोत्करें कटकें
मृत-मारणाचि मज रणीं   घडलें दिसतें जनास तें लटकें ७
स्वामी तो पुरुषोत्तम   कोण बरें हें तुम्हीच सांगाल
आपण सर्वज्ञ म्हणुनि   पर गर्वें फुगविनात कां गाल ८
व्यास म्हणे ज्या साहे   न शशी न हुताशन न रवि शंकर तो
प्रभु-भाव असा स्वपदीं   होउनि असपत्न[3] नर[4] विशंक रतो ९
सैंधव-वध-पण-समयीं[5]   कृष्णें स्वप्नांत दाविला परवां
झालासि हेतु वंदुनि   ज्या असुरीच्या तदा विलाप रवां १०
मधुर प्रसाद सुजवरि   म्हणुनि प्रभु चालतो पुढें पार्था
बहु जपतो भक्त-जना   भगवान् सार्थप जसा सदा सार्था
जो त्यासि शरण चरण-   स्मरणाच रण-मरण-संकटीं तारी
मारी तोचि खलांतें   दासासि पडों न देचि जड भारी १२
कृप-वृष-गुरुसुत-रक्षित-   सेनेतें वक्र-दृष्टिनें पाहे

---

१ शंभरसूर्यासारिखी कांती ज्याची, २ अमर्याद, ३ शत्रुरहित, ४ अर्जुन, ५ जयद्रथवधप्रतिज्ञेच्या समयीं.

बा हेतिधर असा या प्रभुवांचुनि अन्य कोण गा आहे १३
नमन त्रिकाल करिती स्वर्गी शक्रादि सुर तरिच वसती
दारवविती झाली या प्रभुचारितांची जना धरि च्यव संती १४
प्रभुवर दस्रा जेविं म- दर्पा सर्पाधमा सुपर्ण कुटी
याचा प्रसाद इच्छुनि बांधिली कविनीं वनीं सुपर्णकुटी १५
जें खेंचर लोह-रजत- कनकमय त्रिपुर पांडवा तें गा
एकेंचि शरें केलें भस्म उडविलेंहि कांडवेगानें गा १६
एके समयीं अंकीं घेउनि या खेळवी कुमार-मणी
देवांला सांगा हा कोण म्हणे शंभुची उमा रमणी १७
तेजस्वी शिशु दिसतो हा मसद् यादतां हरिल याला
न उपेक्षावें चिंतुनि हें धांवे न्यावया हरि लयाला १८
तत्काल सवज्र भुज स्तंभित झाला अगा धवळबाहा
श्रमले सर्व न कळला कोणालाही अगाध बळ वा हा १९
साश्मर शक्र विधिकडे आला पळत न रहु भुजास कळ लागे
स्व-मनीं उमा म्हणे गुरु- मान तुजही मूढ हा न कळला गे २०
परिसुनि हें विधि म्हणे रे शक्रा देवदेव भज सोकीं
हरिहरि हर-परिभव-बळ तुज आदळलें असेल अज-लोकीं
प्रेमें तसाच भजली शक्ति-गुण-मणि स्मरवनि धी उमापतितें
देतां नाना सुरस बहु- रूप प्रभु सुरवनिधा उमोप तितें २२
येतों चला क्षमाया संसारीं चाकवत चुकाना कीं

१ शस्त्रधर, २ गरुड. ३ बाणवायूनें, ४ धवळबाहा (अर्जुन) यासारखा धवळबाहा, ५ सुफळ, ६ चक्रवत्. ॐ आकाशामध्यें संचार करणारे, + पार्वती.

कैंचें अमृत मिळेल न चाखाया चाकरेंन चुके नाकीं २३
आज्ञा घांलुनि सासमर विधि विनयाचा प्रभूसि कैलासीं
काळाचेंहि न चाले बळ ज्याच्या द्वारपाळ-वेत्रासीं २४
यस्त्री विधि करुनि सुरां-सह नमन स्तवन दीनपा पदर
प्रभुपद-युगुळीं निघती कां हरिल विबुध न दीनपाप-दर
प्रभुनें न शूळ धरिला न अरि न नाशावया गद पिनाक
नाकु-स्मर न व्हाया वर्जी घांसी पुढें नदीप नाक २६
ऐसा प्रताप ऐसी लीला ऐसें दयालुपण सहज
बाणा पदा प्रभुयशीं केलें केवळ पल्यांत पर्णास प्रज २७
मातेची सरि येना उपमातेला अगा धवळवाहा
काय तुपाची साजे उपमा तेला अगाध-बळ या हा २८
हरिहर सहाय झाले तेव्हां तत्तुल्य तूंहि अजित रणीं
काय इतर तेजस्वी पत्त्रा तुजला म्हणेल अजि तरणी २९
माधव-मित्र-मयूरा मुनि-सुदिनें मुदित करुनियां गेला
केला धन्य जये असा शिबिरा-शिविराज-सुत-पदें नेला ३०
श्रीगुरुराम-पदाब्जीं गावें हें द्रोणपर्व वाहून
झालों प्रसाद-भाजन सर्वहि होतिल अग्रेंचि पाहून ३१

समाप्त.

ग्रंथसंख्या. २५००

स्थाकविशेष, १ अजगवमतत्करीं ३ हृद्. ४ सकटक (सोमाचपुत्रप्रसाधाने) ५ पेंच ६ आर्जुन, ७ पूर्वी